ॐ

# मुण्डकोपनिषत्.

संपादक

चिंतामण गंगाधर भानु, बी. ए.

प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी,

प्रिंटर्स, पब्लिशर्स, एजंट्स् इत्यादि, ठाकुरद्वार-मुंबई.

सन १९१३ इ.



हें पुस्तक रा० दामोदर सांवळाराम यंदे यांनीं नं० ४३४ ठाकुरद्वार रोड-मुंबई,
येथें 'इंदुप्रकाश' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

किंमत १॥ रुपया.

# अनुक्रमणिका.



# प्रस्तावना.

मुंडक उपनिषद् हें अथर्वणवेदांतील आहे असें श्रीमच्छंकराचार्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत सांगितलें आहे. अथर्वणवेदांत अनेक उपनिषदें आहेत. अथर्वपरिशिष्टांत म्हटलें आहे कीं, ब्रह्मवेदाचीं, अथर्वणाचीं, अठ्ठावीस उपनिषदें आहेत. मुण्ड, प्रश्न, ब्रह्मविद्या, अथर्वशिखा, नलबिंदु, ब्रह्मबिंदु, इत्यादि पांच बिंदु, तापिनी, नारायण, इत्यादि उपनिषदें अथर्वणवेदांतील होत.

या उपनिषदांत तीन मुण्डकें आणि प्रत्येक मुण्डकांत दोन दोन खण्डें या प्रमाणें सहा खण्डें झालीं आहेत. प्रथमखंडांत परा आणि अपरा या दोन विद्यांचीं स्वरूपें सांगितलीं आहेत. या खंडाचा सारांश असा; जगताच्या आरंभीं ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली. या ज्येष्ठ देवानें प्रकृत ब्रह्मविद्येचा संप्रदाय प्रथम सुरू केला. कांहीं गुरुशिष्यांच्या पिढ्या झाल्या नंतर पुढें शौनक नामक एक ऋषि अंगिरस नांवाच्या गुरूकडे गेला आणि तत्त्वबुभुत्सेनें ( तत्त्व जाणण्याच्या इच्छेनें ) प्रश्न विचारता झाला कीं, असें कोणतें ज्ञान आहे, कीं जें प्राप्त करून घेतलें असतां सर्व विश्वाचें निश्चित ज्ञानविज्ञान होतें. तेव्हां अंगिरसानें उत्तर दिलें कीं, परा आणि अपरा अशा दोन ज्ञेय विद्या आहेत, त्यांपैकीं, अपरा ही विद्या जीं ज्ञानें देते तीं समजून घेऊन त्यांचा संग्रह करावयाचा आणि नंतर परविद्येनें सांगितलेली वस्तु यथार्थ समजून घेऊन तिच्या साहाय्यानें शास्त्रांतील सिद्धांतांस एक स्वरूप द्यावयाचें. हें स्वरूप पूर्ण समजलें म्हणजे त्याच्या योगें सर्व वस्तूंचें ज्ञान होतें. अपर–धी ( खालच्या प्रकारची बुद्धि ) अपरविद्येचें ज्ञान करून देते. उपनयन झालेल्या सर्व मनुष्यजीवांस अपर–धी असते; पण पर–धी मात्र विद्वान् परमहंस संन्याशांस प्राप्त होते. अपरविद्येचे विषय ऋग्वेदादि चारी वेद आणि वेदांचीं सहा अंगें हे होत. अपरविद्येंत सर्व व्यावहारिक शास्त्रांचें व व्यावहारिक कर्मांचें ज्ञान होतें. पण या उपनिषदांत व आचार्यांच्या भाष्यांत कर्मकांडाचा, कर्म करण्याच्या अधिकाराचा, कर्मफलाचा इत्यादि कर्मांगविचार मात्र केले आहेत. परविद्येचा विषय ब्रह्मज्ञान हा आहे, अपरविद्येनें कर्मविषय समजून दिल्यानंतर ती कर्म करण्याची प्रेरणा करिते आणि यथासांग कर्म झाल्यानंतर फलप्राप्ति होते. अर्थात् येथें कर्म करण्याचे श्रम, प्रमाद होण्याचा संभव असून पुनः कर्मज्ञान, कर्मानुष्ठान, व कर्मफल यांत पुष्कळच कालांतर असतें. परविद्येची मात्र गोष्ट तशी नाहीं. येथें यथार्थ ज्ञान झाल्याबरोबर पूर्ण आनंद होऊन पुरुषार्थ सिद्ध होतो. असा पर आणि अपरविद्येंत मोठा विशेष आहे. तसेंच व्यावहारिक ज्ञान व व्यावहारिक कर्म समजून देणारी बुद्धि ही दृश्य विषय मात्र पाहणारी असून ती वासना व अभिमान यांनीं उपहित असते. परबुद्धि ब्रह्मस्वरूप समजून

देते; कारण ती उपाधिशून्य असल्यामुळें निर्मळ असते, चिद्रूप असते व चिद्रूपाला चिद्रूप समजते. तात्पर्य, चिद्रूप पाहणारी ती परा धी व दृश्यविषय पाहणारी अपरा धी असा या बुद्धिद्वयांत विशेष आहे.

ब्रह्म ही वस्तु इंद्रियावयवांस गोचर नाहीं व इंद्रियावयवयुक्तही नाहीं. म्हणून ही वस्तु कार्यकारणातीत, अनाद्यनंत, एकरसात्मक असून निरनिराळ्या स्वरूपांनीं जीवांस स्वाधिकाराप्रमाणें प्रकट होणारी, देश–काल–वस्तु–गत–परिच्छेद–शून्य, अत्यंत सूक्ष्मरूप आणि कारण नसून कारणरूपानें विवर्त पावविणारी आहे. सारांश, परमार्थतः ती एक असून उपाधींमुळें ती अनेकरूप भासते. म्हणून ब्रह्मवस्तूचें ज्ञान झालें असतां तिच्या सत्तेनें भासणाऱ्या अनंत विवर्तांचें ज्ञान तिच्या सामर्थ्यानें होऊन जीवाला सर्वज्ञत्व आणि सर्ववेद्यत्व प्राप्त होतें.

बीजाला जलाचें साहाय्य झालें म्हणजे तें फुगतें, त्यांतून एक अव्याकृत अंकुर उत्पन्न होतो, त्याचा पुढें लहान मोठा वृक्ष होतो आणि शेवटीं गोडसें फल येतें. त्याप्रमाणें ब्रह्माला मायेचें सानिध्य झालें म्हणजे अव्याकृत अन्नाची ( मूल प्रकृतीची ) उत्पत्ति होते. या अन्नाला क्रियाशक्ति आणि ज्ञानशक्ति अशी एक शाखा, आणि पंचमहाभूतांच्या तन्मात्रांची दुसरी शाखा, अशा दोन शाखा उत्पन्न होतात. या दोन शाखांचा संयोग झाला, म्हणजे ज्ञानक्रियाशक्तींचा पंचमहाभूतांवर संस्कार झाला, म्हणजे अनेक भुवनांची उत्पत्ति होते आणि या भुवनांत राहणारे प्राणौपाधिक अनंत जीव अनंत कर्में करितात. त्या कर्मांस अनंत प्रकारचीं फळें प्राप्त होतात. मायेशीं ब्रह्माचा संयोग झाल्याबरोबर शबलब्रह्म, हिरण्यगर्भ, विराट् या क्रमानें सृष्टीची उत्पत्ति होते आणि ब्रह्ममायेचें लग्न लागल्याबरोबर व्यवहाराला प्रारंभ होतो. परमार्थांत प्रारंभ नाहीं; तेव्हां येथें दिसणारा प्रारंभ व सृष्टीची उत्पत्ति व्यावहारिकच होत.

दुसऱ्या खंडांत अपरविद्येनें सांगितलेले विहित आणि अविहित कर्मांचा इष्टानिष्ट विपाक, कर्मांपासून होणाऱ्या फलांचें अनित्यत्व आणि दुःखदातृत्व इत्यादि लक्षणें सांगून कर्मांचें गौणत्व सिद्ध केलें आहे. जीवांनीं जगण्यासाठीं व इष्ट फलांच्या सिद्धीसाठीं कर्म केलेंच पाहिजे. तसेंच, गुणकर्मानुसार जीं नित्य कर्में विहित म्हणून सांगितलीं आहेत, त्यांचेंही अनुष्ठान यथासांग केलें पाहिजे. काम्यकर्मानें जीव कांहीं काल जगतो आणि वेदविहित काम्यकर्मानें नियमित कालपर्यंत स्वर्गप्राप्ति होते. केवळ नित्यकर्मानें म्हणजे निष्कामकर्मानें अथवा ईश्वरार्पितकर्मानें चित्तशुद्धि होते. उपासनापूर्वक नित्य कर्म केलें तर मात्र हिरण्यगर्भलोकीं अमरत्व प्राप्त होतें. पण तेंही कल्पपर्यंत मात्र टिकणारें असतें. शिवाय या सर्व कर्मांत आयासही पुष्कळ असतात. सारांश, हा सर्व कर्म–प्रपंच अनित्यसुखानें व नित्य आयासानें परिपूर्ण भरला आहे. हें पाहून नित्यस्वरूपी जीवाला संसाराचा व त्यांतील कर्मांचा अत्यंत वीट येतो.

लागलींच तो नित्यस्वरूप सांगणाऱ्या अधिकाऱ्याला शरण जातो आणि त्या पासून ज्ञानोपदेश करून घेऊन पुरुषार्थ साध्य करितो. आपलें स्वरूप समजण्यासाठीं गुरूला अवश्य शरण गेलें पाहिजे. कारण भिन्न श्रुति एकच सत्य भिन्नप्रकारानें सांगतात, जीवाला अनेकप्रकारचे संशय असतात व ब्रह्म स्वतःच्या बुद्धीला अवेद्य असल्यामुळें समजत नाहीं. यासाठीं गुरु हवा. कारण, सर्व अडचणींचें निवारण करणारा हा श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ गुरु वेदांचा समन्वय करितो, संशयांचें निरसन करितो आणि अवेद्य ब्रह्म 'तें तूंच आहेस' असा महावाक्याचा उपदेश अधिकारी शिष्यास करून ब्रह्मज्ञान करून देतो. यासाठीं गुरूला शरण जाणें अवश्य आहे.

तिसऱ्या अथवा दुसऱ्या मुंडकाच्या पहिल्या खंडांत सृष्टीच्या उत्पत्तीचें विस्तारपूर्वक वर्णन केलें आहे. एका प्रदीप्त अग्नीपासून अग्निस्वरूपी अनंत स्फुलिंग उत्पन्न होतात, त्याप्रमाणें मायासंवलित ब्रह्मापासून अनंत ज्ञानरूपी जीव प्रकट होतात. ब्रह्म हें स्वतः स्वयंप्रकाश, एकरस, प्राणमनःशून्य, शुद्ध आणि सर्वश्रेष्ठ-मायेपेक्षांही श्रेष्ठ व विलक्षण आहे. ही अचिंत्य, अनिर्वचनीय आणि अघटित घटना करणारी माया प्राणशून्य ब्रह्मापासून प्राण, मनःशून्यापासून मन, एकरसापासून अनेक इंद्रियावयव आणि दिव्य स्वयंप्रकाश ब्रह्मापासून पंच महाभूतादि जड सृष्टि निर्माण करिते! हेंच मायेचें अघटितघटनापटुत्व होय. सारांश, मायेची संगति केल्यामुळें ब्रह्माला हिरण्यगर्भ, विराट्, चराचर इत्यादि स्थूल सूक्ष्म रूपें घ्यावीं लागून अग्नि, सोम, पृथ्वी पुमान्, आणि स्त्री हीं पंचाग्नि स्वरूपें धारण करावीं लागतात; तशींच, वेद, वेदोक्त कर्म, कर्मांगभूत देव (विज्ञानस्वरूपें) आणि जड प्रपंच इत्यादि स्वरूपें धारण करावीं लागतात. तथापि या सर्वांचा आत्मा एकच ब्रह्म आहे. सर्व विश्व, विश्वगतकर्म, तद्गत तपश्चर्या, ज्ञान आणि फल हीं सर्व दिसतात तशीं नसून ब्रह्मरूप आहेत. हें ज्यास गुरूपदेशानें समजतें, तो अज्ञान उत्पन्न करणाऱ्या मायेचा नाश करितो व सर्वत्र ब्रह्मनामक वस्तु आहे, असा निश्चय करून देतो.

दुसऱ्या मुंडकाच्या दुसऱ्या खंडांत म्हणजे या उपनिषदाच्या चौथ्या खंडांत साधन प्रकरणाचा विचार केला आहे. प्रथमतः स्वयंप्रकाश आणि देहत्रयाचें साक्षी (स्थूल, लिंग आणि कारण असे तीन देह जीवाला असतात. स्थूल देह म्हणजे आपलें हें दृश्य शरीर, लिंगदेह हा वासनामय आहे आणि कारणदेह हा अज्ञानमय आहे. असो; हे तीन देह जीवाला असतात) ब्रह्म, देहाच्या जागृत, स्वप्न, सुषुप्ति, ह्या तीन अवस्थांत ब्रह्म–जीवात्मा–सदैव जागृत असतें, हा विषय आहे. याचें ज्ञानरूप आपल्यास होणाऱ्या सर्व इंद्रियविज्ञानांहून श्रेष्ठ आणि विलक्षण आहे. तें कार्य-कारणशून्य आहे. या स्वरूपाचें श्रवण गुरुमुखानें होतें 'हें सर्वश्रेष्ठ, सर्वजगद्वंद्य स्वरूप तूंच आहेस' असा उपदेश श्रीगुरु करितो व असेंही सांगतो कीं, अचिंत्य ब्रह्माचें दृढ मनन केल्याशिवाय संशयाचा नाश व्हावयाचा नाहीं. यासाठीं अचिंत्य

ब्रह्माचें अखंड मनन केलें पाहिजे, असा तो उपदेश करितो. खरें आहे, सर्वात्मक ब्रह्म एक आहे असें नित्य चिंतन असावें, संशय निरास होईल आणि शेवटीं उपनिषत्प्रणीत ब्रह्माचें वेदोक्त ओंकारस्वरूपानें एकचित्त होऊन ध्यान करावें; म्हणजे आत्मसाक्षात्कार होईल.

" 'मी अज्ञ आहें ' असें भान असणें याचें नांव अविद्या; पण ' मी अज्ञ आहें ' म्हणजे मला ज्ञान नाहीं, हें मी जाणतो; हें ज्ञान मला आहे; माझ्या अज्ञानाचा मी साक्षी आहें, मीं अज्ञानाहून निराळा असून अज्ञान हा माझ्या ज्ञानाचा विषय आहे, सारांश मी ज्ञानरूप आहें, " असा मला माझ्या स्वरूपाचा गुरुजी बोध करितात आणि अज्ञाननिवृत्ति करितात. तसेंच "या चराचर विश्वांत मींच सर्वत्र भरलों आहे, माझाच महिमा ह्या दृश्यजगांत भरून उरला आहे, माझ्या शरीराचा, प्राणाचा आणि मनाचा नायक मी आहें." असें माझें स्वरूप ते मला दाखवितात. नंतर "माझ्या कर्तृत्वाचा साक्षीहि मीच आहें, म्हणून ' मी ' मध्यें कर्तृत्व नाहीं, कर्तृत्व अहंकाराचें आहे, अहंकाराला ज्ञान नाहीं, मीं ज्ञानस्वरूपी आहें, पण अहंकाराचे कर्तृत्वाचा माझ्यावर आरोप होतो आणि ज्ञानस्वरूपाचा आरोप अहंकारावर होतो; व अशी अहंकारचैतन्यांची ग्रंथी झाल्यानें अज्ञान उत्पन्न होतें, तें अज्ञान नाहींसें करून टाक, कर्तृत्वासह अहंकारही सोडून दे, म्हणजे तुझें स्वरूप तुला कळेल." असा बोध गुरुजी करितात. हा बोध पूर्ण पटला म्हणजे चित्तचैतन्यांची पडलेली मगरमिठी सुटते, संशय तुटतात आणि कर्में नष्ट होतात. हें केव्हां होतें ? जेव्हां सर्वश्रेष्ठ जी अक्षरस्वरूपी माया तीही ज्याहून कमी योग्यतेची आहे, त्या परमात्म्याचें स्वरूप समजलें आणि पटलें, म्हणजे हृदयग्रंथींचा स्फोट होऊन नित्य असणाऱ्या शुद्ध ब्रह्माचें ज्ञानविज्ञान होतें व तें आनंदरूप, प्रकाशमय ब्रह्म नित्य आहे असें स्पष्ट दिसतें, या सर्वावभासक ब्रह्माचें स्वरूप दाही दिशांस स्पष्ट दिसूं लागतें आणि ' एकमेवाद्वितीयं ' या महावाक्याचा साक्षात्कार होतो. हीच अखंड समाधि होय. ही स्थिति साधणारीं श्रवणमननध्यानात्मक साधनें या खंडांत सांगितलीं.

तिसऱ्या मुंडकाच्या पहिल्या खंडांत ' एकमेवाद्वितीयं ' या महावाक्याचा विस्तार आहे. तसेंच श्रवणादिसाधनत्रयासह सत्य, तपादि सहकारीसाधनांचा विचारही येथें केला आहे. मागें सांगितलेल्या प्रकरणांत उपदिष्ट केलेल्या समाधीचें व्युत्थान झालें म्हणजे व्यवहार उत्पन्न होतो व जीव आणि ईश असे एकाच वृक्षावर राहणारे दोन पदार्थ भासूं लागतात. जीव बुभुक्षु असतो आणि ईश साक्षी असतो. आत्मज्ञानाचा बोध होण्यापूर्वीं चिद्रूपी जीव अहंकारपंकांत निमग्न होतो म्हणून तो स्वतःचा दुबळेपणा व येणारीं संकटें पाहून शोकाकुल होतो. अर्थात् ही माया आहे. हिचें वास्तव्य भोक्त्याचे ठिकाणीं असतें. तसेंच मायेचें ज्ञान व मायेच्या निरासाचें ज्ञानही भोक्त्यालाच होतें. बोध

झाल्यानंतर भोक्तृत्वाची आणि जीवाची विघातक मैत्री तुटते, तो पापपुण्यापासून निराळा होऊन शोकमुक्त होतो आणि ईशाचें व जीवाचें परम साम्य होतें म्हणजे तादात्म्य होतें. हें झाल्यावर जीवाचे सर्व संशय नष्ट होतात, वादविवाद संपतात, त्याचे विहार आत्म्याशीं, त्याचें प्रेम आत्म्यावर व त्याचें सर्व कर्म आत्मपर होते. या स्थितीला जीवन्मुक्त स्थिति असे म्हणतात. जीवन्मुक्ताला ब्रह्मविद्वरिष्ठ असेंही मंगलदायक नाम प्राप्त होतें.

असो; ब्रह्मप्राप्तीला यथार्थ ज्ञानासह सत्य, तप, ब्रह्मचर्य यांचें अखंड वास्तव्य हवें आहे. मागें सांगितल्याप्रमाणें निर्गुण, निराकार, निरवयव, नित्यसिद्ध आत्मा आत्मज्ञानानें मात्र प्राप्त होतो, अन्यथा नाहीं. असो; या जीवन्मुक्ताच्या सर्व इच्छा परिपूर्ण झालेल्या असतात व तो सत्यसंकल्पी असतो म्हणून त्याच्या आकस्मिक इच्छा पूर्णही होतात. म्हणून कल्याणेच्छु पुरुषानें ब्रह्मज्ञ पुरुषाची सेवा अखंड करावी.

तिसऱ्या मुंडकाच्या दुसऱ्या खंडांत म्हणजे या उपनिषदाच्या शेवटच्या खंडांत ब्रह्मज्ञानाची फलश्रुति सांगितली आहे. जेथें सर्व विश्व ब्रह्माच्या सत्तेनें अस्तित्व पावून ब्रह्मतेजानें मात्र प्रकाशित होतें, तें श्रेष्ठ ब्रह्म अथवा एक व अद्वितीय ब्रह्मस्वरूप ज्याला समजतें, त्या ब्रह्मज्ञ पुरुषाची जे साधक निष्काम उपासना करितात, त्यांचेंही जन्ममरण-विमोचन होतें. विषयेच्छेनें ब्रह्मभजन केलें तर जन्ममरणाचा प्रसंग येतो पण ब्रह्माच्या लाभासाठीं भजन केलें तर मोक्ष मिळतो. या सर्व गोष्टी होण्याला परमेश्वराचा अनुग्रह हवा. हा अनुग्रह शुद्धचित्त झालेल्या ज्ञानी उपासकाला मात्र साध्य आहे. तसेंच आत्मबलाची, सावधानतेची आणि ब्रह्म-हेतुक वैराग्याचीही आवश्यकता आहे. या साधनांसह सत्यतपादिकांच्या योगें ज्ञानी उपासकाला ईश्वरानुग्रहानें साक्षात्कार होतो, तो जन्ममरणमुक्त होतो, त्याच्या सर्व उपाधी आपापल्या कारणांमध्यें जाऊन लीन होतात आणि नामरूपें सोडून दिलेल्या नद्या समुद्रांत मिळाल्यानंतर समुद्राकार होतात, त्याप्रमाणें मुक्त पुरुष ब्रह्माकार होतात. ब्रह्मवेत्ता ब्रह्म होतो. त्याला शोक करण्याचें कारण रहात नाहीं व त्याचीं पापें संपतात. कारण चित्त आणि चैतन्य यांची मिठी तुटलेली असते. चित्तापासून चैतन्य सुटलें म्हणजे कर्म-कर्तृत्व संपतें. आणि कर्मापासून उत्पन्न होणारें दुःखही संपतें. शुद्ध जीव शुद्ध ब्रह्म होतो. शेवटीं, या उपनिषदाच्या वाचकांस व विशेषतः अथर्ववेदीयांस शिरोव्रत करण्यास सांगितलें आहे व या व्रताचें अनुष्ठान करून या उपनिषदाचें अध्ययन करावें, असा विधि विहित केला आहे. आणि संप्रदायपरंपरा चालू ठेवणाऱ्या सर्व ऋषींस द्विवार नमउक्ति करून उपनिषदाची परिसमाप्ति झाली आहे.

येणेंप्रमाणें जाणण्यास योग्य असणाऱ्या परापरविद्यांचा विवेक, अपरविद्येचें गौणत्व, आणि त्याचीं कारणें पराविद्येचें श्रेष्ठत्व, ब्रह्माचें एकात्मकत्व, ब्रह्मविद्येचीं मुख्य साधनें, जीवेशांच्या स्वरूपवर्णनासह सत्यादि इतर साधनें आणि शेवटीं ईश्वरानुग्रह झाल्यामुळें झालेली ब्रह्मज्ञानप्राप्ति हे विषय या उपनिषदांत आले आहेत.

ईश, केन, कठ, आणि प्रश्न या उपनिषदांचें वाचन करून मुंडकाचें अध्ययन करण्यास प्रारंभ केला, तेव्हां मृच्छकटिक नाटकांतील वसंतसेनेच्या मंदिरांत प्रवेश केलेल्या विदूषकाप्रमाणें माझ्या मनाची स्थिति झाली. एकापेक्षां एक श्रेष्ठ असे अनेक चौक पाहून गर्भ-श्रीमंत चारुदत्ताचा मित्र असणारा विदूषकही भांबावून गेला, त्याप्रमाणें प्रत्येक उपनिषदांतील सत्यस्वरूपी संचय पाहून व त्यांचें सौंदर्य लक्ष्यांत येऊन माझें चित्त भांबावून जातें; तथापि ह्या पांचही उपनिषदांत एकच परमार्थसत्य-रत्नें सर्वत्र विखुरलेलीं दृष्टीस पडतात व त्यामुळें अर्थसौंदर्यानें भांबावून गेलेल्या चित्तालाही ब्रह्मगत सिद्धांतांनीं स्थैर्य येतें. असा कांहींसा प्रकार उपनिषदांच्या सर्व वाचकांचा होत असेल, यांत संदेह नाहीं. तथापि वस्तुतः एकच ब्रह्म सर्वत्र ओतप्रोत भरलेलें आहे, सर्व ब्रह्मांड ब्रह्म, त्याला पाहणारा मी ब्रह्म, आणि माझें पाहणेंही ब्रह्म असा ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान यांस एकरूपता आणणारा सिद्धांत आपल्या चित्तांत दृढ केला, तर क्वचित् प्रसंगीं दृश्य होणाऱ्या विरोधांचा परिहार होतो आणि विश्वांतील सर्व ज्ञेयवस्तूंचा व विश्वाचा व्यवहारिक उलगडा करितां येतो. व्यवहारांत ठरलेले नित्य सिद्धांत व्यावहारांत मात्र सत्य असतात, हें ज्ञानी पुरुषास उघड, पण अज्ञान्याला गूढ असणारें तत्त्व ध्यानांत ठेविलें, तर प्रपंचांतील वैषम्यें आणि प्रपंचांत होणारीं दुःखें नाहींशीं होतात. कदाचित् संसारस्थितींत दुःखादि खरें असेल, पण परमार्थांत त्याची किंमत कांहीं नाहीं. दुःख नित्य नाहीं. आनंद नित्य आहे; माया नित्य नाहीं, ज्ञान नित्य आहे; आणि जन्ममरण नित्य नाहीं, अमृतास्थिति नित्य आहे; असें ज्यास कळूं लागतें आणि हें कळणें आचरणांत स्पष्ट उमटतें, तो पुरुष धन्य, खरोखरच धन्य होय.

या उपनिषदाचें रहस्य ज्याला निश्चितपणानें व यथार्थ समजतें, त्याच्या दुःखांचें आदिकारण जी अविद्या, ती नष्ट होते, कापिली जाते, खरडली जाते, अविद्यादिरूपी केशनखासारख्या उपाधी काढल्या जातात म्हणून या उपनिषदाला 'मुंडक' हें सार्थ नांव दिलें आहे. केश मुंडावयाचें, हें काम नापिकाचें आहे! कर्म करावयास लावणाऱ्या अविद्येचें मुंडण करून ज्ञानाचें श्रेष्ठत्व या ग्रंथांत स्थापित केलें आहे. म्हणून हा ग्रंथ अलौकिक होय.

'आधीं मन मुंडा, मन मुंडा। कशासि मुंडितां तुंडा॥'

हा उपदेश किती श्रेयस्कर आहे बरें?

विषयाची समजूत पटण्यासाठीं व विषयाचें तात्पर्य एकदम लक्षांत येण्यासाठीं लिहिलेली ही प्रस्तावना सार्थ होवो असें त्या विश्वनियामक प्रभूपाशीं मागणें मागून ही लहानशी प्रस्तावना येथें संपवितों.

चिं० गं० भानु.

---

# मुण्डकोपनिषत्.

## शाङ्करभाष्यसमेता ।

ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ।

**ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः ।**
**भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥**
**स्थिरैरङ्गैस्तुष्टुवाꣳसस्तनूभिः ।**
**व्यशेम देवहितं यदायुः ॥**
**ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।**

या शांतिमंत्राचा अर्थ प्रश्नोपनिषदांत दिलाच आहे, म्हणून त्याची पुनरुक्ति येथें करण्याचें आवश्यकत्व दिसत नाहीं.

ॐ ब्रह्मा देवानामित्याद्याथर्वणोपनिषत् । अस्याश्च विद्यासंप्रदायकर्तृपारम्पर्यलक्षणसंबन्धमादावेवाऽऽह स्वयमेव स्तुत्यर्थम् । एवं हि महाद्भिः परमपुरुषार्थसाधनत्वेन गुरुणाऽऽयासेन लब्धा विद्येति श्रोतृबुद्धिप्ररोचनाय विद्यां महीकरोति । स्तुत्या प्ररोचितायां हि विद्यायां सादराः प्रवर्तेरन्निति । प्रयोजनेन तु विद्यायाः साध्यसाधनलक्षणसंबन्धमुत्तरत्र वक्ष्यति—" भिद्यते हृदयग्रन्थिः " इत्यादिना । अत्र चापरशब्दवाच्यायामृग्वेदादिलक्षणायां विधिप्रतिषेधमात्रपरायां विद्यायां संसारकारणाविद्यादिदोषनिवर्तकत्वं नास्तीति स्वयमेवोक्त्वा परापरविद्याभेदकरणपूर्व"कमविद्यायामन्तरे वर्तमाना" इत्यादिना । तथा परप्राप्तिसाधनं सर्वसाधनसाध्यविषयवैराग्यपूर्वकं गुरुप्रसादलभ्यां ब्रह्मविद्यामाह–"परीक्ष्य लोकानि"त्यादिना । प्रयोजनं चासकृद्ब्रवीति "ब्रह्म वेद ब्रह्मैव भवती"ति । "परामृताः परिमुच्यन्ति सर्व" इति च । ज्ञानमात्रे यद्यपि सर्वाश्रमिणामाधिकारस्तथाऽपि संन्यासनिष्ठैव ब्रह्मविद्या मोक्षसाधनं न कर्मसहितेति "भैक्ष्यचर्यां चरन्तः" "संन्यासयोगादि"ति च ब्रुवन्दर्शयति । विद्या-

कर्मविरोधाच्च । न हि ब्रह्मात्मैकत्वदर्शनेन सह कर्म स्वप्नेऽपि संपादयितुं शक्यम् । विद्यायाः कालविशेषाभावादनियतनिमित्तत्वात्कालसंकोचानुपपत्तिः । यत्तु गृहस्थेषु ब्रह्मविद्यासंप्रदायकर्तृत्वादि लिङ्गं न तत्स्थितन्यायं बाधितुमुत्सहते । न हि विधिशतेनापि तमःप्रकाशयोरेकत्वसद्भावः शक्यते कर्तुं किमुत लिङ्गैः केवलैरिति । एवमुक्तसंबन्धप्रयोजनाया उपनिषदोऽल्पाक्षरं ग्रन्थविवरणमारभ्यते । य इमां ब्रह्मविद्यामुपयन्त्यात्मभावेन श्रद्धाभक्तिपुरःसराः सन्तस्तेषां गर्भजन्मजरारोगाद्यनर्थपूगं निशातयति परं वा ब्रह्म गमयत्यविद्यादिसंसारकारणं चात्यन्तमवसादयति विनाशयतीत्युपनिषत् । उपनिपूर्वस्य सदेरेवमर्थस्मरणात् ।

## हरिः ॐ

**सिद्धान्ती**—हें उपनिषद् आथर्वण वेदांतर्गत आहे. येथें प्रथमतः श्रुतीनें ब्रह्मविद्येचा संप्रदाय प्रवृत्त करणाऱ्या महापुरुषांच्या परंपरेचा अवतार केला आहे, विद्येचें लक्षण सांगितलें आहे व संबंधही आपणच सांगितला आहे. किंवा असाही अर्थ होईल कीं, संप्रदाय कर्त्यांच्या परंपरेनें अंकित जो संबंध सांगितला आहे, त्याचा हेतु हा आहे कीं, विद्येची स्तुति व्हावी. असें केलें असतां परमपुरुषाची प्राप्ति करून देणारीं साधनें महा आयासानें मोठमोठ्या पुरुषांनीं केलीं तेव्हां त्यांस ब्रह्मविद्या प्राप्त झाली, असें समजतें आणि श्रोत्यांची बुद्धि व इच्छा तरतरित होतात. असें आहे म्हणून येथें श्रुतीनें विद्येचें महत्त्व सांगितलें आहे. उघडच आहे कीं, फलस्तुति सांगून बुद्धीला प्रवृत्त केलें म्हणजे मुमुक्षुलोकांना ब्रह्मविद्येची आवड उत्पन्न होऊन ते तिच्या प्राप्तीसाठीं आदरपूर्वक प्रयत्न करितात. ब्रह्मपदार्थ साधून देणें हें जें विद्येचें प्रयोजन आहे, तें या उपनिषदाचेंही आहे, असें दाखविण्यासाठीं पुढें ( दुसऱ्या मुण्डकाच्या दुसऱ्या खंडांतील आठव्या मंत्रांत—भिद्यते हृदयग्रंथिः—या मंत्रांत ) साध्य, साधन, आणि लक्षण संबंध सांगितले आहेत. असो, या उपनिषदांत अपरविद्या म्हणून सांगितली आहे ती ऋग्वेदादिलक्षणपर असून ‘करावें काय,’ असें सांगणारे विधि आणि ‘करूं नये काय’ असें सांगणारे प्रतिषेध मात्र जिच्यामध्यें आहेत अशा लक्षणाची आहे. या अपरविद्येला संसार उत्पन्न करणाऱ्या अज्ञानादिदोषांचे निरसन करण्याचें सामर्थ्य नाहीं, असें श्रुति स्वतःच सांगत आहे. तसेंच, परविद्या ( ब्रह्मविद्या ) आणि अपरविद्या ( विधि निषेध सांगणाऱ्या विद्या ) यांच्यामध्यें विलक्षण भेद आहे, हें पहिल्या मुण्डकांतील दुसऱ्या खंडांत आठव्या मंत्रापासून तों दहाव्यापर्यंत जे संसारपर, संसारविषयक, मंत्र आहेत त्यांवरून व परब्रह्म प्राप्तीचें साधन असणारीं व सर्व साधन—विषय व साध्य—विषय यांच्या

ठिकाणीं तीव्र वैराग्य उत्पन्न झाल्यानंतर गुरूच्या प्रसादानें मात्र साध्य होणारी, ब्रह्मविद्या आहे, असें त्याच मुंडकाच्या बाराव्या व तेराव्या मंत्रांत सांगितलें आहे, त्यांवरून सिद्ध होतें.

(सारांश, ऋग्वेदादि सर्व आधिभौतिक व आधिदैविक शास्त्रांचा अंतर्भाव अपराविद्येंत होतो, आणि ऐहिक व स्वर्गस्थ संसार (सांसारिक उपभोग) कसे असतात व ते उत्तम-रीतीनें कसे प्राप्त होतील तें हीं शास्त्रें सिद्धांतांनीं व विधिप्रतिषेधांनीं सांगत असतात व्यवहार म्हणजे काय ? आणि व्यवहारांत कसें वागलें असतां उत्तम विषयसुख मिळेल, हें सांगण्यासाठीं ऋग्वेदादि अपरविद्या प्रवृत्त झाल्या आहेत. पण ब्रह्मविद्या प्रापंचिक दुःखांचा लय करून परमपुरुषार्थाचें स्वरूप सांगते. ही विद्या संपादन करण्याला विषय–वैराग्य हवें. वैराग्याला विवेकाचें पाठबळ उत्तम असावें लागतें. वैराग्य प्राप्त झालें म्हणजे चित्ताचा उपशम होतो व पुढें मोक्षाची तीव्र इच्छा प्राप्त झाल्यावर गुरु-प्रसादानें ब्रह्मविद्येची प्राप्ती होते. सारांश, परविद्या ही मोक्षस्वरूप सांगून त्याची प्राप्ति करून देणारी विद्या आहे. )

ब्रह्मविद्येचें प्रयोजन उघडच आहे आणि तें या उपनिषदामध्यें अनेक वेळ सांगि-तलें आहे. 'ज्याला ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान होईल तो ब्रह्मरूप होतो.' 'जे लोक ब्रह्म-विद्यामृताचें ज्ञानपूर्वक आपान करितात, ते सर्वथा मुक्त होतात.' इत्यादि मंत्र ब्रह्मविद्येचें प्रयोजन सांगतात.

आतां, यद्यपि चारी आश्रमांतील लोकांना ज्ञान–संपादनाचा अधिकार आहे, तथापि संन्यासनिष्ठ ब्रह्मविद्या हीच एक मोक्षाचें साधन आहे, असें या उपनिषदांत 'भिक्षावृत्तीचें अवलंबन करून' व 'संन्यासयोगानें' या मंत्रानीं स्पष्ट सांगितलें आहे. ब्रह्मविद्येंत कर्माचा कोणत्याही प्रकारानें संबंध येत नाहीं. कारण, विद्या आणि कर्म या उभयतांमध्यें तीव्र विरोध आहे. ब्रह्म आणि आत्मा ( परमात्मा आणि प्रत्यगात्मा ) हे दोन्ही एकात्मक आहेत, एक आहेत, असें ज्ञान झालेल्या पुरुषानें कर्म करावें असें स्वप्नामध्यें सुद्धां म्हणतां येण्याचा संभव नाहीं; किंवा 'तूं कर्म कर' असा विधि ब्रह्मज्ञ पुरुषाला विहित करणें शक्य नाहीं. उघड आहे कीं, ब्रह्मविद्येमध्यें भूत–भविष्य–वर्तमान इत्यादि कालविभागांचा अभाव असतो. तसेंच कार्य–कारणांचाही व नित्यविधींचा संबंध नसतो. जेथें एकच अनाद्यनंत व सर्वव्यापी वस्तु आहे, तेथें कार्यकारणसंबंध कोठून असणार ? पण कर्मामध्यें पूर्वकाल व उत्तरकाल पाहण्याचा व कार्यकारणांचे अस्तित्वाचा प्रसंग असतो, तसा काल–संकोच करण्याचें कारण येथें असत नाहीं, म्हणून कालशून्य–विद्या आणि कालांत करावें लागणारें कर्म या उभयतांमध्यें अत्यंत विरोध आहे. आतां, ब्रह्मविद्येच्या संप्रदायाचीं कर्तृत्वादि लिंगें गृहस्थांमध्यें केव्हां केव्हां सांपडतात, ( केव्हां केव्हां कांहीं गृहस्थ ब्रह्मविद्येच्या संप्रदायाचे कर्ते आहेत असें कळतें. ) हें खरें, तथापि हें लिंगस्थापन न्यायशुद्ध नाहीं. त्याचा बाध होणें ही गोष्ट अत्यंत सहज आहे. पहा कीं, तम आणि प्रकाश हे उभयतांही एकाठिकाणीं एक वेळीं

आहेत, असें हजारो विधींनीं जरी ठरविलें तथापि त सिद्ध होणें शक्य नाहीं. मग जेथें केवळ एक 'संप्रदायकर्तृत्व' चिह्न मात्र असेल त्याची काय कथा ? याप्रमाणें या विद्येचा संबंध आणि प्रयोजन या दोन गोष्टी सांगून, आम्ही आतां या मुण्डकोपनिषदाचें लहानसें विवरण करण्यास आरंभ करितों. जो कोणी आत्मभाव ठेवून ( श्रद्धा आणि भक्तीसह ) या ब्रह्मविद्येचे आराधन करितो; त्याच्या गर्भवास, जन्म, वृद्धपणा, रोग इत्यादि अनर्थ-समूहाला ही ब्रह्मविद्या शिथिल करिते, ही विद्या अनर्थ 'निषद्' म्हणजे नाहींसे करितें, किंवा परब्रह्मापर्यंत घेऊन जातें किंवा अविद्यादि संसारकारणांचा अत्यंत विनाश करितें म्हणून त्या विद्येला उपनिषद् ( अनर्थ नाहींसें करणारा, ब्रह्माजवळ घेऊन जाणारा, व संसाराचा उच्छेद करून स्वरूपदर्शन घेत घेत ब्रह्मापर्यंत पोचविणारा ग्रंथ) असें म्हणतात. कारण, उपनिषद् या (उप+निपूर्वक 'सद्') शब्दाचा अर्थ आम्ही आतां सांगितल्याप्रमाणें आहे, असें स्मृतीचें म्हणणें आहे.

---

## मंत्र पहिला.

**ॐ ब्रह्मा देवानां प्रथमः संबभूव विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता । स ब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठामथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—ब्रह्मा देवानां प्रथमः संबभूव । सः विश्वस्य भुवनस्य कर्ता च गोप्ता । सर्व-विद्या-प्रतिष्ठां ब्रह्मविद्यां सः ज्येष्ठ-पुत्राय अथर्वाय प्राह** ( सर्वश्रेष्ठ ब्रह्मा-हिरण्यगर्भ-हा इतर सर्व देवांच्या आधीं उत्पन्न झाला. हा विश्वांतील सर्व भुवनांचा कर्ता असून त्यांचें रक्षण करणाराही आहे त्यानें सर्व विद्यांस आश्रय देणारी ब्रह्मविद्या अथर्वनामक ज्येष्ठ पुत्रास यथासांग सांगितली. ) ॥ १ ॥

ब्रह्मा परिवृढो महान्धर्मज्ञानवैराग्यैश्वर्यैः सर्वानन्यानतिशेत इति । देवानां द्योतनवतामिन्द्रादीनां प्रथमो गुणैः प्रधानः सन्प्रथमोऽग्रे वा संबभूवाभिव्यक्तः सम्यक्स्वातन्त्र्येणेत्यभिप्रायः । न तथा यथा धर्माधर्मवशात्संसारिणोऽन्ये जायन्ते । "योऽसावतीन्द्रियोऽग्राह्यः" इत्यादिस्मृतेः । विश्वस्य सर्वस्य जगतः कर्तोत्पादयिता । भुवनस्योत्पन्नस्य गोप्ता पालयितेति विशेषणं ब्रह्मणो विद्यास्तुतये । स एवं प्रख्यातमहत्त्वो ब्रह्मा ब्रह्मविद्यां ब्रह्मणः परमात्मनो विद्यां ब्रह्मविद्याम् । 'येनाक्षरं पुरुषं वेद सत्यम्' इति विशेषणात्परमात्मविषया हि सा । ब्रह्मणा वाऽग्रजेनोक्तेति ब्रह्मविद्यां । तां सर्वविद्या-

प्रतिष्ठां सर्वविद्याभिव्यक्तिहेतुत्वात्सर्वविद्याश्रयामित्यर्थः । सर्वविद्यावेद्यं वा वस्त्वनयैव विज्ञायत इति । "येनाश्रुतं श्रुतं भवति अमतं मतमविज्ञातं विज्ञातम्" इति श्रुतेः । सर्वविद्याप्रतिष्ठामिति च स्तौति । विद्यामथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह । ज्येष्ठश्चासौ पुत्रश्चानेकेषु ब्रह्मणः सृष्टिप्रकारेष्वन्यतमस्य सृष्टिप्रकारस्य प्रमुखे पूर्वमथर्वा सृष्ट इति ज्येष्ठस्तस्मै ज्येष्ठपुत्राय प्राहोक्तवान् ॥ १ ॥

**सि०** ब्रह्मदेव हा इतर सर्वांपेक्षां अत्यंत श्रेष्ठ आहे. धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, इत्यादि सर्व गुण ब्रह्मदेवांमध्यें सर्वांपेक्षां जास्तपणानें सांपडतात म्हणून तो सर्वदेवांहून श्रेष्ठ आहे. असें आहे म्हणूनच त्याला सर्वांचा स्वामी असें म्हणतात. हा आतांच सांगितल्याप्रमाणें दिव्य व प्रकाशवंत इंद्रादिदेवांच्या समूहांत सद्गुणानें 'प्रथमता' व प्रमुखता पावला आहे, अथवा त्याचा जन्म सर्वांच्या अगोदर झाला आहे. येथें श्रुतीचा अभिप्राय हा आहे कीं, त्याचा आविर्भाव-त्याचा अवतार–'सम्यक्' म्हणजे स्वतंत्रतेनें 'बभूव' म्हणजे झाला. संसारी लोकांप्रमाणें पापपुण्याला वश झाल्यामुळें ब्रह्मदेवाला जन्मप्राप्ति झाली नाहीं. धर्माधर्मांच्या संचिताप्रमाणें संसारी लोकांचें जन्मद प्रारब्ध उत्पन्न होतें, पण ब्रह्मदेवाला प्रारब्ध–परतंत्र होऊन जन्म प्राप्ति होत नाहीं. 'जो हा अतींद्रिय असल्यामुळें अगोचर आहे' असें स्मृति ब्रह्मा-संबंधें म्हणते. असो. हा सर्व विश्वाला उत्पन्न करणारा आणि उत्पन्न केलेल्या जगाचें पालन करणारा आहे. जगत्कर्तृत्व व तत्पालकत्व हीं विशेषणें ब्रह्मदेवाला उपयोजिलीं आहेत, तीं केवळ ब्रह्मविद्येचें माहात्म्य कळावें म्हणून होत. असो. अशा प्रकारचे ज्याचें महत्त्व सुप्रसिद्ध आहे, त्या ब्रह्मदेवानें परमात्म्याचें स्वरूप सांगणारी, 'जिच्या साहाय्यानें अविनाशी पुरुषोत्तमाचें सत्यस्वरूप सांगतां येतें' ती परमात्मविद्या आपल्या श्रेष्ठ पुत्राला म्हणजे अथर्वाला सांगितली. ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न केली तेव्हां सर्वांच्या अगोदर अथर्वाची उत्पत्ति केली; असें पूर्वेतिहासवेत्ते सांगतात. सर्वांच्या आधीं ज्याची उत्पत्ति झाली त्या ब्रह्मदेवानें ही विद्या सांगितली म्हणूनही या विद्येला ब्रह्मविद्या असें म्हणावें. इतर सर्वविद्यांच्या म्हणजे शास्त्रांच्या अस्तित्वाला व प्रकटीकरणाराला कारण होणारी, सर्व विद्यांस आश्रय देणारी ही ब्रह्मविद्या आहे, सर्व वेदशास्त्रांस जें काय सांगावयाचें आहे तें ब्रह्म ब्रह्मविद्येनें समजतें, म्हणून तिला 'सर्वविद्यांचा आश्रय' अशा अर्थाचें पद श्रुतीनें उपयोजिलें आहे. 'ज्याच्यायोगानें न ऐकलेलें-किंवा न ऐकतां येण्यासारखें ऐकावयास सांपडतें. न समजलेलें किंवा न समजणारें समजतें, न उमजणारें किंवा न उमजलेलें उमजतें' अशी श्रुतीनें ज्ञानसर्वस्वाला आधार असणाऱ्या ब्रह्मविद्येची स्तुति केली आहे. असो, सर्व विद्यांस आश्रय देणारी ब्रह्मविद्या ब्रह्मदेवानें प्रथमतः आपल्या प्रथम पुत्रास निवेदन केली. ब्रह्मदेवानें अनेक वेळ सृष्टि उत्पन्न केली आहे, त्यांतील एका सृष्टीच्या उत्पत्तिसमयीं प्रथम अथर्व्याची उत्पत्ति केली, म्हणून त्याला जेष्ट म्हटलें.

**श्रीमन्मद्वाचार्य** यांनीं या उपनिषदावर भाष्य लिहिलें आहे त्याच्या आरंभी जें नमन केंलें आहे, त्यांतच उपनिषाचा भावार्थ आणिला आहे आणि विषयाचा प्रवेश करितांना वैवस्वतनामक मन्वंतरांत ब्रह्मदेवाचा अथर्वा नामक अथर्वण-वेदवेत्ता जेष्ठ पुत्र अत्यंत प्रिय होता म्हणून त्याला ब्रह्मविद्येचा उपदेश केला इत्यादि मनोरंजक माहिती सांगितली आहे. विद्या शब्दाची 'विंदति' मिळते जिच्याद्वारा ती विद्या, प्राप्त होते ती विद्या, अशी व्युत्पत्ति दिली आहे व ब्रह्म मिळवून देणारी विद्या ती ब्रह्मविद्या असें ठरविलें आहे.

---

## मंत्र दुसरा.

**अथर्वणे यां प्रवदेत ब्रह्माऽथर्वा तां पुरोवाचाङ्गिरे ब्रह्मविद्याम् । स भारद्वाजाय सत्यवहाय प्राह भारद्वाजोऽङ्गिरसे परावराम् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः**—ब्रह्मा अथर्वणे यां प्रवदेत तां ब्रह्मविद्यां अथर्वा पुरा अंगिरे उवाच ( ब्रह्मदेवानें जी विद्या अथर्वाला सांगितली ती अथर्वानें प्रथमतः अंगिरा नामक ऋषीला सांगितली. ) सत्यवहाय भारद्वाजाय सः प्राह, भारद्वाजः परावरां अंगिरसे प्राह ( भरद्वाज कुलोत्पन्न सत्यवहाला अंगिरानें ही ब्रह्मविद्या प्रथम सांगितली आणि भारद्वाजानें ही सर्व विद्यांस आश्रय देणारी 'परावरा' विद्या अंगिरसाला सांगितली. )

यामेतामथर्वणे प्रवदेतावदद्ब्रह्मविद्यां ब्रह्मा तामेव ब्रह्मणः प्राप्तामथर्वा पुरा पूर्वमुवाचोक्तवानङ्गिरेऽङ्गिर्नाम्ने ब्रह्मविद्याम् । स चाङ्गिर्भारद्वाजाय भरद्वाजगोत्राय सत्यवहाय सत्यवहनाम्ने प्राह प्रोक्तवान् । भारद्वाजोऽङ्गिरसे स्वशिष्याय पुत्राय वा परावरां परस्मात्परस्मादवरेण प्राप्तेति परावरा परावरसर्वविद्याविषयव्याप्तेर्वा । तां परावरामङ्गिरसे प्राहेत्यनुषङ्गः ॥ २ ॥

**सिद्धान्तीः**—ब्रह्मदेवानें जी ब्रह्मविद्या अथर्वणाला सांगितली, तीच ब्रह्मदेवापासून प्राप्त झालेली विद्या अंगिरा नामक ऋषीला अथर्वा प्रथम सांगता झाला. त्यानें भारद्वाज गोत्रांतील सत्यवहाला या ब्रह्मविद्येचें दान केलें. त्यानेंही आपला शिष्य किंवा पुत्र जो अंगिरस् त्याला, ही गुरूपासून शिष्यास, अशा परंपरेनें प्राप्त झालेली किंवा सर्वश्रेष्ठ व कनिष्ठ विद्या-विषयांस अंतर्भूत करणारी ब्रह्मविद्या सांगितली ॥ २ ॥

**श्रीमध्वाचार्य**—'परावरा' याचा विग्रह, परा असून जी अवरा असते (श्रेष्ठ असून जी कनिष्ठ असते) ती परावरा विद्या होय, असा कर्मधारय समास आहे. विद्या एकच आहे. ऋग्वेदादि वेद कर्मपर उद्घाटिले म्हणजे अपराविद्या होते आणि तेच वेद ब्रह्मपर उद्घाटिले, म्हणजे पराविद्या होते. सर्व वेद श्री विष्णूचें स्वरूप वर्णन करितात. साक्षात् श्री विष्णुपर व्याख्यान केलें, म्हणजे जी विद्या परा होते तीच विद्या कर्माचें व्याख्यान करूं लागली, विष्णूचें परोक्षवर्णन करूं लागली, म्हणजे अपरा होते. पूर्वी वेद एकच होता. त्रेतायुगांत तीन वेद झाले आणि पुढें पांच वेद झाले, असा इतिहास वराहादि पुराणांच्या साहाय्यानें समजतो. येथेंही 'तदेतत् सत्यम्' इत्यादि मंत्रांनीं अपरविद्येचा उल्लेख करून 'येनाक्षरं पुरुषं वेद' इत्यादि मंत्रांनीं पराविद्या सांगितली आहे, असें हे आचार्य म्हणतात आणि 'काय समजलें असतां सर्व समजतें' या प्रश्नाला 'विद्या' हें एकच उत्तर आहे असें ठरवितात.

---

## मंत्र तिसरा.

**शौनको ह वै महाशालोऽङ्गिरसं विधिवदुपसन्नः पप्रच्छ । कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ—महाशालः शौनकः अंगिरसं वै विधिवत् उपसन्नः पप्रच्छ ह** (महागृहस्थाश्रमी शौनक हा अंगिरसाकडे वेदविहितपद्धतीनें गेला आणि त्याला विचारता झाला) **भगवः, कस्मिन् नु विज्ञाते इदं सर्वं विज्ञातं भवति इति** (हे भगवन्! कोणती एक वस्तु जाणली असतां हें सर्व जाणतां येतें बरें?) हा शौनकाचा प्रश्न होय. ॥ ३ ॥

शौनकः शुनकस्यापत्यं महाशालो महागृहस्थोऽङ्गिरसं भारद्वाजशिष्यमाचार्यम् । विधिवद्यथाशास्त्रमित्येतत् । उपसन्न उपगतः सन्पप्रच्छ पृष्टवान् । शौनकाङ्गिरसोः संबन्धादर्वाग्विधिवद्विशेषणादुपसदनविधेः पूर्वेषामनियम इति गम्यते । मर्यादाकरणार्थं मध्यदीपिकान्यायार्थं वा विशेषणम् । अस्मदादिष्वप्युपसदनविधेरिष्टत्वात् । किमित्याह—कस्मिन्नु भगवो विज्ञाते, नु इति वितर्के, भगवो हे भगवन्सर्वं यदिदं विज्ञेयं विज्ञातं विशेषेण ज्ञातमवगतं भवतीत्येकस्मिञ्ज्ञाते सर्वविद्भवतीति शिष्टप्रवादं श्रुतवाञ्छौनकस्तद्विशेषं विज्ञातुकामः सन्कस्मिन्निति वितर्कयन्पप्रच्छ । अथवा लोकसामान्यदृष्ट्या

ज्ञात्वैव पप्रच्छ । सन्ति लोके सुवर्णादिशकलभेदाः सुवर्णत्वाद्येकत्व-विज्ञानेन विज्ञायमाना लौकिकैः । तथा किं न्वस्ति सर्वस्य जगद्भे-दस्यैकं कारणम् । यदेकस्मिन्विज्ञाते सर्वं विज्ञातं भवतीति । नन्व-विदिते हि कस्मिन्निति प्रश्नोऽनुपपन्नः । किमस्ति तदिति तदा प्रश्नो युक्तः । सिद्धे ह्यस्तित्वे कस्मिन्निति स्यात् । यथा कस्मिन्निधेयमिति । न । अक्षरबाहुल्यादायासभीरुत्वात्प्रश्नः संभवत्येव किं त्वेकस्मिन्वि-ज्ञाते सर्ववित्स्यादिति ॥ ३ ॥

सिद्धान्ती—शुनकाचा मुलगा व महागृहस्थाश्रमी जो शौनक तो भारद्वाज-शिष्याकडे ( अंगिरसाकडे ) शास्त्रानें सांगितलेल्या मार्गानें गेला.—आचार्याकडे ज्या विधीनें जावें असें सांगितलें आहे, त्या शास्त्रपूर्वकविधीनें अंगिरस आचार्याकडे गेला—आणि—मोठ्या विनयानें-त्यांस पुढील प्रश्न विचारता झाला. येथें मात्र शौनक आणि अंगिरस यांचा जो संबंध सांगितला आहे, शिष्य आचार्याकडे विधिपूर्वक गेला असें स्पष्ट म्हटलें आहे, त्यावरून हें उघड होतें कीं, आचार्यास शरण जाण्याचा नित्य विधि पूर्वी नव्हता; किंवा असेंही म्हणतां येईल कीं, गुरुशिष्यांमधील मर्यादा स्पष्ट करण्या-साठीं 'विधिवत्' या पदाचा येथें उपयोग केला आहे. मध्यें दिवा ठेविला असतां दोन्हीकडे उजेड पडतो, या न्यायानें श्रुतीनें मध्येंच उपयोजिलेलें हें विशेषण पूर्वीच्या व आधुनिक शिष्याचार्यांचा संबंध प्रकाशित करितें आणि श्रीगुरूस शरण जाण्याची निराबाधता प्रकट करितें. कांहींही असलें तरी आचार्याकडे शिष्यानें विनीतवृत्तीनें जाणें हा विधि आधुनिक कालीं आम्हांस इष्ट आहे, म्हणून तो सर्वांनीं अवश्य पाळिला पाहिजे. असो. शौनकानें विचारलें कीं, 'हे भगवन्! अशी कोणती बरें एक वस्तु आहे, कीं जी समजली असतां या सर्व दिसणाऱ्या व भासणाऱ्या वस्तूंचे विशेष ज्ञान होऊन मनुष्यास सर्वज्ञ होतां येतें.' शौनकानें असा एक शिष्ट-प्रवाद ऐकला होता कीं, एक वस्तूचें ज्ञान झालें असतां सर्वज्ञ होतां येतें. तेव्हां ती वस्तु किंविशिष्ट आहे, हें समजण्यासाठीं त्यानें आपला प्रश्न केला आहे. 'कोणती बरें ती वस्तु ?' असा शौनकाचा प्रश्न आहे. किंवा असेंही म्हणतां येईल कीं, व्यवहारांत सामान्य दृष्टि असते, म्हणजे सामान्यज्ञान असतें, त्या सामान्यांत अंतर्भूत होणाऱ्या सर्व विशेष वस्तूंचें ज्ञान सामान्य दृष्टीनें होतें. पहा कीं, व्यवहारांत सुवर्णादिकांचे अनेक आकाराचे तुकडे असतात. येथें सामान्य सुवर्णाचें ज्ञान झाल्याबरोबर कुंडलादिकांत असणाऱ्या सोन्याच्या तुकड्यांचेही सुवर्णत्व-ज्ञान व्यवहार—चतुर लोकांस होतें. याचप्रमाणें विश्वांत जे अनेक भेद दृग्गोचर होतात, त्यांचें असें कोणतें एक सामान्य कारण असावें कीं जे समजलें असतां जगाचे व त्यांतील सर्व भेदांचे ज्ञान होईल; अशाही व्यावहारिक दृष्टीनें शौनकाचा प्रश्न योग्य होतो. आतां कोणी असें म्हणेल कीं, जी वस्तु मुळींच ठाऊक नाहीं, त्या 'विशिष्ट गोष्टीचें ज्ञान द्या' असा प्रश्न शौनकानें करणें योग्य नाहीं. 'ती कोणती

वस्तु' असा त्यानें प्रश्न केला पाहिजे होता. प्रथम अस्तित्व सिद्ध झाल्यावर मग शौनकानें प्रश्न केला आहे, तो येथें योग्य होईल. कोणी तरी पुरुष विद्यमान आहेत, असें कळल्यावर मग आपण 'कोणाजवळ ही वस्तु ठेऊं?' असें विचारतों, आधीं विचारीत नाहीं. पण ही शंका बरोबर नाहीं. असें विचारणें म्हणजे ग्रंथाचा विनाकारण विस्तार करून आयास मात्र वाढविणें होय. हें मनांत आणून शौनकानें वर सांगितलेला प्रश्न विचारला आहे. त्याचें तात्पर्य मात्र हें आहे कीं, अशी कोणती वस्तु आहे कीं, जी समजली असतां सर्वज्ञत्व प्राप्त होतें. ॥ ३ ॥

या मंत्राचें उद्‌घाटन करितांना **श्रीरंगरामानुजाचार्यांनीं** पुष्कळच विस्तृत व्याख्यान लिहून 'सर्वं इदं' या शब्दद्वयाच्या जोरावर चिदचिद्विशिष्टब्रह्माची सत्यता स्थापन करण्याचा दीर्घ प्रयत्न केला आहे. त्याचें तात्पर्य हें आहे. 'हें सर्व–इदं सर्वं–' हें विशेषण असून त्याचें विशेष्य सगुणब्रह्म आहे व या विस्तीर्ण प्रपंचाचें, ह्या परिणामाचें, उपादान कारण चिदचिद्विशिष्टब्रह्म आहे. या मूळ ब्रह्मापासूनच सर्व दृश्यमान चराचर विश्वाची उत्क्रांति ब्रह्माच्या नियंत्रणसामर्थ्यानें होते. अर्थातच चराचरांत अवस्थांतर दृष्टीस पडतें, त्याप्रमाणें ब्रह्मांतही अवस्थांतर होत असतें. ह्यावरून हें उघड होतें कीं, एका ब्रह्माचें व त्याच्या अवस्थांतरांचें ज्ञान झालें म्हणजे सर्व चराचर–विश्वाचें ज्ञान होणें सुकर होतें आणि ब्रह्माच्या एकत्वाचा निश्चय होतो. तसेंच हा वरील अर्थ घेतला म्हणजे लक्षणेचें कारण उरत नाहीं, मुख्यार्थानें कार्य भागतें आणि विवर्तवादाचा पक्ष लंगडा पडतो. शिवाय, जीवब्रह्म एक नाहींत, असें ठरून या ठरावास ब्र० सू० (४।३।२१) व (१।१।९) यांचा पाठपुरावा मिळतो. पण उलटपक्षीं, सुषुप्ति व उत्क्रांति जीवांस आहेत, असें सांगणाऱ्या ब्र० सू० (१।३।४२) शीं विरोध मात्र प्राप्त होतो. सारांश, सत्यब्रह्म हें सत्य–जगताचें उपादान व निमित्त-कारण असून ब्रह्माच्या शरीराचा परिणाम म्हणजे हें चराचर विश्व आहे, म्हणून कारणरूपी ब्रह्माचें ज्ञान विश्वज्ञानाला कारण होतें. याप्रमाणें विवर्तवादाचा पक्ष खोडून या आचार्यांनीं नैय्यायिकांचा व भेदाभेदवाद्यांचाही पक्षोच्छेद करण्याचा अति दीर्घप्रयत्न केला आहे व इत्यर्थ असा काढला आहे कीं, 'इदं सर्वं' हें मुख्यतः विशेषणपर आहे तथापि तें विशेष्यमात्रही घ्यावें व सूक्ष्म चिदचिद्ब्रह्म हें स्थूलचिदचिद्ब्रह्माचें उपादानकारण आहे, असें समजावें. सर्व व्याख्यान कडीदार असून चिंतनीय आहे.

---

## मंत्र चवथा.

**तस्मै स होवाच । द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद्ब्रह्मविदो वदन्ति परा चैवापरा च ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—तस्मै सः ह उवाच** (आचार्य शौनकाला उत्तर देते झाले.) **द्वे विद्ये वेदितव्ये इति** (दोन विद्या समजून घेतल्या पाहिजेत.) **यत् ब्रह्मविदः वदन्ति स्म ह** (असें ब्रह्मविद्या जाणणारे वेदार्थज्ञाते म्हणतात.) **परा च एव अपरा च** (परा आणि अपरा अशा त्या दोन विद्या आहेत) ॥ ४ ॥

तस्मै शौनकायाङ्गिरा आह-किलोवाच । किमित्युच्यते । द्वे विद्ये वेदितव्ये इति । एवं ह स्म किल यद्ब्रह्मविदो वेदार्थाभिज्ञाः परमार्थदर्शिनो वदन्ति । के ते इत्याह । परा च परमात्मविद्या । अपरा च धर्माधर्मसाधनतत्फलविषया । ननु कस्मिन्विदिते सर्वविद्भवतीति शौनकेन पृष्टं तस्मिन्वक्तव्येऽपृष्टमाहाङ्गिरा द्वे विद्ये इत्यादि । नैष दोषः । क्रमापेक्षत्वात्प्रतिवचनस्य । अपरा हि विद्याऽविद्या सा निराकर्तव्या । तद्विषये हि विदिते न किंचित्तत्त्वतो विदितं स्यादिति निराकृत्य हि पूर्वपक्षं, पश्चात्सिद्धान्तो वक्तव्यो भवतीति न्यायात् ॥ ४ ॥

**सिद्धान्तो**—शौनकाला अंगिरसांनीं स्पष्ट उत्तर दिलें तें असें कीं, तुझा इष्ट अर्थ सिद्ध होण्यास दोन प्रकारच्या विद्या जाणून घेतल्या पाहिजेत, असे वेदार्थज्ञाते म्हणजे परमार्थाचे साक्षात्कारी म्हणतात. त्या दोन विद्या कोणत्या म्हणशील तर ऐक; एक परा म्हणजे परमात्मसंबंधी विद्या व दुसरी अपरा म्हणजे धर्माधर्म हीं साधनें सांगून त्यांचें फल सांगणारी विद्या होय.

आतां कोणी अशी शंका घेईल; अहो, शौनकाचा प्रश्न तर असा आहे कीं, काय समजलें असतां सर्वज्ञत्व मिळतें. ती एक वस्तु सांगावयाची सोडून आचार्य उत्तर देतात कीं, दोन विद्या समजून घेण्याच्या आहेत ! हें काय भलतेंच उत्तर ? या शंकेचे उत्तर हें आहे कीं, अंगिरसांनीं योग्य क्रम मनांत ठेऊनच आपलें उत्तर दिलें आहे. खरोखर पाहिलें असतां अपराविद्या ही अविद्या आहे, हिचें निराकरण प्रथम केलें पाहिजे. अपराविद्या प्राप्त झाली असतां कोणत्याही प्रकारचें पारमार्थिक तत्त्वज्ञान होत नाहीं. म्हणून तिचें निराकरण आधीं केलें पाहिजे. सारांश अपारविद्येचा पूर्वपक्ष करून मागाहून सिद्धांत सांगितला पाहिजे, असा श्रुतिमान्य तर्कशास्त्राचा सिद्धांत आहे. हें मनांत आणून अंगिरसांनीं क्रम-प्रदर्शक उत्तर दिलें आहे तें योग्यच आहे ॥ ४ ॥

रंग०—या मंत्राचा अर्थ करितांना 'ब्रह्मप्राप्तीसाठीं' असा अध्याहार करावा लागतो. परीपराविद्यांचें ज्ञानविज्ञान ब्रह्मप्राप्तीला साधन आहे, असें ठरवून पराविद्या ही अपरोक्षज्ञानसाधक व अपरविद्या परोक्ष ज्ञानसाधक आहे असें हे टीकाकार म्हणतात.

---

## मंत्र पांचवा.

**तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति। अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—तत्र अपरा; ऋग्वेदः, यजुर्वेदः, सामवेदः, अथर्ववेदः, शिक्षा, कल्पः, व्याकरणं, निरुक्तं, छंदः, ज्योतिषं इति** ( ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष मिळून अपराविद्या होते. ) **अथ यया तत् अक्षरम् अधिगम्यते सा परा** ( आणि ज्या विद्येच्या द्वारानें त्या अविनाशी परब्रह्माची प्राप्ति होते, तिला परा विद्या असें म्हणतात. ) ॥ ५ ॥

तत्र काऽपरेत्युच्यते। ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेद इत्येते चत्वारो वेदाः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमित्यङ्गानि षडेषाऽपरा विद्या। अथेदानीमियं परा विद्योच्यते यया तद्वक्ष्यमाणविशेषणमक्षरमधिगम्यते प्राप्यते। अधिपूर्वस्य गमेः प्रायशः प्राप्त्यर्थत्वात्। न च परप्राप्तेरवगमार्थस्य भेदोऽस्ति। अविद्याया अपाय एव हि परप्राप्तिर्नार्थान्तरम्। ननु ऋग्वेदादिबाह्या तर्हि सा कथं परा विद्या स्यान्मोक्षसाधनं च। या वेदबाह्याः स्मृतय इति हि स्मरन्ति। कुदृष्टित्वान्निष्फलत्वादनादेया स्यात्। उपनिषदां च ऋग्वेदादिबाह्यत्वं स्यात्। ऋग्वेदादित्वे तु पृथक्करणमनर्थकम्। अथ कथं परेति। न। वेद्यविषयविज्ञानस्य विवक्षितत्वात्। उपनिषद्वेद्याक्षरविषयं हि विज्ञानमिह परा विद्येति प्राधान्येन विवक्षितं नोपनिषच्छब्दराशिः। वेदशब्देन तु सर्वत्र शब्दराशिर्विवक्षितः। शब्दराश्यधिगमेऽपि यत्नान्तरमन्तरेण गुर्वभिगमनादिलक्षणं वैराग्यं च नाक्षराधिगमः संभवतीति पृथक्करणं ब्रह्मविद्यायाः परा विद्येति कथनं चेति ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—त्यांमध्यें अपराविद्या कोणती, तें प्रथम सांगतात. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद असे चार वेद, व शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद, ज्योतिष हीं सहा उपांगें, मिळून अपराविद्या होते. आतां पराविद्या तिला म्हणतात कीं, जिच्या साहाय्यानें पुढें ज्याचें स्वरूपवर्णन यावयाचें आहे, त्या अक्षराचें ज्ञान होतें ह्मणजे प्राप्ति होते. 'गम्' या क्रियापदाला 'अधि' हा उपसर्ग लाविला म्हणजे त्याचा अर्थ प्रायः 'प्राप्त होणें' असा होतो. शिवाय परब्रह्माची प्राप्ति व परब्रह्माचें ज्ञान यांत कांहीं भेद नसून दोन्हीं एकच आहेत. कारण, अविद्येचा नाश होणें हीच परब्रह्माची प्राप्ति आहे. परब्रह्म म्हणजे दुसरी कांहीं एक सिद्ध होणारी वस्तु आहे असें नाहीं. अज्ञानानें मी निराळा व परमेश्वर निराळा अशी भेदबुद्धि प्राप्त झाली असते, ती नाहींशी झाली म्हणजे परब्रह्माची प्राप्ति झाली असें म्हणावें. आतां, " ऋग्वेदादिकांहून ही विद्या जर बाह्य आहे, तर इला ' पराविद्या ' असें कसें म्हणावयाचें व ती मोक्षाचें साधन तरी कसें होणार ? ' ज्या वेदबाह्य स्मृति आहेत त्या सर्व निष्फल असून अधोगतीला नेणाऱ्या आहेत ' असें स्मृतीमध्यें सांगितलें आहे. उघडच आहे कीं, वेदबाह्य-ज्ञानाची दृष्टि अज्ञानजन्य असते. ती इष्ट फल केव्हांही उत्पन्न करीत नाहीं. म्हणून तिचा केव्हांही स्वीकार करितां कामा नये. सारांश, ही पराविद्या वेदबाह्य, अवैदिक, आहे म्हणून त्याज्य आहे. तसेंच उपनिषदांलाही ऋग्वेदादि–वेदबाह्यत्व वरील लक्षणांनीं येतें. म्हणून पराविद्या वेदबाह्य झाली व तिचा अर्थ स्पष्ट करणारीं उपनिषदें वेदबाह्य होण्याचा प्रसंग येईल. आणि हें तर अनर्थकारक आहे. शिवाय ऋग्वेदादिकांपासून उपनिषदांचें प्रथक्करण करणें हें शक्य नाहीं व योग्य नाहीं. सारांश, ऋग्वेदादि वेदराशीहून प्रथक् काटलेली कोणतीही विद्या श्रेष्ठ असणें किंवा मोक्षसाधन होणें शक्य नाहीं. म्हणून ह्या विद्येला पराविद्या असें म्हणतां येत नाहीं, " अशी शंका येईल.

पण ही शंका व्यर्थ आहे. येथें वेदांतील अक्षरराशींचा प्रश्न नाहीं तर जा विषय आपल्यास समजून घ्यावयाचा आहे, त्याच्या विज्ञानाविषयींचा प्रश्न आहे. उपनिषदांच्या द्वारानें जी अविनाशी वस्तु समजून घ्यावयाची आहे, तिचें ज्ञान करून देणें हें परा विद्येचें कार्य आहे. आणि तेंच आम्हांस प्रमुखत्वानें सांगावयाचें आहे. उपनिषद्शब्द-राशीच्या संबंधानें येथें विवक्षा नाहीं, ज्ञानाची विवक्षा आहे. आतां ज्या ज्या वेळीं आपण वेद असा शब्द उच्चारितो त्या त्या वेळीं त्या शब्दानें शब्दराशीचा मात्र बोध करावयाचा असतो. शब्दराशीचा उच्चार करण्याची इच्छा असते. तेव्हां ही शब्दराशी आपल्यास अधिगत झाली, वेद पाठ झाले, तरी सद्गुरूला शरण जाणें, वैराग्यसंपन्न होणें, इत्यादि गोष्टी प्रयत्नानें साध्य करून घेतल्याशिवाय केव्हांही अविनाशी जें परब्रह्म त्याचें ज्ञान व त्याची प्राप्ति होत नाहीं. म्हणून वेदापासून ब्रह्मविद्या पृथक् केली आहे आणि तिला पराविद्या असें म्हटलें आहे. ॥ ५ ॥

रंगरा०—' अधिगम्यते ' ' प्राप्त होतें ' अथवा अपरोक्षज्ञान होतें. ऋग्वेदादि अपराविद्येच्या शास्त्रांनीं परोक्षज्ञान होतें व उपनिषदादिपराविद्यात्मक शास्त्रांनीं अपरोक्ष होतें. असा अर्थ केला म्हणजे ' सर्व वेद ब्रह्माचें उद्घाटन करितात ' या स्मृतीला यथार्थत्व प्राप्त होतें.

---

## मंत्र सहावा.

**यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुःश्रोत्रं तदपाणिपादम्। नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययं यद्भूतयोनिं परिपश्यन्ति धीराः॥ ६॥**

**अन्वय व अर्थः—यत् तत् अद्रेश्यं, अग्राह्यं, अगोत्रं, अवर्णं, अचक्षुःश्रोत्रं, अपाणिपादं, नित्यं, विभुं, सर्वगतं, सुसूक्ष्मं; तत् अव्ययं, यत् धीराः, भूतयोनिं परिपश्यंति** ( जें कांहीं अगोचर आहे, अग्राह्य आहे, ज्याला गोत्र नाहीं, वर्ण नाहीं, नेत्रकर्ण नाहीं, ज्याला हस्तपाद नाहींत, जें नित्य, विभु, सर्वगामी, अत्यंत सूक्ष्म आणि अव्यय आहे, जें सर्वकारण आहे, तें परब्रह्म विद्वान् पुरुषांस मात्र साक्षात्कृत होतें ) ज्या विद्येनें हें अक्षर समजतें तिला पराविद्या असें म्हणतात. ॥ ६ ॥

यथा विधिविषये कर्त्राद्यनेककारकोपसंहारद्वारेण वाक्यार्थज्ञानकालादन्यत्रानुष्ठेयोऽर्थोऽस्त्यग्निहोत्रादिलक्षणो न तथेह पराविद्याविषये। वाक्यार्थज्ञानसमकाल एव तु पर्यवसितो भवति। केवलशब्दप्रकाशितार्थज्ञानमात्रनिष्ठाव्यतिरिक्ताभावात्। तस्मादिह परां विद्यां सविशेषणेनाक्षरेण विशिनष्टि—यत्तदद्रेश्यमित्यादिना। वक्ष्यमाणं बुद्धौ संहृत्य सिद्धवत्परामृश्यते—यत्तदिति। अद्रेश्यमदृश्यं सर्वेषां बुद्धीन्द्रियाणामगम्यमित्येतत्। दृशेर्बहिष्प्रवृत्तस्य पञ्चेन्द्रियद्वारकत्वात्। अग्राह्यं कर्मेन्द्रियाविषयमित्येतत्। अगोत्रं गोत्रमन्वयो मूलमित्यन(?)र्थान्तरम्। अगोत्रमनन्वयमित्यर्थः। न हि तस्य मूलमस्ति येनान्वितं स्यात्। वर्ण्यन्त इति वर्णा द्रव्यधर्माः स्थूलत्वादयः शुक्लत्वादयो वा। अविद्यमाना वर्णा यस्य तदवर्णमक्षरम्। अचक्षुःश्रोत्रं चक्षुश्च श्रोत्रं च नामरूपविषये करणे सर्वजन्तूनां ते अविद्यमाने यस्य तदचक्षुःश्रोत्रम्। यः सर्वज्ञः सर्वविदित्यादिचेत-

नावत्त्वविशेषणत्वात्प्राप्तं संसारिणामिव चक्षुःश्रोत्रादिभिः करणैरर्थसाधकत्वं तदिहाचक्षुःश्रोत्रमिति वार्यते । “पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः” इत्यादिदर्शनात् । किंच तदपाणिपादं कर्मेन्द्रियरहितमित्येतत् । यत एवमग्राह्यमग्राहकं चातो नित्यमविनाशि । विभुं विविधं ब्रह्मादिस्थावरान्तप्राणिभेदैर्भवतीति विभुम् । सर्वगतं व्यापकमाकाशवत्सुसूक्ष्मं शब्दादिस्थूलत्वकारणरहितत्वात् । शब्दादयो ह्याकाशवाय्वादीनामुत्तरोत्तरं स्थूलत्वकारणानि तदभावात्सुसूक्ष्मम् । किंच तदव्ययमुक्तधर्मत्वादेव न व्येतीत्यव्ययम् । न ह्यनङ्गस्य स्वाङ्गापचयलक्षणो व्ययः संभवति शरीरस्येव । नापि कोशापचयलक्षणो व्ययः संभवति राज्ञ इव । नापि गुणद्वारको व्ययः संभवत्यगुणत्वात्सर्वात्मकत्वाच्च । यदेवं लक्षणं भूतयोनिं भूतानां कारणं पृथिवीव स्थावरजङ्गमानां परिपश्यन्ति सर्वत आत्मभूतं सर्वस्याक्षरं पश्यन्ति धीरा धीमन्तो विवेकिनः । ईदृशमक्षरं यया विद्ययाऽधिगम्यते सा परा विद्येति समुदायार्थः ॥ ६ ॥

**सिद्धान्ती**—जेथें जेथें अमूक एक विधि करावा असें सांगितलें असतें आणि कर्ता, कर्म, करण इत्यादि अनेक वस्तूंचा संग्रह होऊन त्यांच्या द्वारानें कर्म करावें असें सांगितलें असतें, तेथें तेथें विधि सांगणाऱ्या वाक्यांचा अर्थ ज्या वेळीं समजतों, त्या वेळांहून अन्य वेळीं श्रुतीनें सांगितलेलें कर्म करून तो विधि संपादावयाचा असतो. ‘अग्निहोत्र करावें’ असा वेदानें विधि सांगितला म्हणजे तो विधि कसा व केव्हां करावयाचा ? कोणीं करावयाचा ? इत्यादि ज्ञान आपण प्रथम करून घेतों आणि नंतर तो विधि यथासांग पार पाडून एक असें विशेष (अपूर्व) निर्माण करितों कीं, ज्याचें फल आपल्यास कालान्तरानें मिळावयाचें असतें. याप्रमाणें विधीचें ज्ञान (वाक्याचा अर्थ) समजून घेणें, नंतर विधिचें यथासांग संपादन करणें आणि फलप्राप्ति करून घेणें इत्यादि अनेक विषयांचा कर्मकांडामध्यें अंतर्भाव होतो. विधि—वाक्याचें अर्थज्ञान होतांक्षणीं आपल्या इष्टकर्मांचा व फलाचा अधिगम होत नाहीं. पण परविद्येची गोष्ट अगदीं निराळी आहे. वाक्याच्या अर्थाचें ज्ञान बरोबर झालें कीं, तत्क्षणीं आपला पुरुषार्थ सिद्ध होतो. वाक्यार्थज्ञान आणि पुरुषार्थप्राप्ति यांमध्यें कालावकाश बिलकूल असत नाहीं. अपरविद्येची तशी गोष्ट नाहीं; वाक्यार्थज्ञान झाल्यावर कांहीं वेळानें कर्त्याचें कर्म अनेक साधनांच्या द्वारें इष्ट वस्तु उत्पन्न करितें. असा परविद्या आणि अपरविद्या यांत विशेष आहे. सारांश, केवळ शब्दांच्या योगानें प्रकाशित झालेल्या अर्थाच्या ठिकाणीं ज्ञाननिष्ठेची योजना केली, म्हणजे पुरुषार्थाची सिद्धि होते. शब्दज्ञान होतांक्षणीं पुरुषार्थसिद्धि करून देणारी परविद्या आहे. तेथें

अपराविद्येसारखें कर्म करावें लागत नाहीं. ज्ञान होतांक्षणीं फल मिळतें; शब्द–प्रकाशित अर्थीचें पूर्ण–ज्ञानविज्ञान–म्हणजेच परमार्थांची प्राप्ति होय.पण अपरा विद्येचें कर्म–ज्ञान झाल्यावर यथासांग कर्म करावें लागतें आणि मग फल मिळतें. हा उभयतांमध्यें मुख्य विशेष आहे. हा नीट समजावा. यासाठींच परब्रह्माचीं ( अक्षरांचीं ) जीं एकच अर्थ-प्रतिपादन करणारीं अद्रेश्यत्वादि विशेषणें आहेत तीं या मंत्रांत सांगितलीं आहेत.

पुढें जें काय सांगावयाचें आहे, तें ध्यानांत घेऊन व तें सिद्ध झालें आहे असें समजून पुढील विशेषणांचा या मंत्रांत संग्रह केला आहे. परब्रह्मरूपी अविनाशी वस्तु सर्वज्ञात्यांच्या व अज्ञात्यांच्या बुद्धीस व इंद्रियांस **अद्रेश्य** म्हणजे अगम्य आहे. नेहमीं बाहेर असणाऱ्या विषयांचें ज्ञान बहिर्मुख पुरुषांस बाह्यगामी नेत्रकर्णादिपंचज्ञानें-द्रियानें होत असतें. हीं बाह्यगामी ज्ञानेंद्रियें बाह्यविषयांस मात्र विषय करितात. म्हणून अंतर्यामी असणाऱ्या परमात्म्याचें ज्ञान करून देण्याचें सामर्थ्य या इंद्रियांस नाहीं. तसेंच कर्मेंद्रियांनाही या **अग्राह्य** परमात्मविषयाचें ग्रहण करितां येत नाहीं. कारण त्यांचा हा विषय नव्हे. याप्रमाणें ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें परमात्म्याचें कोणत्याही प्रकारें ग्रहण करूं शकत नाहींत. हा परमात्मा **अगोत्र** आहे. म्हणजे याला दुसरें कोणतेंही मूलकारण नाहीं. सारांश, तो कार्य नाहीं. कार्याबरोबर कारण असतें. हा कार्य नाहीं. म्हणून याला कोणतेंही सहचारी वा पूर्वकारण असत नाहीं. त्याला कोणतेंही उपादान कारण नाहीं कीं जें त्याच्याबरोबर नित्य राहूं शकेल. या अक्षराला ( परमात्म्याला ) स्थूलत्वादि किंवा शुक्ल–पीतत्वादि कोणतेंही द्रव्यधर्म नाहींत, कीं ज्यांचें आपल्यांस वर्णन करितां येईल. हा असें अक्षर आहे कीं ज्यांत कोणताही वर्ण नाहीं म्हणून तो **अवर्ण** आहे. तसेंच, नामरूप समजण्याचीं जीं इंद्रियें जीवांस असतात, तीं याला नाहींत. म्हणजे नेत्रश्रोत्रादि इंद्रियें परमात्म्याला नसतात, म्हणून तो **इंद्रियशून्य** आहे. आतां 'सर्वज्ञ व सर्ववेत्ता' इत्यादि विशेषणांनीं परमात्मा सचेतन आहे, असें म्हणण्याचा प्रसंग येतो. तेव्हां, संसारी लोकाला नेत्रश्रोत्रादि-इंद्रियांनीं नामरूपादिकांची ज्ञानप्राप्ति होते, तसें ज्ञान होण्यासाठीं परब्रह्माला नेत्र-श्रोत्रादि इंद्रियें असलीं पाहिजेत, अशी शंका येईल, तिचें निवारण त्याला नेत्रश्रोत्रादि इंद्रियें नाहींत हें सांगून केलें आहे. ' तो डोळे नसतांना पाहतो व कान नसतानां ऐकतो ' अशा अनेक श्रुति आम्ही म्हणतों याला प्रमाण आहेत. याचप्रमाणें त्याला हस्तपादादि कर्मेंद्रियेंही नाहींत. म्हणून हा परमात्मा जसा ज्ञानकर्मेंद्रियांस अगोचर आहे, तसा ज्ञानकर्मेंद्रियांच्या द्वारानें तो विषय ग्रहणही करीत नाहीं. असें आहे म्हणून, तो इंद्रियांस अगोचर व इंद्रियावयवशून्य आहे म्हणून, तो नित्य म्हणजे अवि-नाशी आहे. तो **विभु** आहे म्हणजे ब्रह्मदेवापासून अत्यंत जडवस्तूपर्यंत सर्व विविध वस्तु होतोसा दिसतो. चराचरांचा अंतर्भाव तो करितो. तो आकाशाप्रमाणें **सर्वगत** व सर्वव्यापी आहे. तसेंच, तो अत्यंत **सूक्ष्म** आहे. कारण शब्दादि स्थूलत्व देणारीं कारणें

त्याच्या ठिकाणीं असत नाहींत. हें सर्व विदित आहे कीं, शब्दस्पर्शादि गुण, आकाश-वायुआदि उत्तरोत्तर स्थूल पदार्थ उत्पन्न करणारे असतात. ही स्थूलकारणें त्याच्या ठिकाणीं नाहींत म्हणून तो अत्यंत सूक्ष्म आहे. परमात्मा **अव्यय** आहे. म्हणजे वरील सर्व अद्रेश्यत्वादि गुण त्याच्या ठिकाणीं असल्यामुळें त्याच्या स्वरूपाचा कोण-त्याही प्रकारें क्षय होत नाहीं. खरेंच आहे; शरीर असेल तर पुष्ट होणें किंवा कृश होणें इत्यादि स्वरूपांतर प्राप्त होईल. पण जो अशरीरी आहे, त्याचा क्षय कसा होणार ? किंवा त्याला वृद्धि तरी कशी प्राप्त होणार ? राजाच्या घरीं धनसंचय असतो आणि त्याचा व्यय होतो. तसा व्यय होणेंही येथें संभवनीय नाहीं. आणि शेवटीं गुणांच्या योगानेंही व्यय होण्याचा संभव नाहीं. कारण तो निर्गुण आहे आणि सर्वांचा आत्मा आहे. व्ययाचा ही आत्मा तोच ! म्हणून तो अव्यय आहे.

याप्रमाणें अगम्य, अग्राह्य, अकारण, नामरूपशून्य, धर्मशून्य, ज्ञान–कर्मेंद्रिय–शून्य अविनाशी, सर्वसंग्राहक, सर्वव्यापी, सर्वसूक्ष्म, अव्यय, इत्यादि लक्षणें ज्याच्या ठिकाणीं आहेत, तो अक्षर परमात्मा होय. पृथ्वी माता ज्याप्रमाणें सर्व स्थावरजंगमांचें अधि-ष्ठान–कारण आहे, त्याप्रमाणें हा सर्वभूतांचें अधिष्ठान कारण आहे. याच्या सत्तेनें सर्व चराचर भूतें प्रकट होतात म्हणून हा भूतयोनि आहे. असो; याप्रमाणें सर्वात्मक असणारें हें सर्वव्यापी अक्षर ( परमात्मतत्त्व ) ज्ञानी आणि विवेकी पुरुष मात्र साक्षात्कृत करून घेतात. सारांश, ज्या विद्येनें एवंगुणान्वित अक्षराचा साक्षात्कार होतो त्या विद्येला परविद्या असें म्हणतात. हा या मंत्राचा तात्पर्यार्थ आहे. ॥ ६ ॥

**रंगरामानुज**—‘ भूतयोनिं ’ = सर्व भूतांचें उपादानकारण.

**माध्व**—या मंत्रांतील ‘ यत् ’ याचा अर्थ ज्याअर्थीं असा आहे. पहिला ‘ तत् ’ म्हणजे ब्रह्म; ‘ म्हणून ’ असाही या ‘ तत् ’ चा अर्थ आहे. तिसरा ‘ तत् ’ म्हणजे ब्रह्म. ज्याअर्थीं ब्रह्म हें अदृश्यादिगुणांनीं युक्त आहे त्याअर्थीं त्याला कोणतेही विकार उत्पन्न होत नाहींत आणि ज्याअर्थीं विद्वान् पुरुषांनीं वेदाध्ययन केलें म्हणजे त्यांस ब्रह्म समजतें, त्याअर्थीं वेदही परविद्या आहे, असें ठरतें.

---

## मंत्र सातवा.

**यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च यथा पृथिव्या-मोषधयः संभवन्ति । यथा सतः पुरुषात्केश-लोमानि तथाऽक्षरात्संभवतीह विश्वम् ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः—ऊर्णनाभिः यथा सृजते, गृह्णते** ( कोळी ज्या-प्रमाणें तंतु उत्पन्न करितो आणि गृहण करितो ) **पृथिव्यां यथा च**

**औषधयः संभवन्ति** ( पृथ्वी जशी अनेकवृक्षांना व औषधींना उत्पन्न करिते. ) **यथा सतः पुरुषात् केशलोमानि** ( विद्यमान-जिवंत पुरुषापासून केश आणि लोम-लव-उत्पन्न होतात. ) **तथा इह विश्वं अक्षरात् संभवति** ( त्याप्रमाणें येथें, या संसारांत, विश्व हें अक्षर जो परमात्मा त्यापासून उत्पन्न होतें. ) ॥ ७ ॥

भूतयोन्यक्षरमित्युक्तं तत्कथं भूतयोनित्वमित्युच्यते प्रसिद्धदृष्टान्तैः। यथा लोके प्रसिद्धम्। ऊर्णनाभिर्लूताकीटः किंचित्कारणान्तरमनपेक्ष्य स्वयमेव सृजते स्वशरीराव्यतिरिक्तानेव तन्तून्बहिः प्रसारयति पुनस्तानेव गृह्णते च गृह्णाति स्वात्मभावमेवाऽऽपादयति। यथा च पृथिव्यामोषधयो व्रीह्यादिस्थावरान्ता इत्यर्थः। स्वात्माव्यतिरिक्ता एव प्रभवन्ति। यथा च सतो विद्यमानाज्जीवतः पुरुषात्केशलोमानि केशाश्च लोमानि च संभवन्ति विलक्षणानि। यथैते दृष्टान्तास्तथा विलक्षणं सलक्षणं च निमित्तान्तरानपेक्षाद्यथोक्तलक्षणादक्षरात्संभवति समुत्पद्यत इह संसारमण्डले विश्वं समस्तं जगत्। अनेकदृष्टान्तोपादानं तु सुखार्थप्रबोधनार्थम्। यद्ब्रह्मण उत्पद्यमानं विश्वं तदनेन क्रमेणोत्पद्यते न युगपद्बदरमुष्टिप्रक्षेपवदिति ॥ ७ ॥

**शिष्य**—भगवन् अविनाशि परब्रह्म हें सर्व चराचरांचें उत्पत्तिस्थान आहे, असें आपण सांगितलें तें कसें बरें ? स्वतः अविकारी परब्रह्म हें विश्व कोठून व कसें उत्पन्न करितें ?

**सिद्धान्ती**—ही तुझ्यासारख्यांची शंका निवारण करण्यासाठीं श्रुतीनें लोकप्रसिद्ध दृष्टांत घेतले आहेत. जाळीं उत्पन्न करून, त्यांत कीडे धरणारा कोळी तुला माहीतच आहे. कोणत्याही दुसऱ्या कारणाची अपेक्षा न करितां आपण स्वतः आपल्या स्वतःच्या शरीरांतून हा कोळी जाळ्याचे तंतू उत्पन्न करितो, आपल्या शरीराबाहेर जाळें सिद्ध करितो आणि शेवटीं त्या सर्व जाळ्याचा स्वीकार आपल्या शरीरांत घेऊन करितो; म्हणजे त्या जाळ्याला आपलें स्वतःचें स्वरूप देतो. याप्रमाणें आपण स्वतः आपल्या शरीरांतून जाळें उत्पन्न करून, पुनः त्या जाळ्याला स्वात्मस्वरूप देण्याचें सामर्थ्य कोळ्याला असतें. पृथ्वीलाही व्रीहिआदि वृक्ष पाषाणापर्यंतचे सर्व स्थावर-जंगम पदार्थ स्वयमेव उत्पन्न करितां येतात. त्यांचें स्वरूप लोकप्रसिद्ध असून हे पदार्थ पृथ्वीपासून मात्र उत्पन्न होतात आणि तेथेंच लयाला जातात. असेंच, जिवंत

पुरुषापासून केश, लोम, नखें इत्यादि निर्जीव पदार्थ उत्पन्न होतात, हेंही तुला ठाऊक आहे. ह्या तीन दृष्टांतावरून असें स्पष्ट दिसतें कीं, दुसरे कोणत्याही कारणाची अपेक्षा न ठेवतां ब्रह्माहून विलक्षण स्वरूप असणारें जड व त्याच्या सारखेंच स्वरूप असणारे जीव मिळून हें समस्त विश्व या संसारमंडलरूपी व्यवहारांत पूर्वी सांगितलेल्या ब्रह्मापासून ( मागील मंत्रांत वर्णिलेल्या अक्षरापासून ) उत्पन्न होतें.

**शिष्य**—येथें अनेक दृष्टांत दिले आहेत. ते अशासाठीं असावेत कीं, मूळ सिद्धांताचे तात्पर्याची सुखानें समजूत पडावी.

**सि०**—होय. आणि आत्मसदृश आणि आत्मविलक्षण पदार्थ स्वयंभु ब्रह्माला सहज उत्पन्न करितां येतात, त्याला दुसऱ्या कोणत्याही कारणाची अपेक्षा नसते, हें स्पष्ट समजावें. असो; ब्रह्मापासून उत्पन्न होणारें हें विश्व कांहीं एक ठरलेल्या क्रमानें उत्पन्न होतें, एकदम होत नाहीं. मुठींत धरलेलीं बोरें आपल्यास एकदम बाहेर फेंकून देतां येतात, तसें ब्रह्मापासून हें विश्व एकदम बाहेर टाकलें जातें, असा भाग नाहीं. हें सांगण्यासाठीं पुढील मंत्रांचा अवतार आहे. कोळ्याच्या दृष्टांतानें उपादानकारण व निमित्त कारण केव्हां केव्हां एकच असतात असें सुचविलें, पृथ्वीच्या दृष्टांतानें एक उपादानकारण अनेकरुपी कार्यें घडवितें असें ठरविलें आणि पुरुषकेशाच्या दृष्टांतानें कारणांत कोणतीही विकृति न होतां कार्य उत्पन्न होतें, असें सिद्ध केलें. ॥ ७ ॥

**माध्व**–' उर्णनाभि '=कोळी ह्या अन्न खाऊन जें शरीर बनवितो त्याचे धातु तंतूच्या आकाराचे होतात. त्याप्रमाणें परमेश्वरानें प्रलयकालीं गिळून टाकलेले महत्तत्त्वादि, त्याचें शरीर होऊन प्रधान स्थितीस येतात, आणि पुनः महत्तत्त्वांच्या रूपानें परिणत होतात. यांस परमेश्वराचा मात्र आश्रय असतो. आणि ईश्वराच्या सत्तेनें सर्व सृष्टि उत्पन्न होते. याप्रमाणें उपादानकारण परमेश्वर–शरीर आणि निमित्त कारण स्वतंत्र परमेश्वर असतात, ही तीन दृष्टांतांची उपपत्ति आहे.

---

## मंत्र आठवा.

**तपसा चीयते ब्रह्म ततोऽन्नमभिजायते । अन्नात्प्राणो मनः सत्यं लोकाः कर्मसु चामृतम् ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ**—**ब्रह्म तपसा चीयते** ( ब्रह्म हें ज्ञानतपानें युक्त होतें. ) **ततः अन्नं अभिजायते** ( नंतर ह्या ब्रह्मापासून अन्न म्हणजे जीवांस भोग देणारीं सृष्टीचीं मूलद्रव्यें उत्पन्न होतात. ) **अन्नात् प्राणः मनः, सत्यं, लोकाः, कर्मसु च अमृतं** ( मूलद्रव्यांपासून प्राण–हिरण्य-

गर्भ–नंतर मन, पुढें सत्य–पंचमहाभूतें–त्यानंतर स्वर्ग पातालादि लोक, पुढें कर्मापासून उत्पन्न होणारें अविनाशी फल उत्पन्न होतें. उत्पत्तीचा हा क्रम आहे. ॥ ८ ॥

क्रमनियमविवक्षार्थोऽयं मन्त्र आरभ्यते। तपसा ज्ञानेनोत्पत्तिविधिज्ञतया भूतयोन्यक्षरं ब्रह्म चीयत उपचीयत उत्पिपादयिषदिदं जगदङ्कुरमिव बीजमुच्छूनतां गच्छति पुत्रमिव पिता हर्षेण। एवं सर्वज्ञतया सृष्टिस्थितिसंहारशक्तिविज्ञानवत्तयोपचितात्ततो ब्रह्मणोऽन्नमद्यते भुज्यत इत्यन्नमव्याकृतं साधारणं संसारिणां व्याचिकीर्षितावस्थारूपेणाभिजायत उत्पद्यते। ततश्चाव्याकृताद्व्याचिकीर्षितावस्थातोऽन्नात्प्राणो हिरण्यगर्भो ब्रह्मणो ज्ञानक्रियाशक्त्यधिष्ठितजगत्साधारणोऽविद्याकामकर्मभूतसमुदायबीजाङ्कुरो जगदात्माऽभिजायत इत्यनुषङ्गः। तस्माच्च प्राणान्मनो मनआख्यं संकल्पविकल्पसंशयनिर्णयाद्यात्मकमभिजायते। ततोऽपि संकल्पाद्यात्मकान्मनसः सत्यं सत्याख्यमाकाशादिभूतपञ्चकमभिजायते। तस्मात्सत्याख्याद्भूतपञ्चकादण्डक्रमेण सप्त लोका भूरादयः। तेषु मनुष्यादिप्राणिवर्णाश्रमक्रमेण कर्माणि। कर्मसु च निमित्तभूतेष्वमृतं कर्मजं फलम्। यावत्कर्माणि कल्पकोटिशतैरपि न विनश्यन्ति तावत्फलं न विनश्यतीत्यमृतम्॥ ८॥

**सिद्धान्ती**—क्रमाचा नियम सांगण्यासाठीं, कोणत्या क्रमनियमानें ही सृष्टि उत्पन्न होते हें सांगण्यासाठीं, या मंत्राला आरंभ केला आहे. तपानें म्हणजे ज्ञानानें अथवा उत्पत्तीचे नियमांच्या ज्ञानानें अविनाशी व सृष्टीचें कारण असणारें ब्रह्म पुष्ट होतें.

**शिष्य**—हें कसें?

**सिद्धान्ती**—ज्याप्रमाणें अंकुरांस उत्पन्न करण्याच्या वेळीं बीज पुष्ट होत असतें, त्याप्रमाणें हें जगत् उत्पन्न करण्याची ब्रह्माला इच्छा झाली, म्हणजे तें विस्तार पावतें. कसें? ज्याप्रमाणें पुत्राचें लालन करणारा पिता, त्यानें पुत्र पाहिला, म्हणजे तो हर्षानें मोठा होतो, त्याप्रमाणें हें ब्रह्म ज्ञानानें मोठें होतें. असो; सर्वज्ञतेनें म्हणजे विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं कार्यें करण्याचें सामर्थ्य व सामर्थ्य–ज्ञान असणाऱ्या विज्ञानानें पुष्ट झालेलें ब्रह्मापासून अन्न उत्पन्न होतें.

**शि०**—अन्न म्हणजे ज्याचा आपण उपभोग घेतों ते व्रीहिआदि पदार्थ कीं काय?

**सि०**—नव्हे! नव्हे! हें अन्न म्हणजे अव्याकृत, या सृष्टीचे मूल घटकावयव होत. हे अव्याकृत–स्वरूपांत असतात. हीं मूलद्रव्यें सर्वसाधारण म्हणजे निर्विशेष असतात.

**शिष्य**—म्हणजे काय ?

**सिद्धान्ती**—सृष्टीची मूल द्रव्यें म्हणजे ईश्वराची 'उपाधि' या दृष्टीनें असणारी माया होय. ही माया पृथ्वीआपतेजादि पंच महाभूतांच्या व मनःसृष्टीच्या अव्याकृतस्वरुपाची असते. ही प्रथम अव्याकृतरूपानें उत्पन्न होऊन नंतर व्याकृत म्हणजे विशिष्ट स्वरूपांनीं उत्पन्न झालेली सर्वांस उपलब्ध होते.

**शिष्य**—माया तर अनादि आहे. मग ती उत्पन्न होते असें कसें म्हणतां येईल ?

**सिद्धान्ती**—जीवदृष्टीनें माया अनादिच आहे; पण येथें अव्याकृत इत्यादि शब्दांनीं वाच्य असलेलें मायातत्त्व म्हणजे तीन गुणांची समस्थिति असणारें आणि पंचमहाभूतादि स्वरूपें ज्यास प्राप्त होतील, असें मूल मायातत्त्व उत्पन्न म्हणजे प्रकट होतें. सारांश, स्वर्गाच्या आदिकाळीं सत्त्वादि त्रिगुण समस्थितींत असतात तेव्हां, त्याला व पुढें उत्पत्तिस्थितिआदि संस्कार संसारी जीवांच्या वासनाकर्मांपासून जेथें होतात, त्याला मायातत्त्व असें म्हणतात व हें मायातत्त्व परब्रह्म आपल्या स्वतःपासून आपण स्वतः उत्पन्न अथवा प्रकट करितें. नंतर या अव्याकृतापासून अथवा पुढें ज्याला निरनिराळ्या अवस्था जीवांच्या वासना कर्मांनुसार ब्रह्मसामर्थ्यानें प्राप्त व्हावयाच्या आहेत, अशा अन्नापासून–मूळ घटकद्रव्यापासून–हिरण्यगर्भ ( प्राण ) उत्पन्न होतो. याचीही उत्पत्ति ज्ञानशक्ति आणि क्रियाशक्ति यांनीं अधिष्ठित असून, सर्व जगताचें साधारण कारण असणारा हा हिरण्यगर्भ आहे. याची उत्पत्ति ब्रम्हापासूनच आहे.

**शिष्य**—म्हणजे कसें ?

**सिद्धान्ती**—ज्ञान शक्तींनीं व क्रियाशक्तींनीं अधिष्ठित असलेलें विशिष्ट जगत् आपल्यास दिसतें. या जगाचें समष्टिकरण हा हिरण्यगर्भ आहे. जीवाला विशेष ज्ञान आणि विशेष कर्म करण्याचीं साधनें असतात. या विशेष सामर्थ्यांस एकवट करणारा किंवा हीं विशेष सामर्थ्यें एकत्र झालीं आहेत ज्याच्या ठिकाणीं, असा हिरण्यगर्भ असतो. अज्ञान व अज्ञानानें उत्पन्न होणाऱ्या वासना आणि वासनाजन्य कर्म, यांचें एकीकरण बीजरूपानें जेथें होते, त्या अव्यक्त बीजाचा अंकुर हिरण्यगर्भ असतो. सारांश, हा जगाचा आत्मा अथवा सूत्रात्मा अव्यक्तानंतर व अव्यक्ताच्या द्वारा उत्पन्न होतो. म्हणजे प्रथम अव्यक्त आणि नंतर हिरण्यगर्भ या क्रमानें उत्पत्ति होते. हिरण्यगर्भापासून मन नांवाचें द्रव्य उत्पन्न होतें. हें संकल्प, विकल्प, संशय आणि निश्चयादि रूपी असते. या संकल्पविकल्पात्मक मनापासून व मनानंतर सत्य नांवाचें आकाश–वायु–आदि भूतपंचक निर्माण होतें. त्यापासून अण्ड ( ब्रह्मांड ), आणि नंतर पृथ्वी आदि सप्त भुवनें उत्पन्न होतात. या लोकांतच मनुष्यप्रमुख प्राण्यांचें वर्णाश्रमानुसार कर्म होत असतें. आणि कर्मांच्या निमित्तानें कर्मापासून ईश्वराज्ञेनें उत्पन्न झालेलें फल अमृतरूपानें निर्माण होतें. या फलाला अमृत असें म्हणतात.

**शिष्य**—कर्म–फल तर अनित्य असतें, असें आपलें सांगणें आहे.

**सिद्धान्ती**—तें तर खरेंच आहे. पण जोंपर्यंत कर्मांचा नाश होत नाहीं, कोटिशः कल्पांमध्यें सुद्धां कर्म करण्याच्या वासनांचा नाश होत नाहीं, तोंपर्यंत कर्मफलाचाही नाश होत नाहीं. सारांश, ज्ञानाशिवाय कर्माचा नाश नाहीं. अज्ञानाची अनंत कोटि वर्षें गेलीं तरी कर्म–नाश होत नाहीं. अर्थातच तज्जन्य कर्मफलाचाही नाश होत नाहीं म्हणून कर्मफलाला अमृत असें श्रुतीनें विशेषण दिलें. याप्रमाणें सृष्टीचा क्रम आहे. अव्यक्त, हिरण्यगर्भ, मन ( महत् ), पंचमहाभूतें, ब्रह्मांड, सप्तभुवनें, जीवांचें कर्म आणि अमृत कर्मफल असा हा जीवदृष्टीनें अनादि सृष्टिक्रम आहे. ॥ ८ ॥

**रंग०**—'अन्न' = चेतनाचेतनसमष्टि. ही अव्याकृत असते. सत्य=भोक्तृवर्ग. 'कर्मसु अमृतं'=अमृतसाधक कर्म अथवा कर्मांमध्यें जें मोक्षार्थी मात्र कर्म होतें, तें कर्म.

**माध्व**—'तप'=आलोचन, संकल्पानें संकल्पकामध्यें विकार होत नाहीं. नंतर अन्न म्हणजे देव आणि जड वस्तु उत्पन्न होतात. १।१।८॥

---

## मंत्र नववा.

**यः सर्वज्ञः सर्वविद्यस्य ज्ञानमयं तपः । तस्मा-**
**देतद्ब्रह्म नाम रूपमन्नं च जायते ॥ ९ ॥**

**इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषदि प्रथममुण्डके**
**प्रथमः खण्डः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—यः सर्वज्ञः, सर्ववित्, यस्य ज्ञानमयं तपः, तस्मात् एतत् ब्रह्म, नाम, रूपं, अन्नं च जायते** ( जो सर्व-ज्ञाता आहे, जो सर्ववेत्ता आहे, ज्याचें ज्ञान हेंच तप आहे, त्यापासून हें ब्रह्म, हीं नामरूपें आणि हें अन्न उत्पन्न होतें ) ॥ ९ ॥

उक्तमेवार्थमुपसंजिहीर्षुर्मन्त्रो वक्ष्यमाणार्थमाह—य उक्तलक्षणोऽक्षराख्यः सर्वज्ञः सामान्येन सर्वं जानातीति सर्वज्ञः । विशेषेण सर्वं वेत्तीति सर्ववित् । यस्य ज्ञानमयं ज्ञानविकारमेव सार्वज्ञ्यलक्षणं तपो नाऽऽयासलक्षणं तस्माद्यथोक्तात्सर्वज्ञादेतदुक्तं कार्यलक्षणं ब्रह्म हिरण्यगर्भाख्यं जायते । किंच नामासौ देवदत्तो यज्ञदत्त इत्यादिलक्षणम् । रूपमिदं शुक्लं नीलमित्यादि । अन्नं च व्रीहियवादिलक्षणं जायते । पूर्वमन्त्रोक्तक्रमेणेत्यविरोधो द्रष्टव्यः ॥ ९ ॥

**इति मुण्डकोपनिषद्भाष्ये प्रथममुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥**

**सिद्धान्ती**—मागें सांगितलेल्या अर्थाचा उपसंहार करण्यासाठीं श्रुति पुढील अर्थ सांगत आहे व पुढें जें अपरविद्येचें प्रकरण येणार आहे, त्याचा आरंभ या मंत्रांत करीत आहे. ऐकः मागें ज्याचें लक्षण सांगितलें आहे तो अक्षर नांवाचा परमात्मा सर्वज्ञ आहे. म्हणजे त्याला सामान्यरूपानें सर्वांचें ज्ञान असतें. माया नामक उपाधि घेऊन तो समष्टिरूपानें ( हिरण्यगर्भ होऊन ) सर्वज्ञ होतो व अविद्या नामक उपाधि घेऊन व्यष्टिरूपानें जीव होतो आणि सर्व विशेषाचें ज्ञान त्याला होतें. म्हणून त्याला सर्व–वेत्ता असें म्हणतात. त्याला स्वतःच्या उपाधीचें व उपाधिजन्य वस्तूंचें सामान्य आणि विशेष ज्ञान असतें. असो, या सर्वज्ञ आणि सर्व–वेत्त्या परमात्म्याचें तप म्हणजे उत्पन्न होणाऱ्या सर्व पदार्थांचें सत्त्वप्रधानमायेच्या (ज्ञानगुणाच्या) साहाय्यानें स्मरणपूर्वक चिंतन होय. अर्थातच या परमेश्वरीय तपांत कोणत्याही प्रकारचें कर्म, आयास, असत नाहींत. अशा ज्ञानात्मक तपश्चर्या करणाऱ्या सर्वज्ञ परमात्म्यापासून कार्यरूपी हिरण्यगर्भाची उत्पत्ति होते. तसेंच नामही उत्पन्न होतें. हा देवदत्त, हा यज्ञदत्त हीं नामें होत. हें पांढरें, हें निळें इत्यादि रूपें होत, असो; समष्टि ब्रह्म ( हिरण्यगर्भ ) आणि अन्न ( व्रीहि यवादि सर्व विशेष पदार्थ ) ब्रह्मापासून उत्पन्न होतात. पण ते पूर्वींच्या मंत्रांत सांगितल्या क्रमानें उत्पन्न होतात व याप्रमाणें दोन्ही मंत्रांत विरोध राहत नाहीं. ॥ १ ॥

**रंग०**—' सर्वज्ञः '=सर्व विषयज्ञाता ' सर्ववित् '=प्रत्येक वस्तूचे सर्व प्रकार जाणणारा परमेश्वर हा संकल्प मात्र करितो.

प्रथम अव्याकृत उत्पन्न होतें व त्याद्वारें व त्यानंतर नामरूपात्मक व्याकृत सृष्टि उत्पन्न होते.

**माध्व०**–या उपनिषदाचें तात्पर्य भगवत्पर मात्र आहे. श्रीभगवान् बादरायणानीं ही हें उपनिषद् भगवत्पर आहे, असें समन्वयाध्यायामध्यें सांगितलें आहे. ब्रह्मसूत्र (१।२।२१) या सूत्रावर व्याख्यान करतांना ' अद्रेश्यमग्राह्यं ' या मुण्डकोपनिषदांतील मंत्राचा उल्लेख करून दृश्यत्व, ग्राह्यत्व इत्यादिकांचा म्हणजे अचेतनाचा अथवा भिन्न अवस्था घेणाऱ्या वस्तूंचा परमेश्वरीस्वरूपासंबंधानें विषेध केला. त्याचप्रमाणें ' अबालः अतरुणः ' इत्यादि विशेषणांनीं मनुष्यादिकांचा निषेध होतो. हे गुण पाषाणादिकांमध्यें दिसत नाहींत म्हणून अद्रेश्यत्वादि विशिष्टअक्षरानें प्रधान स्वरूपाचा उल्लेख श्रुतीला इष्ट आहे, परम पुरुषाचा उल्लेख इष्ट नाहीं; आणि सामान्यतः या उपनिषदांत प्रकृति आणि जीव यांच्या संबंधानें मात्र विवेचन झालेलें आहे, परमात्मर नाहीं. " हा पूर्व पक्ष उत्पन्न करून त्याचा निरास केला आहे; आणि असा सिद्धांत केला आहे कीं, ' जो सर्वज्ञ आणि सर्ववेत्ता आहे. ' ( मु० २।२।७ ) इत्यादि वाक्यें या उपनिषदांत आहेत त्यावरून चेतन आणि अचेतन सृष्टीचें उपादान कारण असणारा परमेश्वर मात्र येथें इष्ट आहे, तसेंच ' सर्वज्ञ आणि भूतयोनि ही विशेषणें एका परमात्म्यालाच योग्य होतात, इतरांस होत नाहींत असा सिद्धांत केला आहे. हें आपलें म्हणण

समर्थन करण्यासाठीं मुण्डकांतील अनेक मंत्रांचा ही या आचार्यांनीं अवतार केला आहे. हें सर्व प्रकरण जिज्ञासुमुमुक्षूंनीं वाचण्यासारखें आहे. याच प्रमाणें 'हें उपनिषद् जीवपर आहे' या शंकेचा ब्रह्मसूत्राच्या सिद्धांतांनीं व मुण्डकोपनिषदांतील मंत्रांनीं परिहार केला आहे. जीव व ब्रह्म हें दोन पदार्थ निरनिराळे असून सेव्य सेवक आहेत असें ठरवून हें सर्व उपनिषद् भगवंताचें मात्र यथार्थ स्वरूप सांगणारें आहे, जीवाचें किंवा प्रकृतीचे नव्हे, असा सिद्धांत आपल्या समजुतीनें स्थापित केला आहे.

***यस्मात्परं नापरमस्ति किंचित्।**
**यस्मान्नाणीयो न ज्यायोऽस्ति कश्चित्॥**
**वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकः।**
**तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम्॥ ७॥**

**मंत्रार्थ**—ज्याहून पर किंवा अपर (श्रेष्ठतर किंवा कनिष्ठतर) असें कांहीं नाहीं, ज्याहून लहान पदार्थ (जड किंवा जीव) नाहीं किंवा मोठा नाहीं, जो एकाकी असून वृक्षाप्रमाणें परमपदाचे ठिकाणीं स्तब्ध राहतो, त्या पुरुषानें हें सर्व विश्व पूर्ण केलें आहे.

'यस्मात्परं नापरमस्ति'=ज्याच्याहून दुसरें कांहीं श्रेष्ठ नाहीं. 'वृक्ष इव'=याला वंदनीय असा दुसरा कोणी नसल्यामुळें हा वृक्षासारखा ताठ असतो. हा मंत्र प्रक्षिप्त नाहीं असा श्रीरंगरामानुजांचा अभिप्राय आहे. हा मंत्र इतर भाष्यकारांनीं घेतला नाहीं.

**मुण्डकोपनिषत् प्रथमखण्ड समाप्त.**



---

* हा मंत्र प्रक्षिप्त आहेसें वाटतें, म्हणून प्रथम खंडाच्या शेवटीं घेतला आहे.

## मंत्र पहिला.

**तदेतत्सत्यं मन्त्रेषु कर्माणि कवयो यान्यपश्यं-स्तानि त्रेतायां बहुधा संततानि । तान्याचरथ नियतं सत्यकामा एष वः पन्थाः सुकृतस्य लोके ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—**तत् एतत् सत्यं** (तें हें सत्य होय) **यानि कर्माणि कवयः मंत्रेषु अपश्यन्, तानि त्रेतायां बहुधा संततानि, तानि नियतं आचरथ, सत्यकामाः लोके सुकृस्तय षएः वः पंथाः** ( त्रेतायुगामध्यें पुष्कळ प्रकारांनीं विस्तार पावलेलीं जी कर्में मंत्रांमध्यें ऋषींनीं पूर्वी स्वरूपानें पाहिलीं होतीं, तीं कर्में तुम्हीं नियमानें आचरीत जा. कर्म-फलाचा अभिलाष करणारे हे लोक हो ! इहलोकी सत्कर्माचा हाच मार्ग तुम्हांस योग्य आहे.) ॥ १ ॥

साङ्गा वेदा अपरा विद्योक्ता—ऋग्वेदो यजुर्वेद इत्यादिना । यत्तदद्रेश्यमित्यादिना नामरूपमन्नं च जायत इत्यन्तेन ग्रन्थेनोक्त-लक्षणमक्षरं यया विद्ययाऽधिगम्यत इति परा विद्या सविशेषणोक्ता । अतः परमनयोर्विद्ययोर्विषयौ विवेक्तव्यौ संसारमोक्षावित्युत्तरो ग्रन्थ आरभ्यते । तत्रापरविद्याविषयः कर्त्रादिसाधनक्रियाफलभेद-रूपः संसारोऽनादिरनन्तो दुःखस्वरूपत्वाद्धातव्यः प्रत्येकं शरी-रिभिः । सामस्त्येन नदीस्रोतोवदव्यवच्छेदरूपसंबन्धस्तदुपशम-लक्षणो मोक्षः परविद्याविषयोऽनाद्यनन्तोऽजरोऽमरोऽमृतोऽभयः शुद्धः प्रसन्नः स्वात्मप्रतिष्ठालक्षणः परमानन्दोऽद्वय इति । पूर्वं ताव-दपरविद्याया विषयप्रदर्शनार्थमारम्भः । तद्दर्शने हि तन्निर्वेदोप-पत्तेः । तथाच वक्ष्यति—“ परीक्ष्य लोकान्कर्मचितान् ” इत्या-दिना । न ह्यप्रदर्शिते परीक्षोपपद्यत इति तत्प्रदर्शयन्नाह तदेतत्स-त्यमवितथम् । किं तन्मन्त्रेष्वृग्वेदाद्याख्येषु कर्माण्यग्निहोत्रादीनि मन्त्रैरेव प्रकाशितानि कवयो मेधाविनो वसिष्ठादयो यान्यपश्यन्दृ-ष्टवन्तः । यत्तदेतत्सत्यमेकान्तपुरुषार्थसाधनत्वात्तानि च वेदविहि-तान्यृषिदृष्टानि कर्माणि त्रेतायां त्रयीसंयोगलक्षणायां हौत्राध्वर्यवौ-

द्वात्रप्रकारायामधिकरणभूतायां बहुधा बहुप्रकारं संततानि प्रवृत्तानि कर्मिभिः क्रियमाणानि त्रेतायां वा युगे प्रायशः प्रवृत्तान्यतो यूयं तान्याचरथ निर्वर्तयथ नियतं नित्यं सत्यकामा यथाभूतकर्मफलकामाः सन्तः। एष वो युष्माकं पन्था मार्गः सुकृतस्य स्वयं निर्वर्तितस्य कर्मणो लोके फलनिमित्तं लोक्यते दृश्यते भुज्यत इति कर्मफलं लोक उच्यते। तदर्थं तत्प्राप्तय एष मार्ग इत्यर्थः। यान्येतान्यग्निहोत्रादीनि त्रय्यां विहितानि कर्माणि तान्येष पन्था अवश्यफलप्राप्तिसाधनमित्यर्थः॥ १॥

**सिद्धान्ती**—ऋग्वेद, यजुर्वेद इत्यादि वेद आणि त्यांची सहा अंगें मिळून अपराविद्या होते; हें पहिल्या खंडांतील पांचव्या मंत्रांत सांगितलें. नंतर सहाव्या मंत्रापासून पहिल्या खंडाच्या शेवटच्या मंत्रापर्यंत 'अगोचर, अग्राह्य' असून स्वसत्तेनें सृष्टि उत्पन्न करणारा ज्ञानमय जो अविनाशी परमात्मा त्याचें यथार्थज्ञान ज्या विद्येनें प्राप्त होते, ती पराविद्याही स्वलक्षणांसह व स्वविशेषणासह सांगितली. आतां, ह्यापुढें ह्या दोन विद्यांचे जें निरनिराळे विषय आहेत त्यांचे विशेष सांगून अपराविद्येचा विषय संसार आहे आणि पराविद्येचा विषय मोक्ष आहे, असें पुढील ग्रंथांत सांगावयाचें आहे. प्रथमतः अपराविद्येचा विषय संसार हा आहे, हें श्रुति सांगेल. हा संसार अनादि आहे, अनंत आहे, दुःखस्वरूप आहे. कर्तृभेद, साधनभेद, कर्मभेद, फलभेद इत्यादि अनेक स्वपरभेदांनीं हा दुःखपूर्ण संसार विलक्षण झालेला आहे. याचा त्याग प्रत्येक शरीरी–पुरुषानें ( जीवानें ) करावयाचा आहे अथवा संसार टाकून द्यावयाचा आहे. कारण तो दुःखस्वरूप आहे व त्याचप्रमाणें नदीचा प्रवाह जसा अखंड असतो, तसा या समष्टिरूप संसाराचा प्रवाह जीवदृष्टीनें अखंड आहे. याचा निरास उपशमानें ( संसारापासून निवृत्त होण्यानें ) मात्र व्हावयाचा आहे; ज्ञानपूर्वक संसारनिवृत्ति म्हणजेच मोक्ष होय. हा मोक्षविषय पराविद्येचा आहे; हा मोक्ष अनादि, अनंत, अजर, अमर, अमृत, अभय, शुद्ध, प्रसन्न, स्वतःमध्यें प्रतिष्ठित झालेला ( स्वतंत्र व स्वयंभु ), परम आनंदाचें स्थान आणि अद्वितीय असा आहे. हें ज्ञान झालें म्हणजे मुक्त पुरुषाचा संसार नष्ट होतो. समष्टि संसार अखंड असतोच.

**शिष्य**—भगवन्! कर्ता, कर्म इत्यादि भेद निद्रेमध्येंही नाहींसे होतात. यावरून निद्रेमध्यें आपण मोक्षसुख अनुभवितों, अशी कोणी शंका काढतील त्याचें समाधान कसें!

**सिद्धान्ती**—निद्रेमध्यें अज्ञानाचें वास्तव्य असतें. अज्ञान म्हणजे मोक्ष नव्हे. संसारनिवृत्तीबरोबर स्वरूपाचें ज्ञान असेल, तर अज्ञानकृतभेद विशेषरूपानें आणि सामान्यरूपानें नाहींसे होऊन पूर्वसंचितकर्माचा नाश होतो व भेदरूपी कर्म, त्याचा अभिमान आणि त्याच्या फलाची वासना हीं रहात नाहींत, म्हणून ज्ञानीजीवाचा व

व्यष्टि–समष्टिरूपी संसाराचा संबंध तुटतो, त्याचें जन्ममरणात्मक चक्र नष्ट होतें. हाच मोक्ष होय. येथें स्वरूपज्ञानाची अत्यंत आवश्यकता आहे. असो, श्रुति प्रथमतः अपराविद्येचा विषय–संसार–सांगण्याला आरंभ करीत आहे. उघडच आहे. दुःखद पदार्थ दिसून त्याचें ज्ञान झालें म्हणजे त्या दुःखरूपी पदार्थासंबंधानें निर्वेद ( वीट, उदासीनता ) उत्पन्न होतो. तसेंच, याच खंडाच्या बाराव्या मंत्रांत 'कर्मांनें पुष्ट झालेल्या लोकांचें ( संसारात्मक सप्तभुवनांचें) परीक्षण करून' हा निर्वेद संबंध आणिला आहे. त्याचाही हाच भावार्थ आहे. पदार्थ पाहिल्याशिवाय त्याची परीक्षा होत नाहीं. व पाहिल्याशिवाय परीक्षा करणें हेंही योग्य नव्हे. म्हणून येथें प्रथमतः संसाराचें वर्णन परीक्षा बुद्धीनें केलें आहे. असो; श्रुति म्हणतेः–हें सर्व सत्यरूप आहे.

**शिष्य**—हें म्हणजे ?

**सिद्धान्ती**—ऋग्वेदादि ग्रंथांमध्यें अग्निहोत्रादि कर्मे मंत्रांनीं प्रकाशित केलेलीं आहेत. या कर्मांचें स्वरूप वसिष्ठादि बुद्धिवान् ऋषींस उत्तम कळलें होतें. या कर्मांस सत्य हें नांव दिलें आहे. कारण, हीं वेदविहित कर्मे पुरुषार्थांचीं निश्चित साधनें आहेत. हीं कर्मे म्हणजे हौत्र ( ऋग्वेदपठित अर्थ, किंवा हौत्र कर्म ), आध्वर्यव ( यजुर्वेद पठित अर्थ किंवा याजुष कर्म ) औद्गात्र ( सामवेदपठित गायन ) इत्यादि तीन कर्मांचा संयोग होय. ही त्रयी सर्व कर्मांचें अधिकरण आहे. हीं अग्निहोत्र–यज्ञादि ऋषिदृष्ट कर्मे अनेक प्रकारांनीं प्रवृत्त होत असतात. तीन प्रकारचीं कर्मे एकत्र होतात म्हणून यांस 'त्रेता' असें म्हटलें.

**शिष्य**—किंवा त्रेतायुगामध्यें त्या कर्मांची अनेकरूपी प्रवृत्ति झाली, असें म्हटलें तर ?

**सिद्धान्ती**—कांहीं प्रत्यवाय नाहीं. सर्वज्ञ ऋषींनीं हीं कर्मे विहित केलीं आहेत व संसारी पुरुषांचे अर्थकामरूप पुरुषार्थ साध्य करण्यास हीं कर्मे सर्वथा समर्थ आहेत, असें यथार्थ ज्ञान असलें म्हणजे झालें. असो, श्रुति म्हणते : कर्मांप्रमाणें फल होतें. फल प्राप्त व्हावें अशी इच्छा करणारे सत्यकामी लोकहो ! तुम्ही या ऋषिविहित कर्मांचे यथाशास्त्र अनुष्ठान नियमानें करीत जा. तुम्हाला हाच योग्य मार्ग आहे. हाच पुण्यमार्ग आहे. आपण स्वतः केलेल्या कर्मांचें फल आपल्यांस मिळतें व भोगावें लागतें, म्हणून कर्मफलाला श्रुतीनें 'लोक' ( दिसणें हा व्यवहार जेथें होतो तें स्थान ) अशी संज्ञा दिली आहे. ( आचार्यांचा 'स्वकृतानि' असा पाठ होता कीं काय ? ) 'लोक' याचा अर्थ पहाणें, उपभोग घेणें, असा आहे. म्हणून कर्मफलाला 'लोक' असें म्हटलें, त्या सुकृतानें उत्पन्न होणाऱ्या सत्फलाची प्राप्ति शास्त्रविहित कर्माचरणानें मात्र होत असते. सारांश, तीन वेदांमध्यें अग्निहोत्रादि जीं जीं कर्मे विहित केलीं आहेत, तीं तीं कर्मे स्वर्गादि फल अवश्य साध्य करितात म्हणून 'विहित कर्माचरण' हा फलेच्छा धारण करणाऱ्या संसारीलोकांचा मार्ग आहे, असें श्रुतीनें सांगितलें. ॥ १ ॥

रंगा०—सत्य=नित्य=उत्पत्त्यादि षड्विकारशून्य. 'कवि'=अतींद्रिय-साक्षात्कार-समर्थ पुरुष. वेदविहित कर्मे ब्रह्मकाम पुरुषानें निष्कामतः यथासांग केलीं पाहिजेत. सकाम वेदोक्त कर्मे ही पुण्यफलक होतात व चतुर्मुखाच्या लोकास नेतात.

माध्व.—अपरविद्येनें कर्ममीमांसा समजते आणि परविद्येनें आत्मज्ञान प्राप्त होऊन कर्म-साफल्य होतें. कर्म आणि ज्ञान हीं ब्रह्मपरच असतात. परविद्येनें सत्यरूपी भगवान् स्वरूपतः समजतो. यासाठीं त्याचें प्रेम प्राप्त व्हावें अशी इच्छा करून विहित कर्म करावें. म्हणजे कर्म सांगणारी विद्या हीच पराविद्या होते. अन्यथा होत नाहीं. 'सत्यकाम' या पदानें सर्व आश्रमांचा संग्रह होतो. सारांश, कृत-युगामध्यें भगवद्भक्त कर्मे करीत, त्याप्रमाणें सर्वांनीं कर्मे करावीं हा श्रुतीचा उपदेश आहे. आणि तदनुसार श्रुतीनें ( मंत्र २ ते ६ ) कर्ममीमांसेचा विस्तार केला आहे. या उपदेशानुसार केलेलीं सर्व कर्मे यज्ञ, दान आणि तप या स्वरूपाचीं होतात आणि हीं कर्मे देवाधिदेव जो परमेश्वर त्याच्या लोकीं नेऊन जीवास पोहचवितात. एवंच ज्ञानफलानें मात्र कर्म-साफल्य होतें. 'मी कर्ता नव्हे, हरि सर्वकर्ता आहे, माझें सर्व कर्म म्हणजे त्याची पूजा आहे.' अशा मनोवृत्तीनें निष्काम व ज्ञानपूर्वक कर्म केलें म्हणजे परब्रह्म-लोकाची प्राप्ति होते.

---

## मंत्र दुसरा.

**यदा लेलायते ह्यर्चिः समिद्धे हव्यवाहने।**
**तदाऽऽज्यभागावन्तरेणाऽऽहुतीः प्रतिपादयेत् ॥ २॥**

**अन्वय व अर्थः—समिद्धे हव्यवाहने यदा अर्चिः लेलायते, तदा आज्यभागौ अन्तरेण आहुतीः प्रतिपादयेत्,** ( पेटलेल्या अग्निकुंडामध्यें असणारा अग्नि जेव्हां आपल्या ज्वालेनें स्पंदन करित असतो, तेव्हां दोन आज्यभागांच्या अवकाश-स्थलामध्यें आहुतींचा प्रक्षेप करावा. ) ॥ २ ॥

तत्राग्निहोत्रमेव तावत्प्रथमं प्रदर्शनार्थमुच्यते सर्वकर्मणां प्राथम्यात्। तत्कथम्। यदैवेन्धनैरभ्याहितैः सम्यगिद्धे समिद्धे हव्यवाहने लेलायते चलत्यर्चिस्तदा तस्मिन्काले लेलायमाने चलत्यर्चिष्याज्यभागावाज्यभागयोरन्तरेण मध्य आवापस्थान आहुतीः प्रतिपादयेत्प्रक्षिपेद्देवतामुद्दिश्य। अनेकाहप्रयोगापेक्षयाऽऽहुतीरिति बहुवचनम्। एष सम्यगाहुतिप्रक्षेपादिलक्षणः कर्ममार्गो लोकप्राप्तये पन्थास्तस्य च सम्यक्करणं दुष्करम्। विपत्तयस्त्वनेका भवन्ति ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—सर्व कर्मांच्या आधीं अग्निहोत्र कर्म असतें म्हणून श्रुतीनें प्रदर्शनासाठीं (उदाहरणासाठीं) या प्रथम कर्मांचा अवतार केला आहे. अग्निहोत्राचा विधि असाः—जेव्हां उत्तम प्रकारच्या ज्वालाग्राही इंधनांनीं अग्निकुंडांत प्रज्वलित झालेला हव्यवाहन आपल्या ज्वालांनीं मिरवूं लागतो व निरनिराळ्या ज्वालांचें स्पंदन करितो, तेव्हां (आहवनीय अग्नीमध्यें 'अग्नयेस्वाहा' 'सोमायस्वाहा' अशा दोन घृताहुती दर्शपूर्णमासाच्या वेळीं दक्षिणोत्तर भागीं द्याव्या लागतात. या दोन आहुतींमध्यें स्थलांतर असतें, प्रधानस्थानाला आवापस्थान असें म्हणतात. अग्निहोत्रांतही सूर्य आणि प्रजापति यांस सकाळीं व अग्नि आणि प्रजापति यांस संध्याकाळीं आहुती देत असतात. असो;) आज्याहुतींच्या स्थानामध्यें जें आवापस्थान असतें, त्यांत देवतांच्या उद्देशानें आहुती देत जाव्या. अनेक दिवस हा प्रयोग चालावयाचा असतो; म्हणून आहुती हें पद अनेकवचनान्त आहे. हा यथार्थ आहुतिप्रक्षेपणात्मक विधि हा कर्ममार्ग होय. हा स्वर्गप्राप्तीचें उत्तम साधन आहे. हें खरें; पण, कर्माचें यथायोग्य आणि यथासांग अनुष्ठान घडणें अत्यंत कठीण आहे. संकटेंही अनेक प्रकारचीं उत्पन्न होतात. म्हणून हा कर्ममार्ग अत्यंत कठीण आहे. हें काठिण्य पुढील मंत्रांत सांगितलें आहे ॥२॥

---

## मंत्र तिसरा.

**यस्याग्निहोत्रमदर्शमपौर्णमासमचातुर्मास्यमनाग्र-
यणमतिथिवर्जितं च अहुतमवैश्वदेवमविधिना
हुतमासप्तमांस्तस्य लोकान्हिनस्ति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ—यस्य अग्निहोत्रं अदर्शं, अपौर्णमासं, अचातुर्मास्यं, अनाग्रयणं, अतिथिवर्जितं, अहुतं, अवैश्वदेवं, अविधिना हुतं, तस्य आसप्तमान् लोकान् हिनस्ति** (ज्याचें अग्निहोत्र दर्शपौर्णमासवर्जित आहे, जो 'चातुर्मास्य' कर्म करीत नाहीं, जो 'अग्रहायण'—कर्म—विन्मुख असतो, जो अतिथींचा समाचार घेत नाहीं, जो यथाकालीं आहुति देत नाहीं, वैश्वदेव करीत नाहीं, आहुती दिल्याच तर शास्त्र—निषिद्ध पद्धतीनें देतो, त्याचे सात लोक नष्ट होतात.) ॥ ३ ॥

सारांश, अग्निहोत्राचें कर्म यथासांग होण्यास अनेक प्रत्यवाय आहेत आणि यथासांग कर्म झालें नाहीं तर कर्म—कर्ता अधोगतीस जातो. ॥ ३ ॥

कथं यस्याग्निहोत्रिणोऽग्निहोत्रमदर्शं दर्शाख्येन कर्मणा वर्जितम् । अग्निहोत्रिणोऽवश्यकर्तव्यत्वाद्दर्शस्य । अग्निहोत्रसंबन्ध्यग्निहोत्रविशे-

षणमिव भवति । तदक्रियमाणमित्येतत् । तथाऽपौर्णमासमित्यादिष्वप्यग्निहोत्रविशेषणत्वं द्रष्टव्यम् । अग्निहोत्राङ्गत्वस्याविशिष्टत्वादपौर्णमासं पौर्णमासकर्मवर्जितम् । अचातुर्मास्यं चातुर्मास्यकर्मवर्जितम् । अनाग्रयणमाग्रयणं शरदादिकर्तव्यं तच्च न क्रियते यस्य । तथाऽतिथिवर्जितं चातिथिपूजनं चाहन्यहन्याक्रियमाणं यस्य स्वयं सम्यगग्निहोत्रकालेऽहुतम् । अदर्शादिवदवैश्वदेवं वैश्वदेवकर्मवर्जितं हूयमानमप्यविधिना हुतं न यथाहुतमित्येतत् । एवं दुःसंपादितमसंपादितमग्निहोत्राद्युपलक्षितं कर्म किं करोतीत्युच्यत आसप्तमान्सप्तमसहितांस्तस्य कर्तुर्लोकान्हिनस्ति हिनस्तीवाऽऽयासमात्रफलत्वात् । सम्यक्क्रियमाणेषु हि कर्मसु कर्मपरिणामानुरूपेण भूरादयः सत्यान्ताः सप्त लोकाः फलं प्राप्यन्ते । ते लोका एवं भूतेनाग्निहोत्रादिकर्मणा त्वप्राप्यत्वाद्धिंस्यन्त इवाऽऽयासमात्रं त्वव्यभिचारीत्यतो हिनस्तीत्युच्यते । पिण्डदानाद्यनुग्रहेण वा संबध्यमानाः पितृपितामहप्रपितामहाः पुत्रपौत्रप्रपौत्राः स्वात्मोपकाराः सप्त लोका उक्तप्रकारेणाग्निहोत्रादिना न भवन्तीति हिंस्यन्त इत्युच्यते ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—ज्या अग्निहोत्र्याचे अग्निहोत्रांत दर्श नांवाचें कर्म (इष्टि) होत नाहीं—

**शिष्य**—अग्निहोत्र्यांनीं दर्श नामक इष्टि तर अवश्य केली पाहिजे. ही केली नाहीं तर अग्निहोत्र यथासांग होणार नाहीं. याचा अग्निहोत्राशी नित्य संबंध आहे. हें अग्निहोत्राचें एक विशिष्ट अंग आहे, म्हणून दर्शादि सर्व अग्निहोत्राचीं जणों विशेषणेंच आहेत.

**सिद्धान्ती**—हें सरें; पण असेंही दर्शकर्म जो अग्निहोत्री करीत नाहीं, याचप्रमाणें अग्निहोत्राचें अंग ‘पौर्णमास कर्म’ हें जो करीत नाहीं, ‘चातुर्मास्य’ कर्म करीत नाहीं, शरदृतुमध्यें ‘अग्रयण इष्टि’ करावी लागते ती जो करीत नाहीं, रोजच्या रोज जें अतिथिपूजन अवश्य आहे, तें जो करीत नाहीं, यथाकालीं अग्नीला स्वतः आहुती देत नाहीं; दर्शादिकाप्रमाणेंच अग्निहोत्राचें अंग नसलें तरी अवश्य असणारें वैश्वदेवकर्म जो करीत नाहीं; आहुती दिल्या तरी जो निषिद्धमार्गानें व अश्रद्धेनें आहुती देतो, सारांश यांतील ज्याचीं एक किंवा सर्व कर्में चुकतात, त्याला संकटें प्राप्त होतात. तसेंच निषिद्ध मार्गानें संपादिलेलें कर्म न संपादल्यासारखें होतें. येथें अग्निहोत्र हें एक उपलक्षण मात्र आहे. तात्पर्य, सर्व वेदविहित कर्मासंबंधानें लागणाऱ्या अंगोपांगाचें जो यथाशास्त्र संपादन करीत नाहीं किंवा विहितकर्म मुळींच करित नाहीं त्याचे सात लोक नष्ट झाल्यासारखे होतात आणि निवळ श्रम मात्र त्याच्या पदरीं खास पडतात. आतां जर यथासांग कर्म झालें तर सप्त लोक (म्हणजे भूः, भुवः, स्वः, महाः, जनः, तपः आणि

सत्यं हे लोक ) कर्मानुरूप प्राप्त होतात. पण वर सांगितल्याप्रमाणें अग्निहोत्र कर्म जर यथासांग झालें नाहीं तर त्याला वरील सप्त लोक मिळावयाचें नाहींत, असें होतें. सारांश, त्यांचा नाशच जणू कांहीं होतो आणि त्यांचें आयास हेंच काय तें फल त्याला मिळतें. अशुद्धकर्माचें फल आयास, हें निश्चित ठरलेलें आहे.

**शिष्य**—तो कर्मकर्ता विपरीत आचार करितो. म्हणून सप्तलोकांचा नाश त्याच्या हातून होतो. ते लोक त्याला मिळत नाहींत असें म्हणावयाचें. हें ठीक झालें. आतां सप्तलोक म्हणजे पिंड देण्याघेण्यासंबंधानें ज्यांचा आपला उपकार–कर्तृत्वाचा संबंध येतो, ते पिता, पितामह आणि प्रपितामह अशी पूर्व पिढीची त्रयी घेतली आणि पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र अशी पुढची त्रयी घेतली तर जुळेल कीं नाहीं ? आपल्या-सह या सात पिढ्या होतातच.

**सिद्धान्ती**—हो हो ! पिंडोदकदानानें यजमान पित्रादि त्रयीवर उपकार करितो आणि अन्नदानानें पुत्रादि त्रयीवर उपकार करितो किंवा पिंडदान करून व अन्नदान करून स्वकल्याण करून घेतो, आणि असा त्याचा उभय–त्रयीवर आपण मध्यें राहून संबंध घडतो. म्हणून सात पिढ्यांचा व सात पितरादि लोकांचा नाश वर सांगितलेला अविचारी व निषिद्ध मार्गी अग्निहोत्रादि कर्में करणारा पुरुष करितो, असाही अर्थ करण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**काली कराली च मनोजवा च सुलोहिता या च सुधूम्रवर्णा । स्फुलिङ्गिनी विश्वरुची च देवी लेलायमाना इति सप्त जिह्वाः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—काली, कराली च, मनोजवा च, सुलोहिता या च सुधम्रवर्णा, स्फुलिङ्गिनी विश्वरुची च, लेलायमानादेवी इति सप्त** जिह्वाः ( कराली, काली, मनोजवा, सुलोहिता, सुधूम्रवर्णा, स्फुलिङ्गिनी, विश्वरुची (लेलायमानादेवी) या सात जिव्हा आहेत. ) ॥ ४ ॥

काली कराली च मनोजवा च सुलोहिता या च सुधूम्रवर्णा ।
स्फुलिङ्गिनी विश्वरुची च देवी लेलायमाना इति सप्त जिह्वाः ।
काल्याद्या विश्वरुच्यन्ता लेलायमाना अग्नेर्हविराहुतिग्रसनार्था एताः सप्त जिह्वाः ॥ ४ ॥

कालीपासून विश्वरुचीपर्यंत चंचल असणाऱ्या वरील सप्त जिह्वा अग्नीच्या आहेत. या सर्वांचा उपयोग आहुति–ग्रहण करण्यामध्यें असतो. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**एतेषु यश्चरते भ्राजमानेषु यथाकालं चाऽऽहु-
तयो ह्याददायन्। तं नयन्त्येताः सूर्यस्य रश्मयो
यत्र देवानां पतिरेकोऽधिवासः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—एतेषु भ्राजमानेषु यः चरते, यथा काले च आहुतयः आददायन्** (या देदिप्यमान अग्निजिह्वांच्या भेदांमध्यें जो अग्निहोत्री शास्त्रोक्त कर्म करितो; त्याचप्रमाणें जो यथाकाली आहुतींचें समर्पण करितो) **एताः सूर्यस्य रश्मयः यत्र देवानां एकः पतिः अधिवासः तं नयंति** (या आहुति सूर्याचे किरण होऊन त्यांच्या द्वारानें, जेथें देवांचा स्वामी वास्तव्य करितो, तेथें या सूर्यरश्मि यथोक्त-कारी अग्निहोत्र्याला घेऊन जातात.) ॥ ५ ॥

एतेष्वग्निजिह्वाभेदेषु योऽग्निहोत्री चरते कर्माऽऽचरत्यग्निहोत्रादि भ्राजमानेषु दीप्यमानेषु । यथाकालं च यस्य कर्मणो यः कालस्त-त्कालं यथाकालं यजमानमाददायन्नाददाना आहुतयो यजमानेन निर्वर्तितास्तं नयन्ति प्रापयन्त्येता आहुतयो या इमा अनेन निर्व-र्तिताः सूर्यस्य रश्मयो भूत्वा रश्मिद्वारैरित्यर्थः । यत्र यस्मिन्स्वर्गे देवानां पतिरिन्द्र एकः सर्वानुपर्यधिवसतीत्यधिवासः ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—जो अग्निहोत्री या सात देदिप्यमान अग्निजिह्वांच्या भेदामध्यें (एका ज्वालेच्या व दुसऱ्या ज्वालेच्या मध्यें अंतर असतें त्यांत) आहुती देतो, अग्निहोत्रादि कर्माचें आचरण करितो, आणि ज्या कालीं जें कर्म करावयाचें तें कर्म त्या कालीं म्हणजे यथाकालीं करितो म्हणजे यजमानानें दिलेल्या आहुती यथासांग समर्पित होतात. त्या अग्निहोत्र्याला, यजमानाला, धन्य करणाऱ्या या आहुती सूर्यकिरणरूपी होतात; आणि त्यांच्या साहाय्यानें त्या आहुती अशा स्वर्गलोकामध्यें यजमानाला घेऊन जातात कीं, जेथें देवांचा राजा इंद्र वास्तव्य करित असतो. हा इंद्र देवांचा स्वामी असून, त्यांच्याहून सर्वथा श्रेष्ठ आहे व तो श्रेष्ठलोकांत वास्तव्य करितो. सारांश, यथा-सांग कर्म करणारा अग्निहोत्री इंद्रलोकीं जातो. ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**एह्येहीति तमाहुतयः सुवर्चसः सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं वहन्ति । प्रियां वाचमभिवदन्त्योऽर्चयन्त्य एष वः पुण्यः सुकृतो ब्रह्मलोकः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थ—'वः एषः पुण्यः सुकृतः ब्रह्मलोकः' 'एहिएहि इति' प्रिया सुवर्चसः वाचं अभिवदन्त्यः अर्चयन्त्यः आहुतयः तं यजमानं सूर्यस्य रश्मिभिः वहंति,** ('यावें, यावें' असें म्हणून या तेजस्वी आहुती सूर्याच्या किरणसाहाय्यानें यजमानाला वाहून घेऊन जातात व 'हा तुमचा पुण्य-सुकृत ब्रह्मलोक आहे.' अशा मधुरवाणीनें यजमानाची स्तुति करितात आणि त्याची पूजा करितात.) ॥ ६ ॥

कथं सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं वहन्तीत्युच्यत एह्येहीत्याह्वयन्त्यः । सुवर्चसो दीप्तिमत्यः । किंच प्रियामिष्टां वाचं स्तुत्यादिलक्षणामभिवदन्त्य उच्चारयन्त्योऽर्चयन्त्यः पूजयन्त्यश्चैष वो युष्माकं पुण्यः सुकृतः पन्था ब्रह्मलोकः फलरूपः । एवं प्रियां वाचमभिवदन्त्यो वहन्तीत्यर्थः । ब्रह्मलोकः स्वर्गः प्रकरणात् ॥ ६ ॥

**सिद्धान्ती**—या तेजस्वी आहुती 'यावें, यावें' असें आमंत्रण करून आणि 'हा आपल्यास आपल्या पुण्याईनें सुकर आणि सुखकर ब्रह्म लोक (स्वर्गलोक) फल रूपानें प्राप्त झाला आहे' अशा तऱ्हेचे प्रिय, इष्ट, मिष्ट, मधुर, स्तुति-परिपूर्ण शब्द उच्चारून आणि यजमानाची आराधना करून या आहुती यजमानाला स्वागतपूर्वक ब्रह्मलोकीं वाहून नेतात. हा ब्रह्मलोक म्हणजे स्वर्ग लोक होय. कारण हें स्वर्गाचें प्रकरण आहे. स्वर्ग-विचार येथें चालला आहे. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म । एतच्छ्रेयो येऽभिनन्दन्ति मूढा जरामृत्युं ते पुनरेवापि यन्ति ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ—एते यज्ञरूपाः अदृढाः प्लवाः** ( या यज्ञरूप नौका अदृढ-विनाशी-असतात. ) **एषु अष्टादशोक्तं अवरं कर्म** ( यामध्यें

अष्टादशोक्त अल्पमोली कर्म आहे. ) **ये मूढाः एतत् श्रेयः अभिनंदंति ते पुनः जरामृत्युं एव यंति** ( जे मूर्ख लोक, 'कर्म हाच श्रेष्ठ मार्ग आहे' असें समजून आनंद मानून घेतात, ते पुनः पुनः जरा–म्हातारपण–आणि मृत्यु पावतात. ) ॥ ७ ॥

एतच्च ज्ञानरहितं कर्मैतावत्फलमविद्याकामकर्मकार्यमतोऽसारं दुःखमूलमिति निन्द्यते । प्लवा विनाशिन इत्यर्थः । हि यस्मादेतेऽदृढा अस्थिरा यज्ञरूपा यज्ञस्य रूपाणि यज्ञरूपा यज्ञनिर्वर्तका अष्टादशाष्टादशसंख्याकाः षोडशर्त्विजः पत्नी यजमानश्चेत्यष्टादश । एतदाश्रयं कर्मोक्तं कथितं शास्त्रेण । येष्वष्टादशस्ववरं केवलं ज्ञानवर्जितं कर्म । अतस्तेषामवरकर्माश्रयाणामष्टादशानामदृढतया प्लवत्वात्प्लवते सह फलेन तत्साध्यं कर्म । कुण्डविनाशादिवत्क्षीरदध्यादीनां तत्स्थानां नाशः । यत एवमेतत्कर्म श्रेयः श्रेयःकरणमिति येऽभिनन्दन्त्यभिहृष्यन्त्यविवेकिनो मूढा अतस्ते जरां च मृत्युं च जरामृत्युं किंचित्कालं स्वर्गे स्थित्वा पुनरेवापि यन्ति भूयोऽपि गच्छन्ति ॥७॥

**सिद्धान्ती**—याप्रमाणें वर सांगितलेलें कर्म ज्ञानशून्य आहे. त्याच्या ह्या अल्प योग्यतेचे फलाची मर्यादा इतकीच आहे. हें फल म्हणजे अविद्येपासून उत्पन्न होणाऱ्या वासनेच्या प्रेरणेनें झालेलें जें कर्म त्याचा विपाक होय. वासना अविद्याजन्य असते, म्हणून वासनाप्रेरित कर्मही निःसार आणि दुःख–मूलक होऊन सर्व संसार सुख–शून्य होतो. अशा प्रकारें कर्माची निंदा श्रुतीनें या मंत्रांत केली आहे. श्रुति म्हणते कीं, कामजन्य यज्ञरूपी या ज्या नौका आहेत, त्या अस्थिर व दुर्बल असल्यामुळें विनाशी असतात. या यज्ञादिकर्मांच्या कारभारांत अठरा लोकांनीं अठरा प्रकारचें करावें लागणारें कर्म ज्ञानशून्य असतें.

**शिष्य**—प्रत्येक वेदाचे चार चार याप्रमाणें सोळा ऋत्विज्, यजमान आणि यजमान-पत्नी हे यज्ञकर्मांत प्रमुखत्वानें असणारे लोक होत.

**सिद्धान्ती**—होय. प्रत्येकास कांहीं तरी कर्म शास्त्रानें विहित केलें आहे, पण या कर्मामध्यें स्वरूपाच्या ज्ञानाचा बिलकुल संबंध नाहीं. तेव्हां या असल्या ज्ञानशून्य व क्षुद्र कर्म करणाऱ्या अठरा लोकांची स्थिति आज्ञानमय असल्यामुळें त्यांच्या अस्थिर कर्माश्रयानें उत्पन्न होणारी नौका ही अत्यंत विनाशी असते म्हणजे या अठरा लोकांनीं केलेलें कर्म व कर्मफल हीं उभयतांही विनाशी असतात. अर्थात् या असल्या अस्थिर नौकेवर बसलेल्या लोकांचा घात होतो. दह्यादुधाचीं भांडीं फुटलीं असतां त्यांतील दहीं–दूध व्यर्थ जातें हें तुलाही ठाऊक आहे. मग घातक अठरा फळ्या एकत्र जुळवून चंचल झालेल्या

नौकेमध्यें बसणारे लोक नष्ट होतात; यांत काय आश्चर्य आहे? पण असे कांहीं लोक असतात कीं, ज्यांना हें अज्ञानजन्य यज्ञकर्म हेंच काय तें मोक्षसाधन आहे असें वाटतें. जे लोक या कर्मानें आपलें अभिनंदन करून घेतात; ते लोक मात्र खरोखर अविवेकी होत. अर्थातच त्यांना जरा आणि मृत्यु यांस वश व्हावें लागतें. सत्कर्मानें कांहीं कालपर्यंत त्यांस स्वर्गसुख मिळतें हें खरें; पण त्यांचें कर्म ज्ञानशून्य असल्यामुळें होणारें कर्मफलही अस्थिर असतें व तें फल संपल्यावर कर्मकर्त्यांच्या मागें जन्म–मृत्यूची साडेसाती लागलेली असतेच असते. ॥ ७ ॥

**रंगरामानुज**—'अष्टादश=सोळा ऋत्विज्, यजमान व तत्पत्नी; किंवा १८ स्मृति.

**माध्व०**—या मंत्रांत विकलांग (अविधिपूर्वक) व सकाम कर्में अनिष्ट कां आहेत हें सांगितलें आहे. 'अष्टादशोक्तं'=पुराण, न्याय, मीमांसा, धर्मशास्त्र, आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्व, अर्थशास्त्र, चार वेद आणि सहा शास्त्रें मिळून अठरा ग्रंथ होतात. या १८ग्रंथांनीं सांगितलें तें अष्टादशोक्त कर्म होय. 'अवरः' म्हणजे अपकृष्ट=न्यून=कमी योग्यतेचें=अंगभूत=यज्ञेतर कर्म. हें कर्मच श्रेष्ठ आहे, असें भगवंतास विसरून मूर्ख लोक म्हणतात.

---

## मंत्र आठवा.

**अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पण्डितंमन्यमानाः। जङ्घन्यमाना परियान्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथाऽन्धाः ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ—अविद्यायां अन्तरे वर्तमानाः** ( नित्य अविद्येमध्यें राहणारे ) **स्वयं धीराः** ( आपण मोठें विद्वान् आहों असें म्हणणारे ) **पंडितं मन्यमानाः** ( समजावयाचें तें आपल्यास समजलें आहे असें म्हणणारे ) **जंघन्यमानाः मूढाः परियंति** ( शेवटीं नाश पावणारे मूर्ख लोक परिभ्रमण करीत असतात. ) **अंधेन नीयमानाः अन्धाः इव** (अंधळ्यानीं अंधळ्याला न्यावें त्याप्रमाणें वरील अविद्याप्रेरित पुरुषांची स्थिति होते. ) ॥ ८ ॥

किंचाविद्यायामन्तरे मध्ये वर्तमाना अविवेकप्रायाः स्वयं वयमेव धीरा धीमन्तः पण्डिता विदितवेदितव्याश्चेति मन्यमाना आत्मानं संभावयन्तस्ते च जङ्घन्यमाना जरारोगाद्यनेकानर्थव्रातैर्हन्यमाना भृशं पीड्यमानाः परियन्ति विभ्रमन्ति मूढाः । दर्श-

नवार्जितत्वादन्धेनैवाचक्षुष्केणैव नीयमानाः प्रदर्श्यमानमार्गा यथा लोकेऽन्धा अक्षिरहिता गर्तकण्टकादौ पतन्ति तद्वत्॥ ८॥

**सिद्धान्ती**—अविद्येच्या साम्राज्यांत वावरणारे अल्पज्ञ व अल्प विवेकी लोक 'आपण फार मोठे विद्वान् आहों.' 'समजून घ्यावयाचें तें आपल्यास सर्व समजलें आहे.' असें समजून आपल्यासच आपण शाबासकी देत असतात व धन्य मानून घेतात. पण या अज्ञानी लोकांस त्यांच्याच मूर्खत्वामुळें जरा, रोग इत्यादि अनेक संकटपरंपरा जोराचे धक्के मात्र देत असतात आणि यामुळें हे सारखे परिभ्रमण करीत राहतात. डोळे नाहींसे झालेल्या अंधानें हातीं धरलेले व त्याच्या पाठीमागून जाणारे आंधळे लोक व्यवहारांत ज्याप्रमाणें कांट्या-कुट्यांत व खांच-खळग्यांत जाऊन पडतात, त्याप्रमाणें ज्ञानशून्य अविद्येच्या आधारानें चालणारे अज्ञानी लोक जन्म-मृत्यूच्या अथांग गर्तेमध्यें जाऊन पडतात आणि तळमळत राहतात. ॥ ८ ॥

**माध्व०**—'अविद्या'=इश्वरेच्छा आणि भावरूप अज्ञान. यांनीं 'पंडितं' हें पद निराळें करून अर्थ केला आहे. 'पंडितंमन्यमानाः'=पांडित्याचे अभिमानी. जंघन्यमान= हिंसात्मक यज्ञ करणारे. अग्निहोत्राचाही यांतच समावेश होतो.

---

## मंत्र नववा.

**अविद्यायां बहुधा वर्तमाना वयं कृतार्था इत्यभिमन्यन्ति बालाः। यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात्तेनाऽऽतुराः क्षीणलोकाश्च्यवन्ते ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ—अविद्यायां बहुधा वर्तमानाः बालाः 'वयं कृतार्थाः' इति अभिमन्यन्ति** (अविद्येमध्यें अनेक प्रकारांनीं संचारणारे बालिश लोक 'आपण कृतार्थ आहों' असें मानून अभिमानानें आपली धन्यता गात असतात.) **यत् रागात् कर्मिणः न प्रवेदयन्ति तेन आतुराः क्षीणलोकाः च्यवन्ते** (ज्या अर्थीं अभिमान-वासनादि अविद्येस वश झालेले लोक तत्त्वज्ञानास पारखे होतात, त्याअर्थीं त्या लोकांस दुःखें प्राप्त होऊन स्वर्ग-लोकांतूनही भ्रष्ट व्हावें लागतें.) ॥९॥

किंचाविद्यायां बहुधा बहुप्रकारं वर्तमाना वयमेव कृतार्थाः कृतप्रयोजना इत्येवमभिमन्यन्त्यभिमानं कुर्वन्ति बाला अज्ञानिनः। यद्यस्मादेवं कर्मिणो न प्रवेदयन्ति तत्त्वं न जानन्ति रागात्कर्मफल-

रागाभिभवनिमित्तं तेन कारणेनाऽऽतुरा दुःखार्ताः सन्तः क्षीणलोकाः क्षीणकर्मफलाः स्वर्गलोकाच्च्यवन्ते ॥ ९ ॥

**सिद्धान्ती**—अविद्येमध्यें राहून अनेक ज्ञानशून्य कर्म करणारे लोक असें समजतात कीं, शास्त्रानें सांगितलेलें विहित कर्म आपल्या हातून झालें म्हणजे आपण धन्य झालों, आपली इतिकर्तव्यता संपली, आपल्यास ज्ञानाची कांहीं गरज नाहीं. पण ज्ञानाचें माहात्म्य काय आहे, हें या विवेकशून्य लोकांस समजलें नसल्यामुळें कर्म हाच जीवाचा तरणोपाय आहे असें हे लोक समजतात; आणि आपण मोठे कर्म–कर्ते असा अभिमान बाळगीत असतात. या लोकांस स्वरूपज्ञान झालें नसल्यामुळें कर्माचा अभिमान आणि कर्मफलाची वासना व अज्ञान हीं त्यांच्या पराभवाचें निमित्त होतात. या कारणानें ते दुःखवश होतात; आणि कर्मफलानें जरी त्यांस स्वर्ग प्राप्त झाला, तरी पुण्यनाश झाल्याबरोबर ते स्वर्गभ्रष्ट होतात आणि दुःखांत येऊन पडतात. उत्पन्न झालेल्या वस्तूचा केव्हां तरी नाश होतो, म्हणून त्या कर्मांच्या फलाचाही नाश होतो. हें तत्त्व या बिचाऱ्या अज्ञानी लोकांस समजत नाहीं, आणि म्हणून ते फसतात. ॥ ९ ॥

**माध्व०**—बहुधा वर्तमानाः=नाना देवतांची पूजा करून नाना प्रकारांनीं वागणारे. विष्णु हा सर्व देवांपेक्षां अमळसा मोठा आहे असें म्हणणाऱ्या लोकांस मनुष्यलोकीं जन्म येतो आणि तो इतर देवांच्या बरोबरीचा आहे, किंवा त्यापेक्षां कमी योग्यतेचा आहे, असें म्हणणारे लोकांस हीनतर-लोकीं जन्म घ्यावा लागतो.

---

## मंत्र दहावा.

**इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं नान्यच्छ्रेयो वेदयन्ते प्रमूढाः । नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वेमं लोकं हीनतरं वा विशन्ति ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थ**—इष्टापूर्तं वरिष्ठं मन्यमानाः प्रमूढाः अन्यत् श्रेयः न वेदयन्ते ( इष्टापूर्त हेंच सर्वश्रेष्ठ कर्म आहे असें मानणारे मूर्ख लोकांस दुसरा खरा कल्याणकारक मार्ग ठाऊक असत नाहीं. ) ते नाकस्य पृष्ठे सुकृते अनुभूत्वा इमं लोकं हीनतरं वा विशंति ( हे लोक स्वर्गलोकीं जाऊन तेथें पुण्योपभोगासाठीं सुंदर शरीरें धारण करितात आणि कांहीं वेळ सुख भोगून पृथ्वीवर मनुष्य जन्म प्राप्त

करून घेतात किंवा या जन्मापेक्षांहीं हीनतर योनींत या मूर्ख लोकांस जन्म घ्यावा लागतो. ) ॥ १० ॥

इष्टापूर्तम् । इष्टं यागादि श्रौतं कर्म । पूर्तं वापीकूपतडागादि स्मार्तं । मन्यमाना एतदेवातिशयेन पुरुषार्थसाधनं वरिष्ठं प्रधानमिति चिन्तयन्तोऽन्यदात्मज्ञानाख्यं श्रेयःसाधनं न वेदयन्ते न जानन्ति प्रमूढाः पुत्रपशुबन्ध्वादिषु प्रमत्ततया मूढास्ते च नाकस्य स्वर्गस्य पृष्ठ उपरिस्थाने सुकृते भोगायतनेऽनुभूत्वाऽनुभूय कर्मफलं पुनरिमं लोकं मानुषमस्माद्धीनतरं वा तिर्यङ्नरकादिलक्षणं यथाकर्मशेषं विशन्ति ॥ १० ॥

**सिद्धा०**—यागादि श्रौतकर्में व वापी, कूप इत्यादि स्मार्त हीं इष्टापूर्तादिकर्मेंच पुरुषार्थाचें अत्यंत श्रेष्ठ साधन आहेत, असें मानणाऱ्या लोकांस आत्मज्ञान या नांवाचें एक सर्वमान्य आणि सर्वश्रेष्ठ पुरुषार्थसाधन आहे, मोक्षाचें साधन आहे, हें ठाऊक नसतें. ते लोक पुत्र-दारा-धन, इष्ट-मित्र इत्यादिकांच्या मोहानें उन्मत्त होऊन मूर्ख झालेले असतात. यांच्या हातून कांहीं थोडें शास्त्रविहित सकाम कर्म झालें असल्यामुळें या लोकांस स्वर्गाच्या पृष्ठभागावर कांहीं दिवस पुण्यशरीराचा लाभ होतो. पण हा लाभ किंवा हें सुख कर्मानें आणिलेलें; स्वस्वरूपसुख नव्हे. अर्थातच या उसनें आणलेल्या सुखाचा अनुभव कांहीं वेळ घेऊच त्यांस दुःखकर मनुष्यजन्म किंवा मनुष्यापेक्षांही हीन असा पशु-पक्ष्यादिकांचा जन्म त्यांच्या त्यांच्या शेष राहिलेल्या कर्मांनुसार प्राप्त होतो. तात्पर्य वासनेनें प्रेरिलेलें कर्म नित्य-सुख देण्याला केव्हांही समर्थ असत नाहीं. ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा.

**तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्ष्यचर्यां चरन्तः । सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा ॥ ११ ॥**

**अन्वय व अर्थ—ये भैक्ष्यचर्यां चरंतः शांताः विद्वांसः अरण्ये हि तपश्रद्धे उपवसंति** ( पण भिक्षावृत्तीनें राहून जे शांत आणि ज्ञानी लोक अरण्यामध्यें श्रद्धापूर्वक तपश्चर्या करितात.) **ते विरजाः; यत्र सः अमृतः पुरुषः हि अव्ययात्मा, सूर्यद्वारेण प्रयान्ति** ( ते निर्मळ लोक जेथें तो अमृत आणि अव्ययात्मा पुरुष राहतो त्या लोकाला सूर्यद्वारानें जातात. ) ॥ ११ ॥

ये पुनस्तद्विपरीता ज्ञानयुक्ता वानप्रस्थाः संन्यासिनश्च तपःश्रद्धे हि तपः स्वाश्रमविहितं कर्म । श्रद्धा हिरण्यगर्भादिविषया विद्या ते तपःश्रद्धे उपवसन्ति सेवन्तेऽरण्ये वर्तमानाः सन्तः । शान्ता उपरतकरणग्रामाः । विद्वांसो गृहस्थाश्च ज्ञानप्रधाना इत्यर्थः । भैक्ष्यचर्यां चरन्तः परिग्रहाभावादुपवसन्त्यरण्य इति संबन्धः । सूर्यद्वारेण सूर्योपलक्षितेनोत्तरायणेन पथा ते विरजा विरजसः क्षीणपुण्यपापकर्माणः सन्त इत्यर्थः । प्रयान्ति प्रकर्षेण यान्ति यत्र यस्मिन्सत्यलोकादावमृतः स पुरुषः प्रथमजो हिरण्यगर्भो ह्यव्ययात्माऽव्ययस्वभावो यावत्संसारस्थायी । एतदन्तास्तु संसारगतयोऽपरविद्यागम्याः । ननु—एतं मोक्षमिच्छन्ति केचिन्नेहैव सर्वे प्रविलीयन्ति कामास्ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानः सर्वमेवाऽऽविशन्तीत्यादिश्रुतिभ्योऽप्रकरणाच्च । अपरविद्याप्रकरणे हि प्रवृत्ते न ह्यकस्मान्मोक्षप्रसङ्गोऽस्ति विरजस्त्वं त्वापेक्षिकं समस्तमपरविद्याकार्यं साध्यसाधनलक्षणं क्रियाकारकफलभेदभिन्नं द्वैतम् । एतावदेव यद्धिरण्यगर्भप्राप्त्यवसानम् । तथा च मनुनोक्तं स्थावराद्यां संसारगतिमनुक्रामता—

" ब्रह्मा विश्वसृजो धर्मो महानव्यक्तमेव च ।
उत्तमां सात्त्विकीमेतां गतिमाहुर्मनीषिणः " इति ॥ ११ ॥

**सिद्धान्ती**—वरील मंत्रांतील अज्ञ कर्मठ लोकांहून विलक्षण असणाऱ्या ज्ञानयुक्त कर्मठ लोकांचा विचार या मंत्रांत केला आहे. हे लोक वानप्रस्थ असतात किंवा संन्यासीही असतात. हे स्वधर्माचें आचरण यथास्थित करून त्यानेंच तपाची सांगता करतात. हिरण्यगर्भादि अपरब्रह्माचें स्वरूपज्ञान यांस झाल्यामुळें यांची तत्संबंधी आस्तिक्य बुद्धि श्रेष्ठ प्रकारची असते. याप्रमाणें हे तप आणि श्रद्धा या उभयतांनीं अलंकृत झालेले वानप्रस्थ व संन्यासी अरण्यामध्यें वास्तव्य करितात. यांचीं सर्व इंद्रियें विषय-निवृत्त झालेलीं असतात. तसेंच, हे विद्वान् गृहस्थ ज्ञानीही असतात. हे आपला उदरनिर्वाह भिक्षावृत्तीनें चालवितात. कारण पुत्र, मित्र, कलत्रादि सर्व प्रकारचा परिग्रह यांनीं टाकून दिलेला असतो आणि म्हणून ते अरण्यांत राहतात. असो, हे लोक निर्मळ झाले असल्यामुळें म्हणजे यांचीं पुण्य-पापात्मक कर्में क्षीण झालीं असल्यामुळें ते उत्तरायण मार्गानें ( देवयानानें ) सत्यलोकाला जातात. सूर्यद्वार हें उपलक्षण मात्र आहे. हा लोक असा असतो कीं, येथें प्रथम उत्पन्न झालेला जो हिरण्यगर्भ त्याचें वास्तव्य असतें. हिरण्यगर्भ अमर आहे आणि अव्ययात्मा म्हणजे अविकारी आहे. जावत्काल-

पर्यंत हा संसार म्हणजे हें दृश्य विश्व आहे, तावत्कालपर्यंत त्याचें नियमन करणारा हिरण्यगर्भ अमर आणि अविनाशी असतो. सारांश सत्य–लोकादि अमृत–भुवनांत या ज्ञानी कर्मठांस कल्पपर्यंत अमरत्वानें वास्तव्य करावयास सांपडतें. अपरविद्येनें सर्व कल्पपर्यंत मात्र असणारी ही अमरस्थिति ज्ञानी कर्मठांस उपभोगावयास सांपडते. एवंच अज्ञानी लोकांच्या अपरविद्येची ही उत्तरमर्यादा होय. सामान्य लोकांस पुनः जन्म यावयाचा असतो व दुःखमूलक संसार भोगावा लागतो. ज्ञानी कर्मठांस कल्पपर्यंत मात्र सुखाची प्राप्ति होते. ही अपरविद्येच्या फलाची अंतिमगति आहे. या विद्येला याच्यापुढें स्वभक्तांस नेतां येत नाहीं.

**पूर्वपक्षी**—हिरण्यलोकांत वास्तव्य होणें हा मोक्ष नव्हे काय ?

**सिद्धान्ती**—नाहीं. कारण, हिरण्यगर्भलोकप्राप्ति ही देशपरिच्छिन्न आहे म्हणजे देशविशेषांत ( एकामात्र प्रदेशांत ) आणि कालविशेषांत ( एकामात्र कालांत ) ज्ञानी कर्मठास अपरविद्येनें अमरत्व प्राप्त होतें. ही स्थिति म्हणजे मोक्ष नव्हे. मोक्षस्थिती-मध्यें "सर्व प्रकारच्या सर्व इच्छा सर्वथा नष्ट होत असतात." "मोक्ष मिळाला असतां ज्ञानैकनिष्ठ पुरुषांना सर्वव्यापित्व व सर्वसाक्षित्व सर्वप्रकारानें प्राप्त होऊन ते मुक्त लोक सर्वात्मक होतात." इत्यादि स्थिति मात्र मोक्षात्मक आहे, असें या मुंडकांतील श्रुतीचें सांगणें आहे. शिवाय मंत्रांतील प्रकरण अपरविद्येचें आहे, मोक्षविद्येचें नाहीं, अपरविद्येचें प्रकरण चालू असतां एकाएकीं ( कारण न दाखवितां ) मोक्ष-प्रसंगाचा विचार सर्वज्ञ श्रुति करील असें व्हावयाचें नाहीं.

**पूर्वपक्षी**—पण याच मंत्रांत विरज ( निर्मळ ) असें पद आहे, तें तुमच्या अर्थानें अप्रस्तुत व अप्रयोजक होतें.

**सिद्धान्ती**—नाहीं. येथें हें पद सापेक्ष आहे. अज्ञानी संसाऱ्यापेक्षां योग्यमार्गानें चालणारा ज्ञानी कर्मठ जास्त निर्मळ असतो. इतकाच काय तो भाग येथें सांगाव-याचा आहे. ध्यानांत ठेवा कीं अपरविद्येनें सिद्ध झालेलें कोणतेंही कार्य विशेष साध-नांनीं भविष्यत्कालीं साधावयाचें असतें. सिद्ध–स्वरूपाचें नसतें. अपरविद्येच्या कर्मांत क्रिया, कर्ता, फल इत्यादि अनेक भेद स्पष्ट असतात म्हणजे द्वैत मूर्तिमंत असतें. अद्वैत नसतें. आणि जोंपर्यंत द्वैतभाव आहे तोंपर्यंत निरपेक्ष निर्मलता ( स्वयंभु शुद्धि ) प्राप्त होत नाहीं. असो; हिरण्यगर्भाच्या प्राप्तीनें फार तर कल्पर्यंत अमरत्व आणि अविकारित्व प्राप्त होईल. याच्यापुढें जाण्याचें सामर्थ्य अपरविद्येला नाहीं. स्थावरादि संसारगति सांगतांना मनूनें म्हटलें आहे. "चतुर्मुख ब्रह्मा, मरीचिप्रभृतिप्रजापति, यमधर्म, सूत्रात्मा, त्रिगुणात्मिका प्रकृति ( अव्यक्त ) हा सर्व सात्विक वस्तूंचा उत्तम संग्रह आहे." असो; ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय करून जे लोक शास्त्रशुद्ध कर्म करितात, त्यांना ही गति प्राप्त होते; असें सर्वज्ञ विद्वान् लोक सांगत असतात. ।। ११ ॥

**रंगरामानुज**—' तप '= ब्रह्म. या मंत्रांतील ज्ञानी भिक्षु सूर्यमंडलाचा भेद करून सर्वदा एकरूपी असणाऱ्या (नित्य शरीरी असणाऱ्या) देवाधिदेवाच्या लोकाप्रत जातात.

**माध्व०**—आतांपर्यंत गृहस्थधर्म सांगितले. यापुढें या मंत्रांत शमदमादि यतिधर्म सांगितले आहेत. पुरुष हा पूर्ण षड्गुण आहे. तेथें जाऊन व त्याला नमस्कार करून वैकुंठामध्यें अमृतरूपी पुरुषोत्तम असतो, त्या लोकाप्रत निर्मळ मनाचे ज्ञानी लोक जातात.

---

## मंत्र बारावा.

**परीक्ष्य लोकान्कर्मचितान्ब्राह्मणो निर्वेदमाया-**
**न्नास्त्यकृतः कृतेन । तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभि-**
**गच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥ १२ ॥**

**अन्वय व अर्थ—कर्मचितान् लोकान् परीक्ष्य ब्राह्मणः निर्वेदं आयात्** ( कर्मानें उत्पन्न होणारे सर्व लोकांची–संसारमूलक स्थितींची–यथास्थित परीक्षा करून ब्राह्मणाला वैराग्य प्राप्त होतें. ) **कृतेन अकृतः न अस्ति** ( केलेल्या कर्मानें केव्हांही कर्मशून्य–नित्यसिद्ध–ब्रह्म सिद्ध होत नाहीं.)–म्हणून–**तद्विज्ञानार्थं सः समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं गुरुं एव अभिगच्छेत्** ( ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान–विज्ञान मिळविण्यासाठीं या ब्राह्मणानें हातांत समिधा घेऊन वेदवेत्त्या ब्रह्मनिष्ठ गुरूला शरण जावें. ) ॥ १२ ॥

अथेदानीमस्मात्साध्यसाधनरूपात्सर्वस्मात्संसाराद्विरक्तस्य परस्यां विद्यायामधिकारप्रदर्शनार्थमिदमुच्यते—परीक्ष्य यदेतदृग्वेदाद्यपरविद्याविषयं स्वाभाविक्यविद्याकामकर्मदोषवत्पुरुषानुष्ठेयमविद्यादिदोषवन्तमेव पुरुषं प्रति विहितत्वात्तदनुष्ठानकार्यभूताश्च लोका ये दक्षिणोत्तरमार्गलक्षणाः फलभूता ये च विहिताकरणप्रतिषेधातिक्रमदोषसाध्या नरकतिर्यक्प्रेतलक्षणास्तानेतान्परीक्ष्य प्रत्यक्षानुमानोपमानागमैः सर्वतो याथात्म्येनावधार्य लोकान्संसारगतिभूतानव्यक्तादिस्थावरान्तान्व्याकृताव्याकृतलक्षणान्बीजाङ्कुरवदितरेतरोत्पत्तिनिमित्ताननेकानर्थशतसहस्रसंकुलान्कदलीगर्भवदसारान्मायामरीच्युदकगन्धर्वनगराकारस्वप्नजलबुद्बुदफेनसमान्प्रतिक्षणप्रध्वंसान्पृष्ठतः

कृत्वाऽविद्याकामदोषप्रवर्तितकर्मचितान्धर्माधर्मनिर्वर्तितानित्येतद्ब्राह्मणस्यैव विशेषतोऽधिकारः सर्वत्यागेन ब्रह्मविद्यायामिति ब्राह्मणग्रहणम् । परीक्ष्य लोकान्किं कुर्यादित्युच्यते—निर्वेदं निःपूर्वो विदिरत्र वैराग्यार्थे वैराग्यमायात्कुर्यादित्येतत् । स वैराग्यप्रकारः प्रदर्श्यते । इह संसारे नास्ति कश्चिदप्यकृतः पदार्थः । सर्व एव हि लोकाः कर्मचिताः कर्मकृतत्वाच्चानित्याः । न नित्यं किंचिदस्तीत्यभिप्रायः । सर्वं तु कर्मानित्यस्यैव साधनम् । यस्माच्चतुर्विधमेव हि सर्वं कर्म कार्यमुत्पाद्यमाप्यं संस्कार्यं विकार्यं वा नातःपरं कर्मणो विशेषोऽस्ति अहं च नित्येनामृतेनाभयेन कूटस्थेनाचलेन ध्रुवेणार्थेनार्थी न तद्विपरीतेन । अतः किं कृतेन कर्मणाऽऽयासबहुलेनानर्थसाधनेनेत्येवं निर्विण्णोऽभयं शिवमकृतं नित्यं पदं यत्तद्विज्ञानार्थं विशेषेणाभिगमार्थं स निर्विण्णो ब्राह्मणो गुरुमेवाऽऽचार्यं शमदमदयादिसंपन्नमभिगच्छेत् । शास्त्रज्ञोऽपि स्वातन्त्र्येण ब्रह्मज्ञानान्वेषणं न कुर्यादित्येतद्गुरुमेवेत्यवधारणफलम् । समित्पाणिः समिद्भारगृहीतहस्तः श्रोत्रियमध्ययनश्रुतार्थसंपन्नं ब्रह्मनिष्ठं हित्वा सर्वकर्माणि केवलेऽद्वये ब्रह्मणि निष्ठा यस्य सोऽयं ब्रह्मनिष्ठो जपनिष्ठस्तपोनिष्ठ इति यद्वत् । न हि कर्मिणो ब्रह्मनिष्ठता संभवति कर्मात्मज्ञानयोर्विरोधात् । स तं गुरुं विधिवदुपसदन्नः प्रसाद्य पृच्छेदक्षरं पुरुषं सत्यम् ॥ १२ ॥

**सिद्धान्ती**—ह्या वर सांगितलेल्या म्हणजे अनेक साधनांनीं साध्य होणाऱ्या सर्व संसारापासून वैराग्यानें सर्वथा निवृत्त झालेल्या पुरुषाला मात्र परविद्येचा अधिगम करण्याचा अधिकार प्राप्त होतो. हें दाखविण्यासाठीं, या व पुढील मंत्रांचा श्रुतीनें अवतार केला आहे. मंत्राचा अर्थ असा आहे;—ऋग्वेदादि अपरविद्येचे जे जे विषय आहेत, ते सर्व या अखिल व्यवहारांत स्वतःसिद्ध किंवा स्वयंभु असणारी जी अविद्या तिनें प्रेरित केलेले कर्मांनें कलुषित झालेल्या पुरुषानें मात्र साधावयाचे आहेत. अपरविद्येचे सर्व विषय अविद्याग्रस्त जीवाला मात्र विहित केलेले असतात. या विद्येनें सांगितलेलीं कर्मे केलीं असतां, पितृयाण किंवा देवयानमार्गानें ( दक्षिणोत्तरमार्गांनीं ) साध्य होणारे कालभंगुर लोक प्राप्त होतात. अविद्यावन्तकर्मांचें अविद्यावंत पुरुषास प्राप्त होणारें हें फल आहे.

**शिष्य**—तसेंच विहितकर्मांचें अनुष्ठान केलें नाहीं, निषिद्ध कर्माचरण केलें, तर पापाची उत्पत्ति होऊन नरकलोक, पशुपक्ष्यांचा जन्म, भूतप्रेतादि योनींची प्राप्ति, इत्यादि फलें प्राप्त होतात. होय नाहीं?

**सिद्धान्ती**—होय. सारांश, अज्ञानानें विहितकर्म केलें तर पितृलोक, ज्ञानपूर्वक (श्रद्धेनें) विहितकर्म केलें तर सत्यलोकापर्यंतचे सर्व स्वर्गलोक मिळतात, तथापि येथील वास्तव्य देशनियमित व कालनियमित असतें. तसेंच कर्तव्य केलें नाहीं, अकर्तव्य केलें, तर नरकलोकाची प्राप्ति होते, असा कर्म-परिपाकाचा वृत्तांत आहे. असो; प्रत्यक्ष, अनुमान, उपमान आणि शाब्द (श्रुति) या प्रमाणांनीं पूर्वोक्त कर्मांचें व कर्मफलाचें स्वरूप त्यानें सर्व दृष्टीनीं यथार्थ समजून घेतलेलें असतें. तसेंच जन्ममरणात्मक संसारगति उत्पन्न करणारे अव्यक्तापासून तों स्थावरापर्यंतचे सर्व लोक (हिरण्यगर्भापासून तों जडपदार्थांपर्यंतची व्यवहारसंतति) व्याकृत आणि अव्याकृत लक्षणांनीं युक्त असतात.

**शिष्य**—म्हणजे ? अव्याकृत जें बीज (मूलप्रकृति) त्यापासून व्याकृतस्थिति म्हणजे अंकुराची, नामरूपाची, स्थिति प्राप्त होते. तें हें व्याकृत म्हणजे सर्व व्यावहारिक पदार्थ आहेत. असेंच ना ?

**सिद्धान्ती**—इतकेंच नव्हे, तर बीजापासून अंकुर आणि अंकुरापासून सिद्ध झालेल्या वृक्षाचें बीज या न्यायानें अव्याकृतापासून व्याकृत होणें आणि व्याकृतापासून अव्याकृतांत परत जाणें अशा लक्षणाचें हें संसारचक्र आहे. एकाच जीवाची गोष्ट घ्या. स्वकर्मांच्या योगानें अदृष्ट म्हणजे अव्याकृत अपूर्व उत्पन्न होतें. या अदृष्टापासून पुनः कर्म होतें आणि असें हें रहाटगाडगें अज्ञानस्थितींत अनाद्यनंतकालपर्यंत चालू राहतें. असो; हें संसारचक्र हजारों, लाखों, संकटांनीं युक्त झालेलें आहे. केळीचा गाभा जसा पोकळ (निःसत्त्व) असतो, त्याप्रमाणें हा व्यवहार आणि व्यवहारांतील सर्व भुवनें परमार्थतः असार, तात्पर्यशून्य, पोकळ, असतात. यांचें वास्तव्य मृगजलवत् आहे. जल नसून जल भासणें, गंधर्वनगरी नसून ती आहे असें दिसणें, स्वप्न दिसून तें खोटें असणें, पाण्यावरील बुडबुडे किंवा फेंस क्षणभंगुर असणें, याप्रमाणें प्रतिक्षणीं उत्पन्न होऊन नाहींशी होणारी व परमार्थतः मुळींच नसणारी ही मायारूपी संसारस्थिति आहे. असो; असा या संसारस्थितीचा अनुभव चारी प्रमाणांनीं येऊन ती सर्वथा दुःखद आहे, असा दृढविवेकानें निश्चय झाल्यावर वैराग्य प्राप्त होतें. अविद्याजन्यवासनेच्या दोषानें प्रेरित झाल्यामुळें पापपुण्यात्मक कर्मांनें उत्पन्न झालेलीं सर्व भुवनें, सर्व व्यवहारस्थिति, पाठीमागें टाकण्याचा—तात्पर्य व्यवहार—त्याग करून व इंद्रियदमन करून मोक्षेच्छा धारण करण्याचा—विशेष अधिकार ब्राह्मणाला मात्र आहे. सर्वत्याग केल्याशिवाय ब्रह्मविद्या प्राप्त होत नाहीं व ब्रह्म समजत नाहीं. ब्रह्मविद्या समजून घेतो तोच ब्राह्मण होय. असो; एक ज्ञानी ब्राह्मण मात्र सर्व व्यवहाराचा त्याग करण्यास समर्थ असतो. असो; याप्रमाणें दुःखदायक व्यवहारस्थितीची दुःखमूलक आणि दुःखपर्यवसायी स्थिति प्रमाणतः पाहून ब्रह्मजिज्ञासु ब्राह्मण तिचा त्याग करितो. तो वैराग्यसंपन्न होतो. या संसारामध्यें कोणताही पदार्थ अकृत नाहीं, नित्यसिद्ध नाहीं, सर्व पदार्थ आणि सर्व व्यावहारिक स्थितिही कर्मानें उत्पन्न होऊन कर्मानें पुष्ट झाली आहेत आणि

म्हणून तीं अनित्य आहेत, नित्य असें येथें व्यवहारांत कांहीं नाहीं, सर्व प्रकारचें कर्म हें अनित्य वस्तूंच्या उत्पत्तीचें साधन आहे; असें ज्ञान झाल्यामुळें सर्व अनित्य वस्तूं-विषयीं त्याला वैराग्य प्राप्त होतें.

**शिष्य**—भगवन् ! कर्म हें चार प्रकारचें आहे नव्हे ? कोणतीही कृतवस्तु उत्पन्न होते; प्राप्त होते, तिच्यावर आपण संस्कार करितों, किंवा विकार तरी उत्पन्न करितो. बसण्याचा पाट सुतार नवीन तयार करितो, बाजारांत जाऊन भाजी आणावी लागते, घरीं आणून तिच्यांतील दोष पाण्यानें किंवा निवडण्यानें काढून टाकावे लागतात आणि मीठ, मिरची, मसाला वगैरे घालून तयार केलेली भाजी आपण पानावर वाढतों. याप्रमाणें उत्पन्न करणें, प्राप्त करून घेणें, संस्कार करणें, विकार काढून टाकणें, असे कर्माचें चार प्रकार आहेत. कोणतेंही व्यावहारिक किंवा धार्मिक कर्म असो, स्वयंपाकाचें असो, किंवा यज्ञात्मक असो, या चार प्रकारांपैकीं कोणत्यातरी प्रकारचें तें कर्म असावयाचें. याशिवाय कर्माचें दुसरें स्वरूप नाहीं. असें ज्ञान होऊन हा ज्ञानी ब्राह्मण नित्य स्वरूपास अनुपयोगी असणाऱ्या व अनित्य फल देणाऱ्या कर्मांपासून निवृत्त होतो. होयना ?

**सिद्धान्ती**—बरोबर. त्याचवेळीं या ज्ञानी पुरुषाला 'मी नित्य आहें, म्हणून मला नित्य, अमृत, अभय, अविकारी, निश्चल, स्थिर, मात्र वस्तु समजून घ्यावयाची आहे, 'मला नित्य आणि अविकारी वस्तु हवी आहे, अनित्य व विकारी वस्तु नको,' असा विवेक होतो. म्हणून 'आयासात्मक' किंवा अनर्थपूर्ण कर्मसाधनें मला काय करावयाचीं आहेत, हीं साधनें मला नित्य वस्तु देणार नाहींत, असें समजल्यावर त्याला कर्मांचा वीट येतो. नंतर अभय, मंगल, स्वयंभु जें स्वतंत्र नित्य ब्रह्मपद आहे, त्याचें स्वरूपज्ञान स्पष्ट व विस्तरतः करून घेण्यासाठीं हा विरक्त ब्राह्मण शम-दम-दयादि सात्त्विक गुण असणाऱ्या आचार्यांकडे जाण्यास सिद्ध होतो. सद्गुरूला शरण जाणें हें मुमुक्षूचें अवश्य कर्तव्य आहे. केवढाही शास्त्रज्ञ असो, त्यानें स्वतः केव्हांही ब्रह्मज्ञानाचें अन्वेषण ( शोध ) करूं नये. कारण वाट चुकण्याचा अतिशय संभव असतो. यासाठीं सद्गुरूला शरण गेलेंच पाहिजे. असें 'एव' पद घालून श्रुति आग्रहानें सांगत आहे. गुरु, श्रोत्रिय असावा. म्हणजे अधीत जो वेद त्याचा अर्थ ज्याला पूर्ण समजलेला आहे, असा गुरु असावा. तसेंच तो ब्रह्मनिष्ठही असावा. सर्व कर्मांचा त्याग करून केवल आणि अद्वय असें जें ब्रह्म त्याच्या ठिकाणीं ज्याची पूर्ण निष्ठा आहे, ब्रह्मव्यतिरिक्त कांहीं नाहीं, असा ज्याचा निश्चय आहे, तो ब्रह्मनिष्ठ होय.—

**शिष्य**—जपनिष्ठ, तपोनिष्ठ, कर्मनिष्ठ याचा जसा अर्थ तसाच 'ब्रह्मनिष्ठ' या पदाचा अर्थ आहे.—

**सिद्धान्ती**—पण हें ध्यानांत ठेव कीं, हेतुपूर्वक कर्म करणाऱ्या लोकांस केव्हांही ब्रह्मनिष्ठा साधत नाहीं व साधावयाचीही नाहीं. क[illegible]ाणि आत्मज्ञान, उत्पन्न

होणारी वस्तु व तिचें साधन अनित्य कर्म, आणि नित्य असणारा आत्मा व त्याचें नित्य स्वरूपज्ञान यांमध्यें अत्यंत विरोध आहे. असो, तेव्हां ब्रह्मैकनिष्ठ, शमादिसंपन्न व श्रोत्रिय गुरूला वरील मुमुक्षुब्राह्मणानें विधिपूर्वक शरण जावें. जातांना हातांत समिधा असाव्या.

**शिष्य**—म्हणजे विनयपूर्वक शरण जावें असा अर्थ ?

**सिद्धान्ती**—होय. शमादिकांचें साधन झालें आहे असें समिधाग्रहणानें समजतें. शरण जाऊन गुरूला प्रसन्न करावें आणि श्रद्धापूर्ण विनयपूर्वक अक्षर जो परमात्मा त्याविषयीं प्रश्न करावा. ॥ १२ ॥

**रंगरामानुज**—' ब्राह्मण '= वेदवेदांगज्ञाता. ' कृतेन '=कर्मद्वारा. गुरु श्रुतिसंपन्न असून ब्रह्मसाक्षात्कारी असणें अवश्य आहे. शिष्य श्रवणाला अधिकारी असला पाहिजे. नुसत्या उपासनेला उपयोगी पडणाऱ्या इंद्रियजयाचा येथें उपयोग नाहीं. ( मंत्र १३ ) ' अक्षरं '=स्वरूपतः अविकारी, ' सत्यं '=गुणतः अविकारी. ' अक्षर ' हें विशेषण जडाची व ' सत्य ' हें विशेषण जीवांची व्यावृत्ति करून तीं ब्रह्मवस्तूचा निर्देश सिद्ध करितात. हा मंत्र लक्ष्यांत घेऊन ब्रह्मसूत्राच्या पहिल्या सूत्राचा विचार करावा. सारांश, वेदविहितकर्मांच्या आवृत्तीनेंही नित्यफलप्राप्ति होत नाहीं, हें श्रौतस्मार्तकर्मांच्या अनुभवानें पाहून मग वेदवेत्त्या मुमुक्षूनें ब्रह्मविचाराला आरंभ करावा.

**माध्व०**—' लोकान्=विष्णुलोकेतरलोक. परीक्ष्य '=इतर लोकांचें असारत्व व अनित्यत्व मनांत आणून. ' अकृत '=नित्यपुरुषार्थ. मोक्ष हा कर्मानें मिळत नाहीं, ज्ञानानें मिळतो. ' ब्रह्मनिष्ठ '=विष्णुभक्त्यादिगुणसंपन्न.

---

## मंत्र तेरावा.

**तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक्प्रशान्तचित्ताय शमान्विताय । येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्त्वतो ब्रह्मविद्याम् ॥ १३ ॥**

**इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषदि प्रथममुण्डके द्वितीयः खण्डः ॥ २ ॥**

**॥ इत्यथर्ववेदीय मुण्डकोपनिषदि प्रथममुण्डकं समाप्तम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—सम्यक्प्रशान्तचित्ताय, शमान्वित्ताय, उपसन्नाय तस्मै** ( उत्तम प्रकारानें उपशम केला आहे आपल्या चित्ताचा ज्यानें, शमाच्या योगें त्याला दास केलें आहे ज्यानें, अशा अंतर्बाह्य इंद्रियांचें नियमन करून शरण आलेल्या त्या शिष्याला ) **येन अक्षरं पुरुषं सत्यं वेद तां ब्रह्मविद्यां तत्त्वतः सः विद्वान् प्रोवाच** ( जिच्या

योगानें सत्यस्वरूपी व अविनाशी अशा पुरुषाचें ज्ञान निश्चयानें होतें, ती ब्रह्मविद्या तत्त्वपूर्वक विस्तृतः सांगावी. ) ॥ १३ ॥

तस्मै स विद्वान्गुरुर्ब्रह्मविदुपसन्नायोपगताय । सम्यग्यथाशास्त्रमित्येतत् । प्रशान्तचित्तायोपरतदर्पादिदोषाय । शमान्विताय बाह्येन्द्रियोपरमेण च युक्ताय सर्वतो विरक्तायेत्येतत् । येन विज्ञानेन यया विद्यया परयाऽक्षरमद्रेश्यादिविशेषणं तदेवाक्षरं पुरुषशब्दवाच्यं पूर्णत्वात्पुरि शयनाच्च सत्यं तदेव परमार्थस्वाभाव्यादक्षरं चाक्षरणादक्षतत्वादक्षय्यत्वाच्च ब्रह्म वेद विजानाति तां ब्रह्मविद्यां तत्त्वतो यथावत्प्रोवाच प्रब्रूयादित्यर्थः । आचार्यस्याप्ययं नियमो यन्न्यायप्राप्तसच्छिष्यनिस्तारणमविद्यामहोदधेः ॥ १३ ॥

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषद्भाष्ये प्रथममुण्डके द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

इति मुण्डकोपनिषद्भाष्ये प्रथममुण्डकं समाप्तम् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—शरण आलेल्या शिष्याला गुरूजींनें ब्रह्मविद्येचा उपदेश करावा. ज्यानें अंतःकरणाचें यथाशास्त्र प्रशमन करून अभिमानादि दोषांचा नाश केला आहे व बाह्येन्द्रियांचा उपरम करून जो सर्वथा वैराग्यसंपन्न झाला आहे, तो उपदेशाला खरा अधिकारी आहे. असा अधिकारी शिष्य शरण आल्यानंतर त्याला गुरूनें ब्रह्मविद्येचा उपदेश करावा.

**शिष्य**—भगवन् ! ज्या श्रेष्ठविद्येच्या द्वारानें सहाव्या मंत्रांत सांगितलेल्या निर्गुणसंपन्न, अविनाशी, पुरुषनामक सत्यस्वरूपी परमात्म्याचें ज्ञान होतें, ती विद्या ब्रह्मविद्या होय. सर्व विश्वाला पूर्णत्व देणारें, परमसत्य, अविनाशी, अविकारी आणि अनंत असें अक्षराचें, परमात्म्याचें, स्वरूप आहे. तें ज्या विद्येनें समजतें, ती खरी परविद्या होय. ' पुरुष '=पूर्ण स्वरूपी किंवा शरीरांत अंतर्यामी स्वरूपानें राहणारा. ब्रह्म हें परमार्थतः सत्य आहे. या ब्रह्मज्ञानाचें स्वरूपज्ञान शिष्यास करून द्यावें. होय ना ?

**सिद्धान्ती**—ठीक आहे. या विद्येचा यथार्थ उपदेश आचार्यानें शरण आलेल्या शिष्यास करावा. नेहमीं शास्त्राचा असा नियम आहे कीं, आचार्याकडे कोणीही अधिकारी शिष्य विधिपूर्वक शरण आला, तर त्याच्या अज्ञानसागराचें निस्तरण होईल, तो अज्ञानसागर तरून जाईल, अशी विद्या आचार्यानें शिकवावी. योग्य शिष्याला ' नाहीं ' असें उत्तर केव्हांही देतां उपयोगी नाहीं. ॥ १३ ॥

**माध्व०**—' येन '=ज्या विद्येनें, ' अक्षर '=नाशरहित. ' पुरुष '=पूर्ण षड्गुण. ' सत्य '=भगवान् विष्णु. ' तत्त्वतः '=वेदविद्येनें. बारा व तेरा या दोन मंत्रांनीं विवेकजन्यवैराग्य, शम-दमादि संपत्ति आणि मुमुक्षा हीं श्रवणरूप-विचाराचीं अंगें आहेत, असें सुचविलें.

## द्वितीय खंड समाप्त.

### प्रथम मुण्डक समाप्त.

---

# द्वितीय-मुंडक ।

## खंड पहिला.

### मंत्र पहिला.

**तदेतत्सत्यं यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिङ्गाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः । तथाऽक्षराद्विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते तत्र चैवापि यन्ति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—तत् एतत् सत्य** ( तेंच हें विद्याविषयक सत्य आहे. ही विद्या वस्तूचा व सृष्टीच्या क्रमाचा यथार्थ उपदेश करणारी आहे. ) **सुदीप्तात्, पावकात् यथा सहस्रशः सरूपाः विस्फुलिंगाः प्रभवन्ते** (उत्तम रीतीनें प्रज्वलित झालेल्या वह्नीपासून ज्याप्रमाणें हजारो सरूप–प्रज्वलित–विस्फुलिंग–ठिणग्या–उत्पन्न होतात.) **तथा सोम्य, विविधाः भावाः अक्षरात् प्रजायन्ते, तत्र एव अपि च यन्ति** (त्या प्रमाणें अनेक प्रकारचे भाव, परिच्छिन्नजीव, हे सौम्या ! अविनाशीब्रह्मापासून उत्पन्न होतात आणि शेवटीं तेथें मात्र लयाला जातात. ) ॥ १ ॥

अपरविद्यायाः सर्वं कार्यमुक्तम् । स च संसारो यत्सारो यस्मान्मूलादक्षरात्संभवति यस्मिंश्च प्रलीयते तदक्षरं पुरुषाख्यं सत्यम् । यस्मिन्विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवति तत्परस्या ब्रह्मविद्याया विषयः स वक्तव्य इत्युत्तरो ग्रन्थ आरभ्यते । यदपरविद्याविषयं कर्मफललक्षणं सत्यं तदापेक्षिकम् । इदं तु परविद्याविषयं परमार्थसल्लक्षणत्वात् । तदेतत्सत्यं यथाभूतं विद्याविषयम् । अविद्याविषयत्वाच्चानृतमितरत् । अत्यन्तपरोक्षत्वात्कथं नाम प्रत्यक्षवत्सत्यमक्षरं प्रतिपद्येरन्निति दृष्टान्तमाह–यथा सुदीप्तात्सुष्ठु दीप्तादिद्धात्पावकादग्नेर्विस्फुलिङ्गा अग्न्यवयवाः सहस्रशोऽनेकशः प्रभवन्ते निर्गच्छन्ति सरूपा अग्निसलक्षणा एव तथोक्तलक्षणादक्षराद्विविधा नानादेहोपाधिभेदमनुविधीयमानत्वाद्विविधा हे सोम्य भावा जीवा आकाशादिवद्घटादिपरिच्छिन्नाः सुषिरभेदा घटाद्युपाधिप्रभेदमनुभवन्ति । एवं

नानानामरूपकृतदेहोपाधिप्रभवमनुप्रजायन्ते तत्र चैव तस्मिन्नेवाक्षरेऽपि यन्ति देहोपाधिविलयमनुर्लीयन्ते घटादिविलयमन्विव सुषिरभेदाः । यथाऽऽकाशस्य सुषिरभेदोत्पत्तिप्रलयनिमित्तत्वं घटाद्युपाधिकृतमेव तद्वदक्षरस्यापि नामरूपकृतदेहोपाधिनिमित्तमेव जीवोत्पत्तिप्रलयनिमित्तत्वम् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**–मागील मंत्रांत अपरविद्येचें सर्व कार्य सांगितलें. आतां, ज्यामुळें संसाराला सारत्व प्राप्त होतें, ज्या अविनाशी मूळ परब्रह्मपासून संसार उत्पन्न होतो आणि जेथें लयाला जातो तो अविनाशी पुरुषनामक आत्मा सत्य आहे हें सांगावयाचें आहे. दोन विद्या जाणून घ्यावयाच्या आहेत, असें पहिल्या मुण्डकाच्या पहिल्या खंडांतील चौथ्या मंत्रांत सांगितलें, त्यापैकीं अपरविद्येचें विस्तृत वर्णन केलें. आतां यापुढें अक्षर नामक जें परमतत्त्व त्याचा या दुसऱ्या मुण्डकांत विचार करावयाचा आहे. ही परविद्या अशी आहे कीं, इचा विषय ब्रह्म हा आहे. ज्या ब्रह्माचें ज्ञान झालें असतां सर्व ज्ञेय विषयाचें ज्ञान होतें असें हें सत्यस्वरूपी ब्रह्म पराविद्येचा विषय आहे. त्याचें प्रवचन यापुढें करावयाचें आहे.

**शिष्य**—भगवन्! आतांपर्यंत आपण अपराविद्येचें वर्णन केलें. ही विद्या कर्मप्रकार सांगून कर्माचें फळही सांगणारी आहे. कर्म आणि त्याचें फळ हीं श्रुतीनेंच सांगितलीं, म्हणून तीं सत्यस्वरूपच असलीं पाहिजेत.

**सिद्धान्ती**—हें सत्य आपेक्षिक आहे, परतंत्र आहे; परमार्थ सत्य हे नव्हे; पण परविद्येचा विषय जो परमात्मा तो परमार्थतः सत्यस्वरूपी आहे. त्याचें लक्षण सत्य-स्वरूप आहे. जशी वस्तु असेल तसें तिचें वर्णन करणें हें परविद्येचें कार्य आहे. अपरविद्येचें कार्य तसें नसतें. कारण तिचा विषय अज्ञानात्मक असतो, म्हणून तो परमार्थतः असत्य असतो.

**पूर्वपक्षी**—तुमचा भावार्थ असा कीं, संसारांतील सर्व सत्यें आपेक्षिक, परावलंबी आणि सोपाधिक असतात; पण परविद्येचे सिद्धांत निरपेक्ष सत्य असतात. त्यांचें सत्य स्वयंभु असतें. होयना? पण आम्हांस असें सांगा कीं, परविद्येचें स्वयंभु सत्य शास्त्रैकगम्य असल्यामुळें केव्हांही प्रत्यक्ष व्हावयाचें नाहीं. यज्ञ केला असतां कांहीं एक अपूर्व उत्पन्न होतें, असें शास्त्राचें सांगणें आहे. हें अपूर्व नेहमीं अप्रत्यक्ष असावयाचें. त्याचप्रमाणें शास्त्रानें मात्र समजला जाणारा परमात्मा अप्रत्यक्ष असावयाचा आणि तुम्ही तर येथें प्रत्यक्षास उपयोगी पडणारी "हें, तें" सर्वनामें उपयोजित आहांत. पण अगोचर असणारें सत्य प्रत्यक्ष होणें शक्य नाहीं व त्याचा साक्षात्कार शिष्यांस होणें शक्यहीं नाहीं. सारांश अप्रत्यक्ष ब्रह्म समजावयाचें नाहीं व सांगतां यावयाचें नाहीं.

**सिद्धान्ती—**तुमची ही शंका नाहींशी व्हावी म्हणून श्रुतीनें पूर्वीच एक दृष्टांत दिला आहे. ऐका–अत्यंत प्रज्वलित झालेल्या अग्नीपासून हजारों विस्फुलिंग ( अग्नीचे अवयव, ठिणग्या ) अग्निस्वरूप घेऊन सर्वत्र दृष्टीस पडतात; त्याप्रमाणें पूर्वी सांगितलेल्या लक्षणांनें युक्त असणाऱ्या अक्षरब्रह्मापासून हजारों प्रकारचे जीव उत्पन्न होतात. हे जीव अनंत प्रकारच्या देहादि उपाधींनीं युक्त असल्यामुळें प्रत्येक जीवाचें शरीर भिन्न भिन्न असतें व म्हणून ते अनंत होतात. परंतु त्यांचें मूलस्वरूप मात्र एक अविनाशी असतें. हे सौम्या ! आकाशवंत घट, मठ, इत्यादिकांनीं मर्यादित झालेले आकाशाचे भेद घट-मठादि उपाधि अनुसार स्वरूप धारण करितातसे दिसतात. त्याप्रमाणें—

**शिष्य—**भगवन् ! हें आकाशाचें उदाहरण मला नीट समजलें नाहीं ?

**सिद्धान्ती—**आकाश नामक द्रव्य घट–मठादि सर्व पदार्थांस अंतर्बाह्य व्यापून असतें, हें तुला ठाऊक आहे. आतां घटांत असणारें आकाश मठांत असणाऱ्या आकाशाहून निराळ्या आकाराचें असतें, हेंही तूं पाहिलें आहेस. मूळचें अवयवशून्य आकाश घट–मठादि उपाधींनीं निरानिराळे सुषिरभेद म्हणजे परिच्छिन्न आकार धारण करितें आणि आपण त्या आकारांस घटाकाश, मठाकाश इत्यादि नांवें उपाधींच्या अनुसारानें देतों. तात्पर्य अमर्याद आकाश उपाधींनीं परिच्छिन्न होतें व निरानिराळे आकार धारण करितें. याप्रमाणें अनंत नामरूपांनीं उत्पन्न केलेल्या देहोपाधींसह अनंत जीव परब्रह्मापासून उत्पन्न होतात व देहोपाधींचा नाश झाला म्हणजे त्याच परब्रह्मामध्यें लय पावतात असें दिसतें. घट–मठादि उपाधि फोडून तोडून| नाहींशा झाल्या म्हणजे मर्यादित भिन्न भिन्न आकाशभेद नाहींसें होऊन सर्व आकाशें एकरूपी आकाशांत लीन होतात. तसेंच, नामरूपशून्य परब्रह्माला नामरूपादि उपाधींनीं अनंत आकार प्राप्त होतात, उपाधि आहेत तोंपर्यंत ते आकार कायम असतात आणि उपाधींचा नाश झाला म्हणजे सर्व भेद–प्रभेद विनष्ट होऊन एकस्वरूपी ब्रह्म कायम राहतें. समजलें ? घट–मठादि उपाधींच्या उत्पत्ति–विनाशांवर आकाशाचे भेद उत्पन्न होणें व नष्ट होणें अवलंबून असतें, त्याप्रमाणें नामरूपांनीं उत्पन्न केलेल्या देहोपाधींच्या उत्पत्तीनें अक्षरपरब्रह्मापासून जीव उत्पन्न होतात आणि उपाधी नष्ट झाल्या म्हणजे हे भिन्न जीव परब्रह्मांत लीन होऊन एकरूप होतात. सारांश, अक्षरपरब्रह्म, एक आणि एकरूप आहे. त्यावर अनेकत्वाचा आभास होतो, तो उपाधींनीं उत्पन्न होतो आणि उपाधी नष्ट झाल्या म्हणजे हे आरोप विनाश पावतात. सारांश, उपाधिसत्य सापेक्ष आहे आणि परब्रह्मसत्य निरपेक्ष आहे. ॥ १ ॥

**रंगरामानुज—**' अक्षर ' = सूक्ष्म असें चिदचिदात्मक शरीर आहे ज्याचें तें ब्रह्म. यापासून स्थूल चित् व स्थूल अचित् उत्पन्न होतात.

**माध्व०—**' सरूप '=समानरूपी. पूर्वकल्पीं जसे पदार्थ होते, तसेच पदार्थ उत्तरकल्पांतही होतात. ही येथें सृष्टीची उत्पत्ति पुनः सांगितली ती अंगिरसानें शौनकाला सांगितली असें नव्हे, तर विधिपूर्वक शरण आलेल्या कोणाही शिष्यास श्रीगुरु ब्रह्म हें जगताचें कारण आहे, असें सांगत असतात, असें समजावें.

## मंत्र दुसरा.

**दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः सबाह्याभ्यन्तरो ह्यजः ।**
**अप्राणो ह्यमना: शुभ्रो ह्यक्षरात्परतः परः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—दिव्यः, अमूर्तः, पुरुषः, सबाह्याभ्यंतरः, हि अजः, अप्राणः, हि अमनाः, शुभ्रः, हि अक्षरात् परतः परः** ( हा पुरुष-परमात्मास्वयंप्रकाश, निराकार, अंतर्बाह्यव्यापी, अजन्मा, प्राणशून्य, मनःशून्य, आणि शुभ्र म्हणजे उपाधिशून्य असून अक्षराच्या फार पलीकडे असणारा आहे. ) ॥ २ ॥

नामरूपबीजभूताद्व्याकृताख्यात्स्वविकारापेक्षया परादक्षरात्परं यत्सर्वोपाधिभेदवर्जितमक्षरस्यैव स्वरूपमाकाशस्येव सर्वमूर्तिवर्जितं नेति नेतीत्यादिविशेषणं विवक्षन्नाह । दिव्यो द्योतनवान्स्वयंज्योतिष्ट्वात् । दिवि वा स्वात्मनि भवोऽलौकिको वा । हि यस्मादमूर्तः सर्वमूर्तिवर्जितः पुरुषः पूर्णः पुरि शयो वा । दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः सबाह्याभ्यन्तरः सह बाह्याभ्यन्तरेण वर्तत इति । अजो न जायते कुतश्चित्स्वतोऽन्यस्य जन्मनिमित्तस्य चाभावात् । यथा जलबुद्बुदादेर्वाय्वादि । यथा नभःसुषिरभेदानां घटादिसर्वभावविकाराणां जनिमूलत्वात्तत्प्रतिषेधेन सर्वे प्रतिषिद्धा भवन्ति । सबाह्याभ्यन्तरो ह्यजोऽतोऽजरोऽमृतोऽक्षरो ध्रुवोऽभय इत्यर्थः । यद्यपि देहाद्युपाधिभेददृष्टीनामविद्यावशाद्देहभेदेषु सप्राणः समनाः सेन्द्रियः सविषय इव प्रत्यवभासते तलमलादिमदिवाऽऽकाशं तथाऽपि तु स्वतः परमार्थदृष्टीनामप्राणोऽविद्यमानः क्रियाशक्तिभेदवांश्चलनात्मको वायुर्यस्मिन्नसावप्राणः । तथाऽमना अनेकज्ञानशक्तिभेदवत्संकल्पाद्यात्मकं मनोऽप्यविद्यमानं यस्मिन्सोऽयममना अप्राणो ह्यमनाश्चेति । प्राणादिवायुभेदाः कर्मेन्द्रियाणि तद्विषयाश्च तथा च बुद्धिमनसी बुद्धीन्द्रियाणि तद्विषयाश्च प्रतिषिद्धा वेदितव्याः । तथा श्रुत्यन्तरे—ध्यायतीव लेलायतीवेति । यस्माच्चैवं प्रतिषिद्धोपाधिद्वयस्तस्माच्छुभ्रः शुद्धः । अतोऽक्षरान्नामरूपबीजोपाधिलक्षितस्वरूपात्सर्वकार्यकारणबीजत्वेनोपलक्ष्यमाणत्वात्परं तदुपाधिलक्षणमव्याकृताख्यमक्षरं सर्वविकारेभ्यस्तस्मात्परतोऽक्षरात्परो निरुपाधिकः पुरुष इत्यर्थः ।

यस्मिंस्तदाकाशाख्यमक्षरं सव्यवहारविषयमोतं प्रोतं च। कथं पुनर-प्राणादिमत्त्वं तस्येत्युच्यते। यदि हि प्राणादयः प्रागुत्पत्तेः पुरुष इव स्वेनाऽऽत्मना सन्ति तदा पुरुषस्य प्राणादिना विद्यमानेन प्राणादिमत्त्वं भवेन्न तु ते प्राणादयः प्रागुत्पत्तेः पुरुष इव स्वेनाऽऽत्मना सन्ति तदा । अतोऽप्राणादिमान्परः पुरुषः । यथाऽनुत्पन्ने पुत्रेऽपुत्रो देवदत्तः ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—जीवाची उत्पत्ति आणि त्याचा लय हीं सर्व उपाधिनिमित्त आहेत आणि हीं कारणोपाधि अक्षर जो अविनाशी त्याला आहे असें केवळ एकत्व समजण्यासाठीं पूर्वमंत्रांत सांगितलें. वास्तविक पाहतां परब्रह्माच्या ठिकाणीं उत्पत्तिप्रलयांचें अस्तित्वच नाहीं, असें सांगण्यासाठीं या मंत्राची योजना आहे. मागच्या मंत्रांत नामरूपादिकांचें मूलकारण असणारें जें अव्याकृत (अक्षर, अव्यक्त, प्रधान) तें नामरूपांच्या तारतम्यानें नामरूपाच्या पलीकडे आहे. हें अव्याकृतही अविकारी नाहीं. कारण, यापासूनच नामरूपें उत्पन्न होतात व लय पावतात. त्या व्याकृत होणाऱ्या अव्याकृताच्याही अत्यंत पलीकडे असल्यामुळें सर्व भिन्न उपाधी व तज्जन्य अनंत भेद हीं ज्याच्या ठिकाणीं केव्हांही असत नाहींत, त्या अविनाशी परब्रह्माचें स्वरूप आकाशाप्रमाणें अमूर्त, निराकार, आहे.

**शिष्य**—मग याचें वर्णन तरी कसें करणार ?

**सिद्धान्ती**—"तें असें नाहीं" 'तें तसें नाहीं,' 'तें हें नाहीं' तें तें नाही,' या रीतीनें परब्रह्माचें वर्णन करावयाचें, असा भाव लक्षांत आणून श्रुति म्हणतेः—हा परमात्मा दिव्य म्हणजे स्वयंप्रभ अथवा स्वयंप्रकाश आहे.

**शिष्य**—स्वर्गांत अथवा स्वरूपाचे ठिकाणीं उत्पन्न झालेला जो प्रकाश तो दिव्य होय.

**सिद्धान्ती**—तो ब्रह्मप्रकाश आहे. पण अलौकिक प्रकाशाला मात्र दिव्य प्रकाश म्हणतात. सारांश परमात्मा हा स्वरूपतः प्रकाशमय आहे. तसेंच तो सर्वाकारशून्य आहे. तो पूर्ण असून सर्व शरीरांच्या ठिकाणीं वास्तव्य करितो. हा स्वयंप्रकाश व आकारशून्य पुरुष सर्वांचें अंतर्बाह्य स्वरूप व्यापून असतो. हा अजन्मा आहे. म्हणजे हा स्वतःपासून किंवा दुसऱ्या कोणापासून उत्पन्न आलेला नाहीं.

**शिष्य**—खरेंच आहे. सर्वांस जन्म देणाऱ्या व सर्वांचें जन्मनिमित्त असणाऱ्या परमात्म्याला जन्म देणें कोणालाही संभवनीय नाहीं, कारण दुसरी वस्तुच नाहीं.

**सिद्धान्ती**—याला जन्म असणें हेंही संभवनीय नाहीं. पाण्यावरील बुडबुड्यांचा जन्म वायूपासून होतो. वायु बुडबुड्यांपूर्वी असतो. येथें अशी कोणतीही वस्तु नाहीं कीं, जी परब्रह्माच्या पूर्वी असेल व त्याला जन्म देऊं शकेल. आकाशाला घटाकाश,

मठाकाश इत्यादि भेद घट–मठादि उपाधींच्या योगानें उत्पन्न होतात. तशा उपाधिपर-ब्रह्माचे ठिकाणीं असणें शक्य नाहीं. त्याला जन्मच नाहीं म्हणून उत्पन्न होणें, असणें, वाढणें, विकार प्राप्त होणें, क्षय पावणें, नष्ट होणें, इत्यादि कोणताही विकार पर-ब्रह्माला होऊं शकत नाहीं. जन्माचा निषेध केला कीं, बाकीच्या सर्व जन्म–विकारांचा निषेध केला असेंच होतें. सारांश, तें विकारशून्य आहे. याप्रमाणें "अंतर्बाह्यव्यापी असणारा म्हणून अजन्मा आणि अजन्मा म्हणून जरामरणशून्य असणारा परमात्मा अमृत (अनंत), अव्यय (अक्षर), नित्य–कूटस्थ आणि भयशून्य आहे." असा तात्पर्यार्थ झाला.

**पूर्वपक्षी**—तथापि हा परमात्मा जीवांचा आत्मा असतो आणि जीव प्राणवंत असतात. म्हणून परमात्म्यालाही प्राणापानादिकांच्या उपाधी असणें योग्य आहे.

**सिद्धान्ती**—नाहीं. यद्यपि देहादि उपाधींमुळें तुम्हाआम्हासारख्या भेददृष्टींना परमात्मा हा देहवासी आहे म्हणून प्राणयुक्त, मनोयुक्त, इंद्रिययुक्त आणि विषयी आहे असा अज्ञानानें भास होतो, तथापि ज्यांना परमार्थदृष्टि प्राप्त झाली आहे, ज्यांना आत्मसाक्षात्कार झाला आहे, त्यांना हा परमात्मा प्राणादिशून्य आहे, असेंच ज्ञान होत असतें. अज्ञानानें आपण आकाशाला तल (बूड) आहे असें म्हणतों, व तें मलीन आहे असेंही म्हणतों. तथापि वास्तविक आकाशाला तल–मलादि कांहीं-एक नसतें. असो; तात्पर्य हें आहे कीं, परमात्म्याला प्राण नाहीं. तो प्राणशून्य आहे.—

**शिष्य**—भिन्नक्रियाशक्ति असणारा (पंचप्राणांच्या क्रिया भिन्न भिन्न आहेत.) व चलनात्मक असणारा (गति असणारा, चळवळ करणारा) जो वायु, त्याला प्राण असें आपण म्हणतों. या प्राणाचें वास्तव्य परब्रह्मामध्यें नाहीं. कारण आत्मा अक्रिय आहे आणि स्थिर आहे. याचप्रमाणें तेथें मनही राहत नाहीं.–

**सिद्धान्ती**—स्मरण, कल्पना, निश्चय, इच्छा इत्यादि अनेक प्रकारच्या संकल्प-विकल्पादि भिन्न ज्ञानशक्ति असणारें अंतःकरणही त्याच्या ठिकाणीं वास्तव्य करीत नाहीं. तात्पर्य तो प्राणशून्य आणि मनःशून्य आहे.

**शिष्य**—सारांश पंचप्राण, कर्मेंद्रियें, या इंद्रियांचे विषय, तसेंच बुद्धि व मन, ज्ञानेंद्रियें व त्यांचे विषय, हीं सर्व परब्रह्माचे ठिकाणीं विद्यमान असत नाहींत, असें झालें.

**सिद्धान्ती**—इतर श्रुतीही असेंच म्हणतात. 'तो ध्यान करितोसा दिसतो, क्रीडा करितोसा दिसतो.' यावरूनच वस्तुतः तो ध्यान–लीलादि कांहीं एक करीत नसूनही त्याच्यावर ध्यान–लीलांचा आरोप आलेला आहे, असें या श्रुतीस सांगावयाचें आहे. परब्रह्माचे ठिकाणीं ध्यानादि अंतःक्रिया नाहीं व चलनवलनादि बाह्य क्रियाही नाहीं. यामुळें दोन्ही प्रकारच्या उपाधी नाहींत असें ठरतें आणि म्हणून तो शुद्ध निर्विकार आहे असें होतें. अर्थातच नामरूपें उत्पन्न करणारें

व सर्व कार्यकारणांचें बीज असणारें जें नामादि उपाधिलक्षित अव्यक्त किंवा अव्याकृत, त्याच्याही पलीकडचा हा परमात्मा आहे. तें नामरूपात्मक व कार्यकारणात्मक व्याकृतविश्वाच्या पलीकडचें आहे. विश्वाचें कारण असणारें अव्याकृतनामक जें अविनाशी अव्यक्त त्याच्याही पलीकडचा परमात्मा आहे. सारांश, तो विकारकारण असणाऱ्या अक्षरअव्यक्ताहून अत्यंत विलक्षण आहे. तो निरुपाधिक आहे आणि सर्वांचा नियामक असून त्यांस पूर्णत्व देणारा आहे. त्याला 'पुरुष' असें म्हणतात. त्याच्या ठिकाणीं आकाश नामक अव्याकृत द्रव्य आपल्या सर्व कार्यकारणात्मक पदार्थांसह व व्यापारांसह ओतप्रोत भरलेलें असतें. सारांश, सर्व (क्षराक्षरांस) अंतर्बाह्य व्यापून त्यांचें नियमन करणारा पण त्यांच्याहून विलक्षण असणारा हा आत्मा आहे.

**पूर्वपक्षी**—असें परमात्मतत्त्व असूनही तुम्ही त्याला प्राणशून्य, मनःशून्य इत्यादि विशेषणें देतां, हें कसें ?

**सिद्धान्ती**—अहो, जर प्राणादि सर्व हे उत्पत्तीच्या पूर्वींच पुरुषाप्रमाणें (परमात्म्याप्रमाणें) स्वस्वरूपानें राहत असतील, तर मात्र परमात्म्याला प्राणादिकांच्या अस्तित्वानें प्राणादिकत्व प्राप्त होईल; पण उत्पत्तीच्या पूर्वीं प्राणादि नसतात, पुरुष मात्र स्वरूपानें असतो. तो एकाकी सिद्ध असतो, प्राणादि उत्पन्न होणारे असतात. म्हणून त्यांच्या उत्पत्तीच्या पूर्वींही विद्यमान असणारा परमात्मा मनःशून्य व प्राणशून्य असतो, यांत काय आश्चर्य आहे ! पुत्र उत्पन्न होण्यापूर्वीं देवदत्त जसा अपुत्रवंत असतो, त्याप्रमाणें प्राणादिकांच्या उत्पात्ति पूर्वीं परमात्माही प्राणादि-उपाधिशून्यच असतो. ॥ २ ॥

**रंगरामानुज**—'अक्षर'=अव्याकृत. या अव्याकृतापेक्षां समष्टि पुरुष श्रेष्ठ (पर) आहे व यापेक्षां त्याचें कारण जें ब्रह्म तें श्रेष्ठ आहे. ब्रह्म हे पुरुषप्रकृति या द्वयाचें कारण होय. अव्यक्ताहून श्रेष्ठ असणारा जो हिरण्यगर्भ त्याहून परब्रह्म श्रेष्ठ आहे.

**माध्व०**—'पुरुष'=भगवान्. हा ज्ञानानंदात्मक शरीरी आहे, म्हणून तो अमूर्त किंवा जड-देहशून्य आहे. त्याला जड ज्ञान-कर्मेंद्रियें नाहींत, जड मन नाहीं; तथापि तो ज्ञानानंदात्मक शरीरी आहे. असा ज्ञानानंदात्मक शरीरी भगवान् जड सृष्टीचा कर्ता होतो. सृष्टि करतांना त्याला श्रम होत नाहींत किंवा चिंता असत नाहीं. कारण, त्याचा देह जड नसतो. तो 'सबाह्यान्तर' म्हणजे अपरिच्छिन्न आहे आणि त्याला बाह्य सृष्टि व अन्तःसृष्टि उत्पन्न करतां येते. अक्षर=जडप्रकृति. 'परमअक्षर'= लक्ष्मी. अक्षरात्परतःपर=वासुदेव. हा परमानंदरूपी आहे.

---

## मंत्र तिसरा.

**एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेन्द्रियाणि च ।**
**खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ—एतस्मात् प्राणः, मनः, सर्वेन्द्रियाणि च, खं, वायुः, ज्योतिः, आपः, विश्वस्य धारिणी पृथिवी, जायते** ( यापरमात्म्यापासून प्राण, मन, सर्व इंद्रियें, आकाश, वायु, तेज, जल, आणि विश्वाचें धारण करणारी पृथिवी हीं प्रत्येकीं उत्पन्न होतात. ) ॥ ३ ॥

कथं ते न सन्ति प्राणादय इत्युच्यते । यस्मादेतस्मादेव पुरुषान्नामरूपबीजोपाधिलक्षिताज्जायत उत्पद्यतेऽविद्याविषयविकारभूतो नामधेयोऽनृतात्मकः प्राणः "वाचारम्भणं विकारो नामधेयमनृतम्" इति श्रुत्यन्तरात् । न हि तेनाविद्याविषयेणानृतेन प्राणेन सप्राणत्वं परस्य स्यादपुत्रस्य स्वप्नदृष्टेनेव पुत्रेण सपुत्रत्वम् । एवं मनः सर्वाणि चेन्द्रियाणि विषयाश्चैतस्मादेव जायन्ते। तस्मात्सिद्धमस्य निरुपचरितमप्राणादिमत्त्वमित्यर्थः । यथा च प्रागुत्पत्तेः परमार्थतोऽसन्तस्तथा प्रलीनाश्चेति द्रष्टव्याः । यथा करणानि मनश्चेन्द्रियाणि तथा शरीरविषयकारणानि भूतानि खमाकाशं वायुरन्तर्बाह्य आवहादिभेदः । ज्योतिरग्निः । आप उदकम् । पृथिवी धरित्री विश्वस्य सर्वस्य धारिणी । एतानि च शब्दस्पर्शरूपरसगन्धोत्तरोत्तरगुणानि पूर्वपूर्वगुणसहितान्येतस्मादेव जायन्ते । संक्षेपतः परविद्याविषयमक्षरं निर्विशेषं पुरुषं सत्यं दिव्यो ह्यमूर्त इत्यादिना मन्त्रेणोक्त्वा पुनस्तदेव सविशेषं विस्तरेण वक्तव्यमिति प्रववृते संक्षेपविस्तरोक्तो हि पदार्थः सुखाधिगम्यो भवति सूत्रभाष्योक्तिवदिति ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—प्राणादि प्रथमतः नसतात, याचें कारण या मंत्रांत सांगितलें आहे. श्रुति म्हणतेः—ह्या पुरुषोत्तमापासून मात्र ( नामरूपांच्या बीजोपाधीनें लक्षित झालेल्या पुरुषोत्तमापासून ) प्राण उत्पन्न होतो. हा प्राण अज्ञानाचा विषय असून विकारी आहे. हा नाममात्र आहे म्हणून असत्य आहे. ' विकार हा केवळ वाणीचा विलास असून नाममात्र आहे आणि म्हणून असत्य आहे. ' असें अन्य श्रुति म्हणते.

**शिष्य**—हाच सिद्धांत पुनः एकदां सांगावा.

**सिद्धान्ती**—परमात्मा स्वरूपतः निरुपाधिक आहे, असें श्रुति सांगते. आपणासारख्या सोपाधिक जीवांस सर्वत्र भेदपूर्ण आणि विकारपूर्ण सृष्टि दिसते व भासते. या सर्व सृष्टीचें आदिकारण अविद्येनें उत्पन्न केलेलें अव्यक्त आहे. हें अव्यक्त सर्व कार्यकारणात्मक व्यवहारांचें आदिकारण आहे, असें आपल्यास अपराविद्येनें समजतें. या अव्यक्तज्ञानावरून प्रथम पुरुषोत्तमाचें व नंतर निरुपाधिक परमात्म्याचें अस्तित्व लाक्षित होतें. श्रुति वाच्यार्थानें परब्रह्मलक्षण न सांगतां शाखाचंद्रन्यायानें, लक्षणेनें, सांगते. तेव्हां सिद्धांत असा निघतो कीं जेवढे जेवढे म्हणून नामरूपात्मक व्यवहार आहेत ते वस्तुतः सत्यस्वरूप नाहींत. प्राण हा नामरूपात्मक विकार आहे म्हणून तो सत्य नाहीं. असा जन्मलेला, अविद्येचा विषय असणारा व परमार्थतः असत्य असणारा जो प्राण, तो परमार्थसत्य जो नित्य परमात्मा त्याला सप्राण कसें करील ? स्वप्नामध्यें पाहिलेल्या पुत्रामुळें जसें जागृतीमध्यें निपुत्रिकाला सपुत्रकत्व येत नाहीं, त्याप्रमाणें असत्यप्राणानें सत्यपरमात्म्याला सप्राणत्व प्राप्त होत नाहीं; तथापि अविद्येमुळें आपण परब्रह्मावर आरोप करून म्हणतो कीं, परमात्म्यापासून प्राण उत्पन्न झाला. याच प्रमाणें मन, सर्व इंद्रियें व त्यांचे विषय हेही परब्रह्मापासून उत्पन्न झाले, असें आपण म्हणतों. वस्तुतः परब्रह्माला विकार होत नाहीं. तथापि प्राणादिकांच्या उत्पत्तीचा आरोप त्याच्यावर अविद्येनें होतो. असो. आरोप करितां येतो, यावरून सुद्धां परब्रह्म हें स्वरूपतः अप्राणमनादि आहे, असें सिद्ध होतें. पुनः, उत्पत्तीच्या पूर्वी प्राणादि वस्तुतः नसतात, व मागाहून परमात्माच्या सत्तेनें उत्पन्न होतात आणि नष्ट झाल्यावर त्याच्याच सत्तेनें परमात्म्यांत लीन होतात, असें म्हटलें पाहिजे. दोरीवर सर्पाचा आरोप झाला असतां व दिव्याच्या प्रकाशानें सर्पभ्रांति नष्ट झाली असतां, आपल्यास असेंच म्हणावयास पाहिजे कीं दोरीपासून सर्प उत्पन्न झाला होता, व दोरीचें ज्ञान झाल्यावर तो दोरीमध्येंच लीन झाला. असो, सर्वांची उत्पत्ति व लय तेथेंच आहे. मन आणि इंद्रियें, यांप्रमाणेंच शरीराची उत्पत्ति करून त्यांस उपभोगविषय देणारीं आकाशादि पंचमहाभूतें पुरुषोत्तमापासून उत्पन्न होतात आणि तेथेंच लय पावतात.

**शिष्य**—वायु म्हणजे अंतर्बाह्य वायु होय. याचे आवहप्रवहादि भेद आहेत. सर्वांचें धारण करणारी पृथ्वी इचाही पंचमहाभूतांतच अंतर्भाव होतो.

**सिद्धान्ती**—तथापि हें ध्यानांत ठेव कीं, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, हे ज्यांचे असाधारण गुण आहेत, अशीं आकाश वायु, तेज, जल आणि पृथ्वी हीं पंचमहाभूतें उत्पन्न होण्याचा क्रम असा आहेः आकाशापासून वायु, वायूपासून तेज, असा पृथ्वीपर्यंत क्रम असून आकाशाचा गुण जो शब्द तो वायूच्या स्पर्शगुणासह वायूंत असतो. तात्पर्य, पृथ्वींत पांच गुण, जलांत चार, तेजांत तीन, वायूंत दोन आणि आकाशांत एक असा हा क्रम आहे. याप्रमाणें परविद्येचा विषय जो एकरस, अविनाशी,

सत्यरूप, स्वयंप्रकाश आणि निराकार पुरुष आहे, त्याचें स्वरूप पहिल्या दोन मंत्रांत संक्षेपानें सांगितलें व पुढें तोच विषय विस्तारानें सांगण्यास श्रुति प्रवृत्त झाली आहे. खरेंच आहे, संक्षेपानें आणि विस्तारानें सांगितलेला कोणताही विषय समजणें सवघड आणि सुखकारक होतें. सूत्रें संक्षेपानें सांगतात आणि भाष्य या संक्षेपाचा विस्तार करितें. त्याप्रमाणेंच श्रुति जनबोधार्थ कृपाळुपणानें हा अवघड विषय सवघड व्हावा म्हणून विस्तारानें हा बोधप्रपंच करीत आहे. ॥ ३ ॥

**रंगरामानुज**—या मंत्राच्या व्याख्यानांत असें सांगितलें आहे कीं, प्राण, मन, इंद्रियें, पंचमहाभूतें, हीं सर्व साक्षात् परमेश्वरानें निर्माण केलीं आहेत. हें सिद्ध करण्यासाठीं यांनीं अनेक श्रुतींचा अवतार केला आहे. आणि आपल्या मतानें असें सिद्ध केलें आहे कीं, प्रत्येक मंत्रोक्त वस्तूची उत्पत्ति साक्षात् परमेश्वरापासून आहे. 'अद्भ्यः पृथिवी' याचा अर्थ असा करावयाचा कीं, परमेश्वराच्या जलरूपशरीरापासून पृथ्वीची उत्पत्ति परमेश्वरानें केली. तात्पर्य, परमेश्वर सर्वत्र भरला आहे, याचा अर्थ सर्व वस्तु परमेश्वराचें शरीर होतात, आणि त्या वस्तु सत्य व नित्य आहेत.

**माध्व०**-येथून सत्यसृष्टीची उत्पत्ति सांगितली आहे, ती जशी उत्पन्न झाली तशीच सांगितली आहे. येथें प्राणादिपदें 'महदादि तत्त्वें आणि त्यांच्या अभिमानी देवता' या अर्थी आहेत. पृथिवीनंतर ब्रह्मांड आणि विश्व अशा क्रमानें उत्पत्ति झाली आहे.

---

## मंत्र चवथा.

**अग्निर्मूर्धा चक्षुषी चन्द्रसूर्यौ दिशःश्रोत्रे वाग्विवृताश्च वेदाः । वायुः प्राणो हृदयं विश्वमस्य पद्भ्यां पृथिवी ह्येष सर्वभूतान्तरात्मा ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—अग्निः मूर्धा, चक्षुषी चंद्रसूर्यौ, दिशः श्रोत्रे, वेदाः वाग्विवृताः, वायुः प्राणः, विश्वम् अस्य हृदयं, पद्भ्यां पृथिवी, हि एषः सर्वभूतान्तरात्मा** ( अग्नि हा त्याचें मस्तक, चंद्र-सूर्य हे डोळे, दिशा कर्ण, प्रकट झालेले वेद ही वाणी, वायु हा प्राण, विश्व हें हृदय, दोन पायांपासून पृथ्वी उत्पन्न झाली. कारण हा सर्व भूतांचा अंतरात्मा आहे. ) ॥ ४ ॥

योऽपि प्रथमजात्प्राणाद्धिरण्यगर्भाज्जायतेऽण्डस्यान्तर्विराट् स तत्त्वान्तरितत्वेन लक्ष्यमाणोऽप्येतस्मादेव पुरुषाज्जायत एतन्मयश्चेत्येतदर्थमाह । तं च विशिनष्टि । अग्निर्द्युलोकः "असौ वाव लोको

गौतमाग्निः" इति श्रुतेः। मूर्धा यस्योत्तमाङ्गं शिरः। चक्षुषी चन्द्रश्च सूर्यश्चेति चन्द्रसूर्यौ। यस्येति सर्वत्रानुषङ्गः कर्तव्यः। अस्येत्यस्य पदस्य वक्ष्यमाणस्य यस्येति विपरिणामं कृत्वा दिशः श्रोत्रे यस्य। वाग्विवृता उद्घाटिताः प्रसिद्धा वेदा यस्य। वायुः प्राणो यस्य। हृदयमन्तःकरणं विश्वं समस्तं जगदस्य यस्येत्येतत्। सर्वं ह्यन्तःकरणविकारमेव जगन्मनस्येव सुषुप्ते प्रलयदर्शनात्। जागरितेऽपि तत एवाग्निविस्फुलिङ्गवद्विप्रतिष्ठानात्। यस्य च पद्भ्यां जाता पृथिवी। एष देवो विष्णुरनन्तः प्रथमशरीरी त्रैलोक्यदेहोपाधिः सर्वेषां भूतानामन्तरात्मा ॥ ४ ॥

**सिद्धान्ती**—पहिल्या प्रथम उत्पन्न झालेल्या हिरण्यगर्भापासून जो उत्पन्न झाला, जो ब्रह्मांडाच्या आंतील विराट् पुरुष आहे, तो जरी हिरण्यगर्भजनित असा लक्षित होतो ( जरी त्याचें स्वरूप—लक्षण निराळें सांगतां येईल ) तरी तो मागें सांगितलेल्या पुरुषापासूनच उत्पन्न होतो आणि विराट् पुरुष ही ब्रह्ममय आहे हें सांगण्यासाठीं या मंत्राची योजना आहे. या विराट्पुरुषाचें विशेष स्वरूप सांगतात. अग्नि म्हणजे द्युलोक होय. 'हे गौतम, हा लोक ( द्युलोक ) म्हणजे अग्निच होय.' अशी श्रुति आहे. असो, द्युलोक असणारा अग्नि या विराट्—स्वरूपाचा सर्वश्रेष्ठ अवयव म्हणजे शिर होय. द्युलोक हें मस्तक, चंद्रसूर्य ज्याचें नेत्रद्वय,—

**शिष्य**—ज्याचे हें पद आहे कोठें ?

**सिद्धान्ती**—पुढें अस्य ( ह्याचें ) असें जें पद आहे, त्याचाच येथें 'ज्याचें' असा अर्थ करून त्याचा संबंध सर्वत्र लावावयाचा आहे.—दिशा हे ज्याचे कर्ण, उद्घाटित झालेले प्रसिद्ध वेद ही ज्याची वाणी, वायु हा ज्याचा प्राण, हें सर्व विश्व हें ज्याचें अंतःकरण—

**शिष्य**—विश्व हें अंतःकरण कसें ?

**सिद्धान्ती**—जगत् ( विश्व ) हा एक अंतःकरणाचा विकार मात्र आहे. अंतःकरणांत विकृति होऊन जगदुत्पत्ति होते. कारण, मनाला झोंप लागल्यावर विश्वाचा त्या मनांत लय होतो, असा अनुभव सर्वत्र आहे. जागृत स्थितींतही मनापासूनच जगताची स्थापना होते. अग्नीपासून ठिणग्या पसरतात व अग्नींत लय पावतात, त्याप्रमाणें जग हें मनापासून प्रतिष्ठित होऊन तेथें लय पावतें. त्याला स्वयंप्रतिष्ठा नाहीं. यावरून जगत् हा एक मनाचा विकार आहे असें ठरतें. असो, —ज्याच्या पायापासून पृथ्वी उत्पन्न झाली, तो हा विष्णुनामक देव अनंत असून शरीर—धारण करणारांमध्यें कालानें व योग्यतेनें प्रथम आहे. सर्व त्रैलोक्य ही याला देहोपाधि आहे आणि हा विष्णु सर्व भूतांचा अंतरात्मा आहे. ॥ ४ ॥

**रंगरामानुज**—' अग्निः ' = द्युलोक.

**माध्व०**—अग्नि इत्यादि परमेश्वराच्या अंगांची नांवें आहेत. हीं सर्व क्रीडारूप आहेत ' अग्नि '= स्वतः गमन करण्यास असमर्थ असणाऱ्या जगताला नेणारा.

---

## मंत्र पांचवा.

**तस्मादग्निः समिधो यस्य सूर्यः सोमात्पर्जन्य ओषधयः पृथिव्याम् । पुमान्रेतः सिञ्चति योषितायां बह्वीः प्रजाः पुरुषात्संप्रसूताः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—तस्मात् अग्निः, यस्य सूर्यः समिधः,** ( ज्याची समिधा सूर्य आहे असा अग्नि त्या परमपुरुषापासून निर्माण झाला आहे. **सोमात्पर्जन्यः, पृथिव्यां औषधयः; पुमान् योषितायां रेतः सिंचति; बह्वीः प्रजाः पुरुषात् संप्रसूताः** ( सोमापासून पर्जन्य, त्यापासून पृथ्वींतील ओषधी, ओषधीपासून उत्पन्न झालेलें वीर्य पुरुष हा स्त्रीचेठायीं सिंचित करितो आणि या प्रमाणें महापुरुषापासून अनेक प्रकारच्या प्रजा निर्माण होतात. ) ॥ ५ ॥

स हि सर्वभूतेषु द्रष्टा श्रोता मन्ता विज्ञाता सर्वकारणात्मा पञ्चाग्निद्वारेण च याः संसरन्ति प्रजास्ता अपि तस्मादेव पुरुषात्प्रजायन्त इत्युच्यते । तस्मात्परस्मात्पुरुषात्प्रजावस्थानविशेषरूपोऽग्निः स विशिष्यते । समिधो यस्य सूर्यः समिध इव समिधः । सूर्येण हि द्युलोकः समिध्यते । ततो हि द्युलोकान्निष्पन्नात्सोमात्पर्जन्यो द्वितीयोऽग्निः संभवति । तस्माच्च पर्जन्यादोषधयः पृथिव्यां संभवन्ति । ओषधिभ्यः पुरुषाग्नौ हुताभ्य उपादानभूताभ्यः पुमानग्नौ रेतः सिञ्चति योषितायां योषिति योषाग्नौ स्त्रियामिति । एवं क्रमेण बह्वीर्बह्वयः प्रजा ब्राह्मणाद्याः पुरुषात्परस्मात्संप्रसूताः समुत्पन्नाः ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—सर्व भूतांमध्यें तोच पुरुष कायतो द्रष्टा, श्रोता, विचार कर्ता, जाणता, सर्वकारणस्वरूप आत्मा, असा आहे. पुढें ज्यांचें वर्णन केलें आहे त्या पंचाग्निद्वारांनीं ज्या प्रजा उत्पत्तिस्थितींचा अनुभव घेतात, त्या प्रजासुद्धां ह्याच पुरुषापासून उत्पन्न होतात. असें या मंत्रांत सांगावयाचें आहे.

**शिष्य**—पांच अग्नि कोणते ?

**सिद्धान्ती**—सांगतों ऐक,-द्युलोकामध्यें असणारा जो सूर्य तो ज्याची समिधा आहे, असा प्रजोत्पत्तीची मूल अवस्था असणारा विशेषरूपी अग्नि, या पुरुषापासूनच उत्पन्न झाला.

**शिष्य**—सूर्याला समिध म्हटलें, कारण तो द्युलोकाला प्रकाशित करितो. होय ना?

**सिद्धान्ती**—होय. ह्या द्युलोकीं अग्नीपासून सोम उत्पन्न होतो. सोमापासून पर्जन्यरूपी दुसरा अग्नि उत्पन्न होतो. पर्जन्यापासून पृथ्वीमध्यें ओषधी म्हणजे वनस्पती उत्पन्न होतात. हा तिसरा अग्नि. पुरुषरूपी अग्नीमध्यें वनस्पतींच्या आहुती दिल्या म्हणजे त्यांच्यापासून पुरुषवीर्यरूपी अग्नि उत्पन्न होतो. हा चवथा अग्नि व तो अग्नि स्त्रियांच्या रक्तरूपी अग्नीमध्यें प्रवेश करितो. या क्रमानें ब्राह्मणादि नानाविध प्रजा परमश्रेष्ठ पुरुषापासून पंचाग्निद्वारानें उत्पन्न होतात. ' द्यु ( आकाश ), पर्जन्य, पृथ्वी, पुरुष आणि स्त्री ' हे पांच अग्नि होत. अथवा या पांचांच्या ठिकाणीं अग्निदृष्टीनें पहावें, अशी श्रुति आहे. उत्पत्तीचा क्रमही आम्ही दिला तसाच आहे. म्हणजे आकाशापासून पर्जन्य, पर्जनापासून पृथ्वीवरील ओषधी इत्यादि क्रम होय. ॥ ५ ॥

**रंगरामानुज**—अग्नि, पर्जन्य, पृथ्वी, पुरुष, स्त्रिया, हे पांच अग्नि सृष्टीचा उत्पत्तिक्रम दाखवितात. हे सर्व परमेश्वरापासून साक्षात् उत्पन्न झाले आहेत. या पांच अग्नींचा इतर उपनिषदांतही उल्लेख झाला आहे.

**माध्व०**—यज्ञादि सृष्टि ही परमेश्वरापासूनच झाली आहे. 'तस्मात् अग्निः समिधोऽयश्च सूर्यः ' असा यांचा पाठ आहे. अय म्हणजे शुभजनक दैवयज्ञादि धर्म. पुमान्=पूर्णस्वरूपी वासुदेव. योषिता=लक्ष्मी. संप्रसूत=सत्त्वादि सूक्ष्म देहांची झालेली उत्पत्ति.

---

## मंत्र सहावा.

**तस्मादृचः साम यजूंषि दीक्षा यज्ञाश्च सर्वे क्रतवो दक्षिणाश्च । संवत्सरश्च यजमानश्च लोकाः सोमो यत्र पवते यत्र सूर्यः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थ**—**तस्मात् ऋचः, साम, यजूंषि, दीक्षा, यज्ञाः च सर्वे क्रतवः, दक्षिणाः च, संवत्सरः च, यजमानः च, लोकाः, यत्र सोमः पवते यत्र सूर्यः पवते ( त्या परमश्रेष्ठ पुरुषापासून ऋग्वेद ऋचा, सामें, यजू, संस्कार, सर्व अग्निहोत्रादि यज्ञ, दक्षिणा द्यावयास लागणारे क्रतु, संवत्सर, कर्मकर्ता आणि जेथें सोम पवित्र करितो आणि सूर्य प्रकाश देतो, तीं सर्व भुवनें-त्याच्यापासून-उत्पन्न झालीं आहेत. ) ॥ ६ ॥**

किंच कर्मसाधनानि फलानि च तस्मादेवेत्याह । कथं तस्मात्पुरुषादृचो नियताक्षरपादावसाना गायत्र्यादिच्छन्दोविशिष्टा मन्त्राः। साम पाञ्चभक्तिकं साप्तभक्तिकं च स्तोभादिगीतविशिष्टम् । यजूंष्यनियताक्षरपादावसानानि वाक्यरूपाण्येवं त्रिविधा मन्त्राः। दीक्षा मौञ्ज्यादिलक्षणा कर्तृनियमविशेषा । यज्ञाश्च सर्वेऽग्निहोत्रादयः । क्रतवः सयूपाः । दक्षिणाश्चैकगवाद्यपरिमितसर्वस्वान्ताः। संवत्सरश्च कालः कर्माङ्गः । यजमानश्च कर्ता। लोकास्तस्य कर्मफलभूतास्ते विशेष्यन्ते, सोमो यत्र येषु लोकेषु पवते पुनाति लोकान्यत्र येषु सूर्यस्तपति च ते च दक्षिणायनोत्तरायणमार्गद्वयगम्या विद्वदविद्वत्कर्तृफलभूताः॥ ६ ॥

**सिद्धान्ती**—फार काय सांगावें? सर्व कर्मसाधनें आणि कर्मफलें त्या परमपुरुषापासूनच उत्पन्न होतात, असें हा मंत्र सांगत आहे. कसें तें पहाः—ह्या परमपुरुषापासून गायत्री, त्रिष्टुप्, जगति, इत्यादि छंदांनीं विशिष्ट झालेल्या व नियमित अक्षरें, चरण आणि स्वर ज्यांत असतात, अशा ऋचा उत्पन्न झाल्या आहेत. त्याचप्रमाणें पंचावयवी व सप्तावयवी सामें त्याच्यापासूनच उत्पन्न झालीं आहेत. या सामांत अर्थशून्य 'हिंकारादि' वर्णांनीं अर्थपूर्ण गीतें विशिष्ट केलेलीं असतात. यजंमध्यें अक्षरांचा, चरणांचा किंवा स्वरांचा नियम नाहीं. यजु हे वाक्यरूप असतात, पद्यरूप नसतात. याप्रमाणें ऋक्, साम आणि यजु असे तीन प्रकारचे मंत्र आहेत. हे सर्व मंत्र परम पुरुषापासून उत्पन्न झाले.

**शिष्य**—दीक्षा म्हणजे उपनयनादि संस्कार जीमध्यें असतात ती होय. यज्ञांमध्यें कर्त्यानें कांहीं नियमित गोष्टी कराव्या लागतात, म्हणून यजमान दीक्षित होतो.

**सिद्धान्ती**—होय. अग्निहोत्रादि सर्व यज्ञ—एक धेनु दान देण्यापासून तों सर्वस्व दान करण्यापर्यंतचे सर्व दक्षिणात्मक यज्ञ—पशूंचे बली मागणारे यज्ञ, कर्मांचा अवयव असणारा काल, यजमान म्हणजे कर्ता, आणि जेथें सोमाचा (चंद्राचा, सोमाचा) पावक प्रकाश असतो, ते पितृयानमार्गानें प्राप्त होणारे लोक व जेथें सूर्याचा तेजस्वी प्रकाश असतो, ते देवयानमार्गानें प्राप्त होणारे लोक, हे त्या परमपुरुषापासून उत्पन्न होतात.

**शिष्य**—देवयानमार्गानें विद्वान् (ज्ञानी) कर्मकर्ते जातात आणि अज्ञानी लोक पितृयानमार्गानें दक्षिणायनांत जातात. होय नव्हे?

**सिद्धान्ती**—होय. याप्रमाणें त्या पुरुषापासून तिन्ही प्रकारचे मंत्र म्हणजे तिन्ही वेद, यज्ञ, क्रतु, यज्ञकर्ते, यज्ञकाल हा कर्मसाधनें आणि कर्मफलाचा उपभोग देणारीं भुवनें उत्पन्न होतात. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**तस्माच्च देवा बहुधा संप्रसूताः साध्या मनुष्याः पशवो वयांसि । प्राणापानौ व्रीहियवौ तपश्च श्रद्धा सत्यं ब्रह्मचर्यं विधिश्च ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ**—तस्मात्, देवाः, साध्याः, मनुष्याः पशवः, वयांसि, प्राणापानौ, व्रीहियवौ च, तपः, श्रद्धा, सत्यं, ब्रह्मचर्यं च, विधिः, बहुधा संप्रसूताः, ( त्या परमपुरुषापासून अनेक प्रकारचे देव, साध्य, मनुष्य, पशु, पक्षी, प्राणापान, व्रीहियव, तप, श्रद्धा, सत्य, ब्रह्मचर्य आणि विहित कर्तव्यें निर्माण झालीं. ) ॥ ७ ॥

तस्माच्च पुरुषात्कर्माङ्गभूता देवा बहुधा वस्वादिगणभेदेन संप्रसूताः सम्यक्प्रसूताः । साध्या देवविशेषाः । मनुष्याः कर्माधिकृताः । पशवो ग्राम्यारण्याः । वयांसि पक्षिणः । जीवनं च मनुष्यादीनाम् । प्राणापानौ व्रीहियवौ हविरर्थौ । तपश्च कर्माङ्गं पुरुषसंस्कारलक्षणं स्वतन्त्रं च फलसाधनम् । श्रद्धा यत्पूर्वकः सर्वपुरुषार्थसाधनप्रयोगश्चित्तप्रसाद आस्तिक्यबुद्धिस्तथा सत्यमनृतवर्जनं यथाभूतार्थवचनं चापीडाकरम् । ब्रह्मचर्यं मैथुनासमाचारः । विधिश्चेतिकर्तव्यता ॥७॥

**सिद्धान्ती**—या परम पुरुषापासूनच रुद्र, आदित्य, वसु इत्यादि अनेक प्रकारचे कर्मशेष देव योग्य प्रकारें उत्पन्न झाले. त्याचप्रमाणें साध्य नामक देव, कर्माधिकारी मनुष्य, ग्राम्य ( गांवठी ) आणि आरण्य ( रानटी ) पशु, पक्षी, मनुष्यादिकांचे भोग्य पदार्थ, व्रीहि, यव इत्यादि, आणि जीवाला शरीरांत कायम ठेवणारे प्राणापान—

**शिष्य**—भगवन्, व्रीहि ( तांदूळ ) यव ( सातु ) हीं हविष्यान्नें आहेत, नव्हे ?

**सिद्धान्ती**—होय. तसेंच कर्मांग असणारें व पुरुषांस संस्कृत करून स्वतंत्र फलसाधन होणारें तप, श्रद्धा,–

**शिष्य**—श्रद्धा म्हणजे आस्तिक्यबुद्धि. ही आस्तिक्यबुद्धि चित्ताला प्रसन्न करिते. आणि ही बुद्धि असली तर मात्र सर्व पुरुषार्थांच्या साधनाचा प्रयोग सिद्ध होतो. होय ना ! तसेंच सत्य म्हणजे जसा अर्थ असेल किंवा झाला असेल तसें बोलणें. होय ना ?

**सिद्धान्ती**—होय. पण हें सत्य अनृतशून्य असून कोणासही पीडा करणारें नसावें. तसेंच ब्रह्मचर्य ( मैथुननिवृत्ति ) आणि विधि म्हणजे इतिकर्तव्यता हीं सर्व त्या पुरुषापासूनच उत्पन्न झालीं आहेत. ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**सप्त प्राणाः प्रभवन्ति तस्मात्सप्तार्चिषः समिधः सप्त होमाः । सप्त इमे लोका येषु चरन्ति प्राणा गुहाशया निहिताः सप्त सप्त ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ—तस्मात् सप्त प्राणाः प्रभवन्ति, सप्त अर्चिषः, सप्त समिधः, सप्त होमाः, येषु प्राणाः चरन्ति इमे सप्त लोकाः, गुहाशयाः सप्त सप्त निहिताः** ( ज्या पासून सात प्राण, सात ज्वाला, सात समिधा, सात होम, जेथें प्राणसंचार असतो ते सात लोक आणि जेथें प्रत्येक प्राणिशरीरांत गुप्तस्थलीं सात ठिकाणीं सात वस्तु स्थापन केल्या आहेत, त्या वस्तु, हीं सर्व त्यापुरुषापासून उत्पन्न झालीं आहेत.) ॥ ८ ॥

किंच सप्त शीर्षण्याः प्राणास्तस्मादेव पुरुषात्प्रभवन्ति । तेषां च सप्तार्चिषो दीप्तयः स्वविषयावद्योतनानि । तथा सप्त समिधः सप्त विषयाः । विषयैर्हि समिध्यन्ते प्राणाः । सप्त होमास्तद्विषयविज्ञानानि "यदस्य विज्ञानं तज्जुहोति" इति श्रुत्यन्तरात् । किंच सप्तेमे लोका इन्द्रियस्थानानि येषु चरन्ति संचरन्ति प्राणाः । प्राणा येषु चरन्तीति प्राणानां विशेषणमिदं प्राणापानादिनिवृत्त्यर्थम् । गुहायां शरीरे हृदये वा स्वापकाले शेरत इति गुहाशयाः । निहिताः स्थापिता धात्रा सप्त सप्त प्रतिप्राणिभेदम् । यानि चाऽऽत्मयाजिनां विदुषां कर्माणि कर्मफलानि चाविदुषां च कर्माणि तत्साधनानि कर्मफलानि च सर्वं चैतत्परस्मादेव पुरुषात्सर्वज्ञात्प्रसूतमिति प्रकरणार्थः ॥ ८ ॥

**सिद्धान्ती**—फार काय सांगावें ? मस्तकसंबंधी सात चक्षुःकर्णादि प्राण, तसेंच आपापले रूपशब्दादि विषय प्रकाशित करणाऱ्या सात ज्वाला, सात प्रकारच्या विज्ञानशक्ति, सात प्रकारचे विषय—

**शिष्य**—समिधा याचा अर्थ विषय केला. कारण, विषयांच्या योगरूपी होमानें प्राण ( इंद्रियें ) प्रज्वलित होतात. म्हणून ना ?

**सिद्धान्ती**—होय. सात होम म्हणजे त्या त्या विषयांचीं सात विज्ञानें होत. 'याचें जें विज्ञान आहे त्याची आहुति देतों.' अशी अन्य श्रुति प्रमाण आहे. तसेंच जेथें प्राणांचा संचार नित्य असतो, तीं सात भुवनें म्हणजे सात इंद्रियांचीं गोलकस्थानें होत.

**शिष्य**—'ज्यामध्यें प्राणांचा संचार होतो.' असे श्रुतीचे शब्द आहेत, त्यांवरून अर्थातच प्राणापानादि वायूंचा येथें निरास होतो. आणि इंद्रियांचीं स्थानें असा अर्थ स्पष्ट होतो.

**सिद्धान्ती**—शेवटीं शरीरांत किंवा हृदयाचे ठिकाणीं निद्राकाळीं जे विश्रांति घेतात व ज्यांची स्थापना प्रत्येक प्राण्यांमध्यें विधात्यानें केली आहे, त्या गोष्टी (इंद्रियें) होत. सारांश, जे आत्मयज्ञ करणारे आत्मैकत्ज्ञानी आहत, त्यांचीं सर्व कर्मे, कर्मसाधनें व कर्मफलें आणि अविद्वानांचीं कर्मे, कर्मसाधनें आणि कर्मफलें या सर्वज्ञ परमपुरुषापासूनच निर्माण होतात, असा तात्पर्यार्थ आहे. हा कर्मप्रपंच प्रत्येक प्राण्याच्या हृदयस्थानीं गुप्त रीतीनें परमेश्वर स्थापन करितो. म्हणून या प्रपंचाला 'गुहाशय' हें नांव दिलें. हा कर्मप्रपंचही परमेश्वरजन्य आहे. ॥ ८ ॥

**माध्व०**—सप्तार्चिषः-इंद्रियजन्य ज्ञानें; होम=विषयेंद्रियांचे संबंध; लोक=सात इंद्रियगोलक. ( गुहाशयायां असा यांचा पाठ आहे. प्रचलित पाठ गुहाशयाः असा आहे. ) बुद्धीमध्यें प्रत्येक पुरुषाला निरनिराळे सप्त सप्त प्राण आहेत. प्रत्येक शरीरांत सात प्राण असतात.

---

## मंत्र नववा.

**अतः समुद्रा गिरयश्च सर्वेऽस्मात्स्यन्दन्ते**
**सिन्धवः सर्वरूपाः । अतश्च सर्वा ओषधयो रसश्च**
**येनैष भूतैस्तिष्ठते ह्यन्तरात्मा ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ—अतः सर्वे समुद्राः, गिरयः च; अस्मात् सर्वरूपाः, सिंधवः स्यंदंते; अतः च सर्वाः ओषधयः रसः च; येन हि एषः अन्तरात्मा भूतैः तिष्ठते** ( ह्या पुरुषापासून सर्व सागर व सर्व पर्वत उत्पन्न झाले; यापासूनच अनेक स्वरूपी नद्या उत्पन्न होऊन प्रवाह रूपानें चालतात; सर्व वनस्पति आणि सर्व रस येथूनच उत्पन्न झाले. आणि या रसानें व पंचमहाभूतांनीं वेष्टित असा हा अन्तरात्मा लिंग शरीररूपानें वास्तव्य करितो. ) ॥ ९ ॥

अतः पुरुषात्समुद्राः सर्वे क्षाराद्याः । गिरयश्च हिमवदादयोऽस्मादेव पुरुषात्सर्वे । स्यन्दन्ते स्रवन्ति गङ्गाद्याः सिन्धवो नद्यः सर्वरूपा बहुरूपाः अस्मादेव पुरुषात्सर्वा ओषधयो व्रीहियवाद्याः । रसश्च मधुरादिः षड्विधो येन रसेन भूतैः पञ्चभिः स्थूलैः परिवेष्टितस्ति-

श्रुते तिष्ठति ह्यन्तरात्मा लिङ्गं सूक्ष्मं शरीरम्। तद्ध्यन्तराले शरीरस्याऽऽत्मनश्चाऽऽत्मवद्वर्तत इत्यन्तरात्मा ॥ ९ ॥

**सिद्धान्ती**—क्षारादि सर्व सप्त महासमुद्र आणि हिमालयादि सप्त महापर्वत या पुरुषापासून उत्पन्न झाले. अनेक स्वरूपें धारण करणाऱ्या गंगादि महानद्या येथूनच उगम पावून रत्नाकराकडे धांवत जातात. व्रीहि-यवादि सर्व ओषधी ( वनस्पती व त्यांचीं फळें ) येथून उत्पन्न झालीं. सहा प्रकारचे मधुर, आम्ल, तिक्त, इत्यादि रस हेही महापुरुषापासून उत्पन्न झाले. आणि या षड्रसांनीं व स्थूल अशा पंचमहाभूतांनीं वेष्टिलेला आत्मा म्हणजे लिंगशरीर अथवा सूक्ष्म शरीर असतें. तें हें सूक्ष्म शरीर स्थूल शरीराच्या व आत्म्याच्या मध्यें असतें आणि स्थूल शरीरास नियमित करितें. म्हणून त्याला अन्तरात्मा असें म्हणतात. ॥ ९ ॥

**माध्व०**—' येन इत्यादि '–ज्या कारणानें अंतर्यामी भगवान् ब्रह्मदेवादि सर्व भूतांमध्यें राहतो, त्या कारणानें सर्व उत्पन्न केलेल्या सृष्टीचें अंतर्याम भगवंतानेंच निर्माण केलें आहे, असें सिद्ध होतें.

---

## मंत्र दहावा.

**पुरुष एवेदं विश्वं कर्म तपो ब्रह्म परामृतम्। एतद्यो वेद निहितं गुहायां सोऽविद्याग्रन्थिं विकिरतीह सोम्य ॥ १० ॥**

## इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषदि द्वितीयमुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**अन्वय व अर्थ—पुरुषः एव इदं विश्वं, कर्म, तपः, परामृतं ब्रह्म,** ( हा पुरुषच हें सर्व विश्व, सर्वकर्म, सर्वतप आणि अति श्रेष्ठ व अमर असें ब्रह्म आहे. ) **सोम्य! एतत् गुहायां निहितं यः वेद सः इह अविद्याग्रंथिं विकिरति** ( हे सौम्य! गुहेमध्यें स्थापित झालेलें हें ज्ञान ज्याला झालें तो अविद्येची ग्रंथी येथल्या येथेंच सोडवून टाकतो, नाहींशी करितो. ) ॥ १० ॥

एवं पुरुषात्सर्वमिदं संप्रसूतम्। अतो वाचारम्भणं विकारो नामधेयमनृतं पुरुष इत्येव सत्यम्। अतः पुरुष एवेदं विश्वं सर्वम्। न विश्वं नाम पुरुषादन्यत्किंचिदस्ति। अतो यदुक्तं तदेतदभिहितं

कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति। एतस्मिन्हि परस्मिन्नात्मनि सर्वकारणे पुरुषे विज्ञाते पुरुष एवेदं विश्वं नान्यदस्तीति विज्ञातं भवतीति। किं पुनरिदं विश्वमित्युच्यते। कर्माग्निहोत्रादिलक्षणम्। तपो ज्ञानं तत्कृतं फलमन्यदेतावद्धीदं सर्वम्। तच्चैतद्ब्रह्मणः कार्यं तस्मात्सर्वं ब्रह्म परामृतं परममृतमहमेवेति यो वेद निहितं स्थितं गुहायां हृदि सर्वप्राणिनां स एवं विज्ञानादविद्याग्रंथिं ग्रन्थिमिव दृढीभूतामविद्यावासनां विकिरति विक्षिपति नाशयतीह जीवन्नेव न मृतः सन्हे सोम्य प्रियदर्शन ॥ १० ॥

## इति मुण्डकोपनिषद्भाष्ये द्वितीयमुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—याप्रमाणें हें दिसणारें अंतर्बाह्य विश्व पुरुषोत्तमापासून उत्पन्न झालेलें आहे. जेवढा म्हणून विकार आहे, जें कांहीं नामरूप आहे, तें सर्व वाणीचा विलास मात्र आहे, असत्य आहे. पुरुष काय ती एक सत्य वस्तु आहे. म्हणून हें सर्व पुरुषन्यज विश्व पुरुषच असलें पाहिजे. पुरुषाहून विश्व ही अन्य वस्तु नाहीं. म्हणून जो प्रश्न विचारला होता कीं ' भगवन्, कोणती एक वस्तु विज्ञात झाली असतां हें सर्व विज्ञात होतें ? ' त्या प्रश्नाला श्रुतीनें उत्तर दिलें आहे, तें असें आहे.

**शिष्य**—तें कसें ?

**सिद्धान्ती**—ह्या अत्यंत श्रेष्ठ, सर्व-कारण आणि सर्वनियामक पुरुषाचें ज्ञान झालें म्हणजे पुरुष हाच सर्व विश्व आहे, दुसरी कांहीं वस्तु नाहीं, असा निश्चय होतो. म्हणजे पुरुषज्ञानानें सर्व विश्वज्ञान होतें; असें तात्पर्य आहे.

**शिष्य**—भगवन् ! मग विश्व म्हणजे तरी काय ?

**सिद्धान्ती**—जें आपल्या सर्व इंद्रियांस प्रकट होतें किंवा कल्पितां येतें, सर्व म्हणजे विश्व होय. हें सर्व कर्मात्मक आहे, कृत आहे. अग्निहोत्रादि ज्याचें लक्षण आहे, तें कर्म, विश्व, होय. तप म्हणजे ज्ञान आणि तपानें उत्पन्न झालेलें फल तपाहून निराळें आहे. तपात्मक ज्ञानाहून त्याचें फल निराळें असतें. याप्रमाणें कर्म व तप मिळून हें सर्व होतें. पण हें सर्व ब्रह्माचें कार्य आहे. म्हणून ' हें सर्व ब्रह्म आहे, परम अमृतमय आहे, मीही ब्रह्म आहें, सारांश, मी आणि ब्रह्म एकच आहें.' असें गूढज्ञान ज्याला झालें, 'सर्व प्राण्यांच्या अंतःकरणांत वास्तव्य करणारा आत्माराम मीच आहें,' असा ज्याचा निश्चय झाला, तो अज्ञानाचें घट्ट आणि कठिण असें जें वासनात्मक गांठोडें असतें तें सोडून मोकळें करितो, जिवंत असतांना अज्ञान नाहीसें करितो, मेल्यावर नव्हे. सारांश, जिवंत असतांना अमर होतो, जीवन्मुक्त होतो हे प्रियदर्शना शिष्या! त्याचें सर्व अज्ञान नष्ट होऊन तो येथेंच मुक्त होतो. ॥ १० ॥

**रंग०**—ज्या अर्थी परमात्मा सर्व भूतांचा अंतरात्मा आहे, त्या अर्थी हें सर्व चराचर विश्व पुरुषापासून उत्पन्न झालें आहे, अथवा विश्वाचें उपादानकारण परमेश्वर आहे, असें ठरतें. अर्थात् परमेश्वराचें ज्ञान झालें असतां सर्व विश्वाचें ज्ञान होतें. येथील 'ब्रह्म' शब्दानें प्रकृतीहून श्रेष्ठ असणारे जे मुक्त आत्मे त्यांना अमृताप्रमाणें आनंद देणारा अक्षर पुरुष, असा अर्थ समजावयाचा आहे.

**माध्व०**—येथें सर्व कर्म आणि सर्व तप एकच आहे असें सांगून सर्व कर्में एकरूपी आहेत आणि सर्व तपें एकस्वरूपी आहेत आणि पुरुष परामृत ब्रह्म आहे, असें म्हणण्याचा अभिप्राय आहे. सारांश भगवंताच्या सर्व चेष्टा आणि त्याचें सर्व ज्ञान हीं भगवत्स्वरूपी आहेत, असें ठरतें. असें ज्याला समजलें, म्हणजे सृष्टीच्या उत्पत्तीचें कर्म करून आणि ज्ञानादि गुण असून एकरस भगवान् सर्वकर्ता आहे, असें ज्यानें गुरुमुखापासून श्रवण केलें तो आपलें भावरूपी अज्ञान शिथिल करितो. असें समजणें ही भगवंताची ज्ञानरूपी अंतरुपासना आहे. भगवद्गुण सांगावयाचे ते ज्ञानासाठीं व ध्यानासाठीं असतात.

**द्वितीय मुण्डक प्रथमखंड समाप्त.**

---

# द्वितीय-मुंडक.

## द्वितीय खंड.

### मंत्र पहिला.

**आविः संनिहितं गुहाचरं नाम महत्पदमत्रैतत्समर्पितम् । एजत्प्राणन्निमिषच्च यदेतज्जानथ सदसद्वरेण्यं परं विज्ञानाद्यद्वरिष्ठं प्रजानाम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ**—**आविः संनिहितं** ( स्वयंप्रकाश असून सर्व प्राण्यांच्या हृदयांत राहणारें व तेथें प्रकाशमान् होणारें ) **गुहाचरं नाम** ( ज्याचें स्वरूपज्ञान होणें दुर्घट आहे, असें प्रसिद्ध आहे ) **महत्पदं** ( जें सर्वांचें आश्रयस्थान आहे ) **एजत्, प्राणत्, निमिषत् च यत्, एतत् अत्र एव समर्पितं** ( जें जें म्हणून हलतें, ज्याला प्राण आहे, ज्यांच्या उघडझांपीच्या क्रिया सर्वदां होतात, तें तें सर्व या परब्रह्माचे–ठिकाणीं समर्पित झालें आहे, असें हें परब्रह्म आहे ) **यत् सदसत्, वरेण्यं, प्रजानां विज्ञानात् परं, वरिष्ठं, एतत् जानथ** ( जें मूर्त व अमूर्तांचा आश्रय

आहे, जें सर्ववर्णनीय आहे, जें सर्व प्राण्यांच्या ज्ञानाहून श्रेष्ठ व विलक्षण अगोचर आहे, आणि जें सर्वश्रेष्ठ आहे, त्याचें ज्ञान करून घ्या.) ॥ १ ॥

अरूपं सदक्षरं केन प्रकारेण विज्ञेयमित्युच्यते । आविः प्रकाशं संनिहितं वागाद्युपाधिभिर्ज्वलति भ्राजतीति श्रुत्यन्तराच्छब्दादीनुपलभमानवदवभासते । दर्शनश्रवणमननविज्ञानाद्युपाधिधर्मैराविर्भूतं सल्लक्ष्यते हृदि सर्वप्राणिनाम् । यदेतदाविर्ब्रह्म संनिहितं सम्यक्स्थितं हृदि तद्गुहाचरं नाम गुहायां चरतीति दर्शनश्रवणादिप्रकारैर्गुहाचरमिति प्रख्यातम् । महत्सर्वमहत्त्वात्पदं पद्यते सर्वेणेति सर्वपदार्थास्पदत्वात् । कथं तन्महत्पदमित्युच्यते । यतोऽत्रास्मिन्ब्रह्मण्येतत्सर्वं समर्पितं प्रवेशितं रथनाभाविवारा एजच्चलत्पक्ष्यादि । प्राणत्प्राणितीति प्राणापानादिमन्मनुष्यपश्वादि । निमिषच्च यन्निमेषादिक्रियावद्यच्चानिमिषच्चशब्दात्समस्तमेतदत्रैव ब्रह्मणि समर्पितम् । एतद्यदास्पदं सर्वं जानथ हे शिष्या अवगच्छथ तदात्मभूतं भवतां सदसत्स्वरूपम् । सदसतोर्मूर्तामूर्तयोः स्थूलसूक्ष्मयोस्तद्व्यतिरेकेणाभावात् । वरेण्यं वरणीयं तदेव हि सर्वस्य नित्यत्वात्प्रार्थनीयं परं व्यतिरिक्तं विज्ञानात्प्रजानामिति व्यवहितेन संबन्धो यल्लौकिकविज्ञानागोचरमित्यर्थः । यद्वरिष्ठं वरतमं सर्वपदार्थेषु वरेषु तद्ध्येकं ब्रह्मातिशयेन वरं सर्वदोषरहितत्वात् ॥ १ ॥

**शिष्य**—ज्याला कोणत्याही प्रकारचें रूपरंगादि गुण नाहींत, त्या अविनाशी परब्रह्माचें ज्ञान कसें करून घ्यावें ?

**सिद्धान्ती**—ऐकः ‘ज्वालामय आहे’ ‘प्रकाशमय आहे’ इत्यादि श्रुतींवरून असें स्पष्ट सिद्ध होतें कीं वाणी, नेत्र, कर्ण इत्यादि उपाधींच्या द्वारानें ह्या ब्रह्मास शब्द, रूप, शद्ध, इत्यादि गुणांस प्रकाशितां येतें, असें सिद्ध होऊन हें ब्रह्म जीवस्वरूपद्वारां प्रकाशित होतें. ‘आविः’ या शब्दाचा प्रस्तुतस्थलीं प्रकाश हा अर्थ आहे. तात्पर्य हें ब्रह्म विश्वाची उपलब्धी करितें म्हणून तें प्रकाशवंत आहे, असें ठरतें. रूपदर्शन, शब्दश्रवण, विषयचिंतन, विषयविज्ञान इत्यादि उपाधिधर्मांनीं (नेत्र, कर्ण, मन, बुद्धि इत्यादि ज्या उपाधि आहेत, त्यांच्या गुणधर्मांनीं) हें ब्रह्म प्रकट होऊन लक्षितां येतें आणि तें जीवांच्या हृदयांत वास्तव्य करितें, असें ठरतें. वत्सा ! हें दर्शन, श्रवण, इत्यादि स्वरूपांनीं प्रकट होणारें ब्रह्म जीवहृदयांत व्यवस्थितरीतीनें राहिलें असतें म्हणून त्याला ‘गुहाचर’ असें म्हणतात, ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. ‘गुहाचर’ असें नांव मिळण्याचें रहस्य हें आहे कीं हें ब्रह्म दर्शनश्रवणादिप्रकारांनीं गुहेमध्यें (हृदयामध्यें)

संचार करितें. गुहेमध्यें राहणारें ते 'गुहाचर' हें सर्वांहून अत्यंत मोठें असून पुनः याच्या आश्रयाला सर्व पदार्थ येतात म्हणून ब्रह्माला 'महत्पद'. अशी संज्ञा आहे.

**शिष्य**—ब्रह्म हें महत्पद आहे, हें कसें ?

**सिद्धान्ती**—कारण या ब्रह्मामध्यें अंतरिक्षांत संचार करणारे पक्ष्यादि, प्राणापानादि व्यवहार करणारे मनुष्यपश्वादि, तसेच निमेषादि—झांकणें, गुप्त होणें इत्यादि क्रिया करणारे आणि तद्विरुद्ध म्हणजे प्रकट होण्याची क्रिया करणारे ( आविर्भाव व तिरोभाव करणारे ) सर्व पदार्थ जे आहेत, त्या सर्वांचें समर्पण या एका ब्रह्मांत होतें. रथाच्या सर्व अरा रथनाभीमध्यें समर्पित होतात, तद्वत् सर्व पदार्थ ब्रह्माच्या आश्रयानें राहतात.

**शिष्य**—'अनिमेष' हा शब्द मुळमंत्रांत नाहीं.

**सिद्धान्ती**—पण वाक्याच्या अपेक्षेनें व 'आणि' या शद्बानें त्याचें अस्तित्व सिद्ध होते व श्रुति ही अन्यठिकाणीं निमेषाबरोबर अनिमेषाचा उच्चार करिते. असो; सर्वांचें आश्रयस्थान असणारें हें ब्रह्म 'हे शिष्यहो ! तुमचाही आत्मा आहे, ( तुमचेंही आश्रयस्थान आहे ) हें जाणून घ्या' असें श्रुतिमाता मोठ्या कळकळीनें सांगत आहे. तसेंच, हें सत् व असत् ( मूर्त व अमूर्त, स्थूल व सूक्ष्म ) यांचें मूळस्वरूप आहे. हें जर नसेल तर सर्व मूर्तामूर्तवस्तु शून्यरूप होतील. सारांश, याच्या आधारानें मूर्तामूर्तवस्तु राहतात. हें वरेण्य म्हणजे सर्वांनीं स्तुति करण्यास व सर्वांनीं प्रार्थना करण्यास योग्य आहे, कारण तें नित्य आहे.

**शिष्य**—तसेंच, हें सर्व लोकांच्या विज्ञानांहून पर म्हणजे अत्यंत निराळें आहे. सारांश व्यावहारिक ज्ञानविज्ञानाला हें चिद् ब्रह्मरूप अगोचर आहे. येथें 'प्रजानां' याचा संबंध विज्ञानाशीं आहे. होयना ?

**सिद्धान्ती**—होय. येथें अमळसा दूरान्वय आहे. अर्थातच हें सर्व वरिष्ठ ( सर्व श्रेष्ठपदार्थांहून जास्त श्रेष्ठ ) आहे. ब्रह्म हें सर्वथा दोषशून्य आहे, म्हणून तें सर्व पदार्थांपेक्षां अत्यंत श्रेष्ठ असलें पाहिजे, हें उघडच झालें. हें एकच एक आहे. सारांश हें गूढ आहे तरी सर्वप्रकाशक, सर्वाधार, सर्वरूप, सर्वागोचर व सर्वश्रेष्ठ आहे. ॥ १ ॥

**रंगरामा०**—'आविः'=अव्यय; अविनाशी. हें अव्यय ब्रह्म योगिलोकांना मात्र प्रत्यक्ष असतें. 'सदसद्वरेण्यं'=स्थूल आणि सूक्ष्म वस्तूंस साधार आहे म्हणून त्यांनीं प्रार्थना करण्यास योग्य—' विज्ञान=जीव.

**माध्व०**—मागील प्रकरणांत ब्रह्म हें जगज्जन्मादि कारण आहे आणि जगत्कर्त्या ब्रह्माचें ज्ञान झालें असतां अविद्येची गांठ सैल होते हें सिद्ध केलें. आतां हें ज्ञान झाल्यावर मुमुक्षूंनीं काय करावयास पाहिजे असा प्रश्न उद्भवेल, त्याला हें उत्तर कीं, मुमुक्षूंनें विशेषगुणविशिष्ट ब्रह्माचें श्रवण करावें, असें सांगावयाचें आहे. 'आविः' नित्य प्रकटस्वरूपी. 'एजत्'=कर्मेंद्रियव्यापारवान्. 'प्राणत्'=श्वासादि व्यापारवान्. 'निमिषत्'=ज्ञानेंद्रियव्यापारवान्. हीं तिन्हीं विशेषणें अशासाठीं उपयोजिलीं आहेत कीं जीवांचे सर्व जागृतादिस्थितिव्यापार अंतर्यामी परमेश्वराच्या आधीन आहेत असें समजावें. सदसद्वरेण्यं=मूर्तामूर्तांहून किंवा कार्यकारणाहून श्रेष्ठ. 'विज्ञानात्परं'=ब्रह्मदेवापेक्षांही श्रेष्ठ.

## मंत्र दुसरा.

**यदर्चिमद्यदणुभ्योऽणु च यस्मिँल्लोका निहिता लोकिनश्च । तदेतदक्षरं ब्रह्म स प्राणस्तदु वाङ्मनः । तदेतत्सत्यं तदमृतं तद्वेद्धव्यं सोम्य विद्धि ॥ २ ॥**

अन्वय व अर्थ—**यत् आर्चिमत्, यत् अणुभ्यः अणु, च यस्मिन् लोकाः लोकिनश्च निहिताः** ( जें दीप्तिमंत आहे, जें सूक्ष्माहून अतिसूक्ष्म आहे व ज्यांत सर्व भुवनें आणि भुवनस्थ लोक स्थापित झाले आहेत ) **तत् एतत् अक्षरं ब्रह्म** (तें हें अविनाशि ब्रह्म आहे) **सः प्राणः** ( तो प्राण आहे ) **तत् उ वाङ्मनः** ( तें वाणी आणि मन ही आहे ) **तत् एतत् सत्यं, तत् अमृतं, तत् वेद्धव्यं** हें सत्य व अमृत आहे. त्याचा वेधकरावा. ) **सोम्य! विद्धि** ( हे सौम्य, हें सर्व जाणून समाधान करून घे ). ॥ २ ॥

किंच यदर्चिमद्दीप्तिमद्दीप्त्याऽऽदित्यादि दीप्यत इति दीप्तिमद्ब्रह्म । किंच यदणुभ्यः श्यामाकादिभ्योऽप्यणु च सूक्ष्मम् । चशब्दात्स्थूलेभ्योऽप्यतिशयेन स्थूलं पृथिव्यादिभ्यः । यस्मिँल्लोका भूरादयो निहिताः स्थिताः । ये च लोकिनो लोकनिवासिनो मनुष्यादयश्चैतन्याश्रया हि सर्वे प्रसिद्धास्तदेतत्सर्वाश्रयमक्षरं ब्रह्म स प्राणस्तदु वाङ्मनो वाक्च मनश्च सर्वाणि च करणानि तदन्तश्चैतन्यं चैतन्याश्रयो हि प्राणेन्द्रियादिसर्वसंघातः "प्राणस्य प्राणम्" इति श्रुत्यन्तरात् । यत्प्राणादीनामन्तश्चैतन्यमक्षरं तदेतत्सत्यमवितथमतोऽमृतमविनाशि तद्वेद्धव्यं मनसा ताडयितव्यम् । तस्मिन्मनःसमाधानं कर्तव्यमित्यर्थः । यस्मादेवं हे सोम्य विद्ध्यक्षरे चेतः समाधत्स्व ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—आणखी; हें ब्रह्म प्रकाशवंत असून आपल्या प्रकाशानें मोठमोठ्या आदित्यादि जडांस ही प्रकाशित करून पुनः त्यांस प्रकाशवंत करितें. तसेंच श्यामाकधान्याच्या कणापेक्षांही अति सूक्ष्म असून तें पृथिव्यादि स्थूलपदार्थांपेक्षां अत्यंत मोठें आहे.

**शिष्य**—मंत्रांत स्थूलाचा निर्देश नाहीं.

**सिद्धान्ती**--अरे ! ‘ च ’ ( आणि ) हें पद आहेना ! त्यावरून स्थूलाचा निर्देश सहज होतो. पुनः; पृथ्वी आदि सर्व सप्त लोक त्याच्यामध्यें स्थित झालें आहेत; इतकेंच नव्हे, तर या सप्तभुवनांत राहणारे मनुष्यादि सर्व प्राणीही ब्रह्मचैतन्याच्या आश्र्यानें सिद्ध होतात, हें सर्वप्रसिद्ध आहे. याप्रमाणें सर्व चराचराचा आश्रय असणारें तें हें अविनाशि ब्रह्म आहे. तें सर्व प्राणवंताचा प्राण आणि वाणी व मन असणाऱ्या--सर्व दशेन्द्रियें असणाऱ्या--प्राण्यांचें तें मनादिइंद्रियें आहे. ‘ब्रह्म प्राणांचा प्राण आहे’ ही श्रुतिस्पष्ट असें सांगते कीं प्राणेंद्रियादि सर्व शरीरसंघात हा ब्रह्मचैतन्याच्या मात्र आश्रयानें भासतो. असो; हें जें प्राणादिकांचें अंतर्यामी व अविनाशी चैतन्य आहे, तें सत्यरूप (सत्तारूप) आहे आणि म्हणूनच तें अमृत म्हणजे अविनाशि व अविकारि आहे. त्या ह्या ब्रह्माला मनानें वेध करावा; म्हणजे तें आपलेंसें करून घेऊन त्याचे ठिकाणीं मनाचें समाधान करावें, शुद्ध मनाची स्थापना करावी, हें अवश्य आहे. असें आहे म्हणून श्रुति म्हणते कीं ‘ हे सौम्य ! अक्षर ( अविनाशि ) जें ब्रह्म, त्याच्या ठिकाणीं अंतःकरणाचें समर्पण करून समाधान करून घे. सारांश, मागील व या मंत्रांत ब्रह्मस्वरूपाचें दिग्दर्शन लक्षणारूपानें करून जीवानें त्या स्वरूपाचें ध्यान करून समाधिवृत्तींत असावें, असा जीव--कल्याणकारी श्रुतीनें उतमोत्तम उपदेश केला आहे. हा उपदेशच पुढील मंत्रांत स्पष्ट केला आहे. ॥ २ ॥

**रंगरामानुज**--‘ अर्चिमत् ’ = दीप्तिमान्. अर्थातच परमेश्वराला शरीर आहे आणि शरीरद्वारानें तो प्रकाशितो हें सिद्ध आहे. ‘ अमृतं ’=असंसारीमुक्तांनीं भोगण्यास योग्य.

**माध्व०**--‘ प्राण ’=मुख्य प्राणाचा अंतर्यामी. अदृश्यत्वादि गुण असणारा, सृष्टि उत्पन्न करणारा. अक्षरस्वरूपी सकलगुणपूर्ण भगवान् सकल प्राण्यांचा प्रेरक आहे. म्हणून त्याला प्राण असें म्हटलें. वाक् आणि मन यांचाही अर्थ अभिमानी देवतांचा अंतर्यामी असाच करावयाचा आहे. ‘ सत्य ’=मुक्तामुक्तांचा नियामक. ‘ अमृत ’=नित्यमुक्त. एवंगुणविशिष्ट ब्रह्माचें ज्ञानीभक्तानें **मनन** करावें.

---

## मंत्र तिसरा.

**धनुर्गृहीत्वौपनिषदं महास्त्रं शरं ह्युपासानिशितं संधयीत । आयम्य तद्भावगतेन चेतसा लक्ष्यं तदेवाक्षरं सोम्य विद्धि ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ**--औपनिषदं महास्त्रं धनुः गृहीत्वा उपासानिशितं शरं हि संधयीत ( उपनिषत् संबंधीं व मोठे सामर्थ्यवान्--फार लांबीच्या फेंकी करण्यास समर्थ असणारें विस्तीर्ण--धनुष्य घेऊन उपासनेनें तीक्ष्ण

केलेल्या बाणाची योजना करा ) **आयम्य तद्भावगतेन चेतसा लक्ष्यं** ( आणि प्रत्यंचा–धनुष्याची दोरी–दीर्घ ओढून म्हणजे त्या ब्रह्माचे ठिकाणीं भावनायोगें सर्वव्यापी झालेल्या अंतःकरणानें ब्रह्माचें–लक्ष्याचें–जें आपल्यास मिळवावयाचें आहे, त्याचें–ध्यान करा. ) **तत् एव अक्षरं सोम्य ! विद्धि** ( हे सोम्य, तेंच हे अक्षर अविनाशि ब्रह्म आहे, असें जाण. ) सारांश, वैदिकउपासनेनें एकाग्र झालेलें चित्त परब्रह्माचे ठिकाणीं लावावें. धनुष्याला बाण लावून जसा आपण आपल्या लक्ष्यावर नेम धरितों तसाच आपल्या संस्कृत अंतःकरणानें परब्रह्माचा वेध करावा. ॥ ३ ॥

कथं वेद्धव्यमित्युच्यते । धनुरिष्वासनं गृहीत्वाऽऽदायौपनिषदमुपनिषत्सु भवं प्रसिद्धं महास्त्रं महच्च तदस्त्रं च महास्त्रं धनुस्तस्मिञ्छरम् । किंविशिष्टमित्याह । उपासानिशितं संतताभिध्यानेन तनूकृतं संस्कृतमित्येतत् । संधयीत संधानं कुर्यात् । संधाय चाऽऽयम्याऽऽकृष्य सेन्द्रियमन्तःकरणं स्वविषयाद्विनिवर्त्य लक्ष्य एवाऽऽवर्जितं कृत्वेत्यर्थः । न हि हस्तेनैव धनुष आयमनमिह संभवति । तद्भावगतेन तस्मिन्ब्रह्मण्यक्षरे लक्ष्ये भावना भावस्तद्गतेन चेतसा लक्ष्यं तदेव यथोक्तलक्षणमक्षरं सोम्य विद्धि ॥ ३ ॥

**सिद्धा०**–वेध कसा करावयाचा तें या मंत्रांत सांगितलें आहे. उपनिषदाच्या साहाय्यानें सिद्ध झालेलें आणि लांबलांबच्या टप्यावरील पदार्थांचा वेध करितां येईल, अशा शक्तीचें प्रणवरूपि विस्तीर्ण धनुष्य घेऊन त्याच्यावर अखंड एकाग्र ध्यानानें अति तीक्ष्ण आणि संस्कृत झालेल्या मनोपाधिक जीवरूपी बाणाची योजना करावी. हें बाण-संधान करून आणि धनुष्याची प्रत्यंचा ओढून म्हणजे इंद्रियांसहीत अंतःकरणाला आपापल्या विषयांपासून निवृत्त करून ब्रह्मरूपी जो आपला वेध्य पदार्थ त्याला मात्र आपल्या बाणाचा म्हणजे अंतःकरणाचा नेम बिनचुक लागेल असें करा. अर्थातच आपले, धनुष्य आपल्या हातानें आपण लांब आखूड करितों, तसा प्रकार येथें नाहीं. तर अविनाशी ब्रह्माच्या ठिकाणीं दृढ भावना अंतःकरणाची झाली आहे, अशा स्वरूपानें ब्रह्माचें आकलन करावें. अविनाशिपणा इत्यादि पूर्वोक्त स्वरूप हेंच ज्याचें लक्षण आहे, तें ब्रह्म होय, हें सर्वांनीं योग्यरीतीनें समजून घेतलें पाहिजे. सारांश उपनिषदांत सांगितलेल्या प्रणवोपासनेनें व संस्कृत झालेल्या अंतःकरणानें एकाग्र चिंतन करूं लागावें हा तात्पर्यार्थ आहे. ॥ ३ ॥

**रंगरामानुज**—' धनुः '=प्रणवनामक धनुष्य. भगवंताच्या उपासनेनें स्थूल-सूक्ष्मशरीरांपासून निराळें केलेला; अक्षरादि आठ लक्षणांनीं युक्त, असा जो जीवात्मा तो धनुष्यास लावावयाचा बाण आहे असें समजावें. ' आयम्य '=जीव आणि परमात्मा हे शेषशेषी आहेत, जीव हा परमात्म्याचा एक शरीरप्रकार आहे, असें अनुसंधान ठेऊन. ' भागवतेन ' असाही एक पाठ या आचार्यांस उपलब्ध झाला होता असें दिसतें. ' भावगत ' असा एक पाठ घेतला तर ' भावगतेन चेतसा आयम्य '= मनानें अन्य विषय वर्ज करून अक्षर जें परब्रह्म तिकडे आपलें चित्त एकाग्र करण्याची स्थिति, असा अर्थ करावा.

**माध्व०**—' महास्त्र '=मूलमंत्राचे व्यंजक जें ओंकार स्वरूप तें. ' उपासना '= श्रवणमननात्मक शास्त्राभ्यास. ' विद्धि '=ध्यानकर.

---

## मंत्र चवथा.

**प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ।**
**अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयो भवेत् ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—प्रणवः धनुः, हि आत्मा शरः, ब्रह्म तल्लक्ष्यं उच्यते** ( ओंकार हें आपलें धनुष्य, आत्मा हा बाण आणि त्या बाणाचें लक्ष्य म्हणजे ब्रह्म होय. ) **अप्रमत्तेन वेद्धव्यं** (आणि प्रमत्त न होतां–पूर्ण काळजीनें–वेध घेऊन बाण सोडावा. ) **शरवत् तन्मयः भवेत्** ( बाण लक्ष्याकडे जाऊन त्यांत शिरतो व तेथें तन्मय होतो, त्याप्रमाणें आपला आत्मा ब्रह्मापर्यंत जाऊन तन्मय होईल. ) ॥ ४ ॥

यदुक्तं धनुरादि तदुच्यते । प्रणव ओंकारो धनुः । यथेष्वासनं लक्ष्ये शरस्य प्रवेशकारणं तथाऽऽत्मशरस्याक्षरे लक्ष्ये प्रवेशकारणमोंकारः । प्रणवेन ह्यभ्यस्यमानेन संस्क्रियमाणस्तदालम्बनोऽप्रतिबन्धेनाक्षरेऽवतिष्ठते यथा धनुषाऽऽस्त इषुर्लक्ष्ये । अतः प्रणवो धनुरिव धनुः । शरो ह्यात्मोपाधिलक्षणः पर एव जले सूर्यादिवदिह प्रविष्टो देहे सर्वबौद्धप्रत्ययसाक्षितया स शर इव स्वात्मन्येवार्पितोऽक्षरे ब्रह्मण्यतो ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते लक्ष्य इव मनःसमाधित्सुभिरात्मभावेन लक्ष्यमाणत्वात् । तत्रैवं सत्यप्रमत्तेन बाह्यविषयोपलब्धितृष्णाप्रमादवर्जितेन सर्वतो विरक्तेन जितेन्द्रियेणैकाग्रचित्तेन वेद्धव्यं ब्रह्म लक्ष्यम् । ततस्तद्वेधनादूर्ध्वं शरवत्तन्मयो भवेत् । यथा शरस्य

लक्ष्यैकात्मत्वं फलं भवति। तथा देहाद्यात्मप्रत्ययतिरस्करणेनाक्षरैकात्मत्वं फलमापादयेदित्यर्थः ॥ ४ ॥

**सिद्धा०**—या मंत्रांत धनुष्य इत्यादि कोणते पदार्थ हें सांगितलें आहे. ओंकाररूपी प्रणव हे मागील मंत्रांतील उपनिषत्पठित धनुष्य होय. ज्या प्रमाणें धनुष्य हें लक्ष्यामध्यें बाणाचा प्रवेश करण्यास साधनीभूत होतें, त्याप्रमाणें आत्मारूपी बाणाचा प्रवेश ब्रह्मामध्यें करण्याला ओंकार हें उत्कृष्ट साधन आहे. प्रणवाचा सतत अभ्यास केला असतां चित्त संस्कृत होतें आणि त्याच्या साहाय्यानें आपलें चित्त कांहीं एक विघ्न न येतां परब्रह्माचें ठिकाणीं जाऊन तेथेंच राहतें. जसा बाण धनुष्याच्या साहाय्यानें लक्ष्यापर्यंत जाऊन पोंहचतो, त्याप्रमाणें आपलें चित्त अथवा सोपाधिक आत्मा ब्रह्माचें ठिकाणीं स्थिर होतो. म्हणून प्रणवाला धनुष्याची उपमा दिली आहे. येथील बाण म्हणजे आत्मा होय. हा हो सोपाधिक परमात्माच आहे; पण सूर्य ज्याप्रमाणें प्रकाशरूपानें उदकामध्यें प्रवेश करून प्रतिबिंबतो,त्याप्रमाणें देहामध्यें शिरतो, तोही आत्माच आहे.कारण तो आपल्या सर्व बुद्धिप्रत्ययांचा साक्षी असतो. हा लक्ष्यामधील बाणाप्रमाणें आपल्या अक्षरस्वरूपीं ब्रह्मामध्यें, आपल्यास अर्पण करून घेतो, म्हणून ब्रह्माला लक्ष्य ( वेध घेण्याचें स्थान ) म्हटलें आहे. ज्यांना आपल्या मनाला समाधिसुखाची शांति मिळवून घ्यावयाची आहे. ते आत्मबुद्धीनें ब्रह्माकडे आपलें चित्त सर्वस्व एकाग्रतेनें अर्पण करितात. असा प्रकार आहे म्हणून ब्रह्माला लक्ष्य म्हटलें. साधकानें बाह्यविषयांपासून उत्पन्न होणारी तृष्णा व मोह हीं सर्व सर्वथा टाकून देऊन, सारांश, मनोनिग्रह करून व सर्वस्वी विरक्त होऊन एकाग्रचित्तानें ब्रह्मरूपी जें लक्ष्य तेथें आपल्या आत्म्याचा नेम धरावा. हा काळजीपूर्वक धरलेला सावधान नेम सिद्ध झाला म्हणजे बाण जसा लक्ष्यांत प्रवेश करितो, त्याप्रमाणें साधकालाही ब्रह्मामध्यें प्रवेश करितां येतो. बाण आणि लक्ष्य हीं एकात्मक होतात. त्याप्रमाणें जीवात्मा आणि ब्रह्म हीं एकात्मक होतात. सारांश, सामान्य जीवाला देहादिकांचे ठिकाणीं ( अनात्मक वस्तूचे ठिकाणीं ) जो आत्मप्रत्यय ( देह हाच आत्मा आहे अशी प्रतीति ) घेत असतो, तिचा साधकाचे ठिकाणीं नाश होऊन तो अविनाशिब्रह्माशीं सायुज्यतारूपी फल प्राप्तकरून घेतो. ॥ ४ ॥

**रंगरामानुज**—‘ वेध ’= एकाग्रध्यान. ‘ तन्मय ’= भेद करणारा जो आकार त्याचें मुळींच स्मरण नसणें.

**माध्व०**—तन्मय=ब्रह्मप्रचुर, ब्रह्मलग्न. याप्रमाणें दोन, तीन, चार या तीन मंत्रांतील उपदेशानुसार श्रवणमननध्यानानें भगवंताची मात्र उपासना करावी असें श्रुतीनें ठरविलें.

---

## मंत्र पांचवा.

**यस्मिन्द्यौः पृथिवी चान्तरिक्षमोतं मनः सह प्राणैश्च सर्वैः। तमेवैकं जानथ आत्मानमन्या वाचो विमुञ्चथामृतस्यैष सेतुः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—यस्मिन् द्यौः, पृथिवी च अंतरिक्षं, सर्वैः प्राणैः सह मनः च, ओतं; तं एव एकं आत्मानं जानथ** ( ज्याच्यामध्यें स्वर्ग, पृथिवी आणि अंतरीक्ष, तसेंच सर्व प्राणांसह मन समर्पित होतें, त्या मात्र अद्वितीय आत्म्याचें ज्ञान करून ध्या. ) **अन्याः वाचः विमुञ्चथ** ( दुसऱ्या सर्व वाणी–विद्या–टाकून द्या ) **एषः अमृतस्य सेतुः** ( हा आत्मा मोक्षाचा सेतु–भवसागर उतरून जाण्याचा पूल–आहे. ) ॥ ५ ॥

अक्षरस्यैव दुर्लक्ष्यत्वात्पुनःपुनर्वचनं सुलक्षणार्थम्। यस्मिन्नक्षरे पुरुषे द्यौः पृथिवी चान्तरिक्षं चोतं समर्पितं मनश्च सह प्राणैः करणैरन्यैः सर्वैस्तमेव सर्वाश्रयमेकमद्वितीयं जानथ जानीथ हे शिष्याः। आत्मानं प्रत्यक्स्वरूपं युष्माकं सर्वप्राणिनां च ज्ञात्वा चान्या वाचोऽपरविद्यारूपा विमुञ्चथ विमुञ्चत परित्यजत। तत्प्रकाश्यं च सर्वं कर्म ससाधनम्। यतोऽमृतस्यैष सेतुरेतदात्मज्ञानममृतस्यामृतत्वस्य मोक्षस्य प्राप्तये सेतुरिव सेतुः संसारमहोदधेरुत्तरणहेतुत्वात्तथा च श्रुत्यन्तरम्—"तमेव विदित्वाऽतिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय" इति ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—याही मंत्रांत अविनाशी आत्म्याचें स्वरूप पुनः सांगितलें आहे. कारण, ब्रह्माचें ज्ञान होणें, ज्ञानाच्या कक्षेंत ब्रह्म येणें, अत्यंत दुःसाध्य वस्तु आहे. विषय अवघड आहे म्हणून पुनःपुनः तोच विषय श्रुतिमाऊली निरनिराळ्या स्वरूपांनीं सांगत आहे. हेतू हाकीं, अनेक प्रकारांनीं एकच वस्तूचें वर्णन केलें असतां अवघड वस्तूही सवघड होते. असो. श्रुति म्हणतेः ज्या अविनाशी परमात्म्यामध्यें स्वर्ग, पृथ्वी, अंतरिक्ष हे तीन लोक आणि सर्व इंद्रियांसह व प्राणांसह मन समर्पित होतें, तो सर्वांस आश्रय देणारा अद्वितीय परमात्मा मात्र, हे साधक शिष्य हो, तुम्हीं सर्वांनीं समजून घ्यावा. हा तुम्हा सर्वांचा व सर्व प्राण्यांचा प्रत्यगात्मा पूर्णपणानें समजून घ्या आणि दुसऱ्या सर्व अपरविद्यारूपी विषयांचा व त्यांचे चर्चेचा परित्याग करा. कारण त्या विद्या जीं जीं कर्में व कर्मसाधनें प्रकाशित करितात, त्या सर्व अनित्यवस्तूंस आत्म-

प्रकाशानें मात्र अस्तित्व प्राप्त होतें. असो, मोक्ष मिळविण्याला जर कांहीं एक साधन असेल तर तें एक आत्मज्ञान मात्र होय. संसाररूपी महासागरांतून पार तरून नेण्यास एक आत्मज्ञान मात्र सर्वथा समर्थ आहे. "आत्मज्ञान झालें तर मात्र मरणाची भीति नाहींशी होऊन मोक्ष मिळतो. ब्रह्मप्राप्तीला ( मोक्षप्राप्तीला ) आत्मज्ञानाशिवाय दुसरें कोणतेंही साधन नाहीं." आम्ही म्हणतों त्याला ही श्रुति प्रमाण आहे. ॥ ५ ॥

**रंगरामानुज—**सर्व वस्तूंचा समवाय करणारा ( उपादानकारण असणारा ) परमेश्वर सर्व-वस्तु-नियंता असून सर्व-व्यापक आहे, असें जाणून अनात्मविषया-संबंधानें बोलणें टाकून द्यावें, असा या मंत्रांत उपदेश केला आहे.

**माध्व०—**परमेश्वर मुक्तांचा आश्रय आहे. 'प्राण' = ज्याच्यामध्यें सर्व प्राण आणि सर्व इंद्रियें आश्रय घेऊन राहिलीं आहेत, त्या परमेश्वराचें मात्र ज्ञान करून घ्या. हे सज्जन हो ! तुम्हांस मुक्ति हवी असेल तर दुसऱ्या सर्व देवतांचीं उपासना सोडून द्या. 'अमृत' = मुक्त. परमेश्वर हा मुक्तांचा सेतु किंवा आश्रयस्थान आहे.

---

## मंत्र सहावा.

**अरा इव रथनाभौ संहता यत्र नाड्यः स एषोऽ-**
**न्तश्चरते बहुधा जायमानः । ओमित्येवं ध्यायथ**
**आत्मानं स्वस्ति वः पराय तमसः परस्तात् ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थ—रथनाभौ अराः इव यत्र नाड्यः संहताः** ( ज्याप्रमाणें चाकाच्या सर्व अरा रथाच्या तुंब्यामध्यें एकत्र होतात, त्याप्रमाणें ज्या हृदयाच्या ठिकाणीं सर्व नाड्या एकत्र होतात ) **सः एषः बहुधा जायमानः अंतः चरते** ( त्या हृदयांत वास्तव्य करून 'अनेक स्वरूपें धारण करणारा' अद्वितीय आत्मा सुखानें संचार करितो.) **ॐ इति एवं आत्मानं ध्यायथ** ( या आत्मारामाचें ओंकारस्वरूपानें ध्यान करा. ) **वः स्वस्ति** ( तुमचें कल्याण असो. ) **तमसः परस्तात् पराय** ( अज्ञान अंधःकाराच्या पलीकडे जाऊं इच्छिणारे जें तुम्हीं त्यांनीं 'ॐकार हें ब्रह्म आहे,' असें ध्यान करावें. ) ॥ ६ ॥

किंच । अरा इव । यथा रथनाभौ समर्पिता अरा एवं संहताः संप्रविष्टा यत्र यस्मिन्हृदये सर्वतो देहव्यापिन्यो नाड्यस्तस्मि-न्हृदये बुद्धिप्रत्ययसाक्षिभूतः स एष प्रकृत आत्माऽन्तर्मध्ये चरते

चरति वर्तते। पश्यञ्छृण्वन्मन्वानो विजानन्बहुधाऽनेकधा क्रोधहर्षादिप्रत्ययैर्जायमान इव जायमानोऽन्तःकरणोपाध्यनुविधायित्वाद्वदन्ति लौकिका हृष्टो जातः क्रुद्धो जात इति। तमात्मानमोमित्येवमोंकारालम्बनाः सन्तो यथोक्तकल्पनया ध्यायथ चिन्तयत। उक्तं वक्तव्यं च शिष्येभ्य आचार्येण जानता। शिष्याश्च ब्रह्मविद्याविविदिषुत्वान्निवृत्तकर्माणो मोक्षपथे प्रवृत्ताः। तेषां निर्विघ्नतया ब्रह्मप्राप्तिमाशास्त्याचार्यः। स्वस्ति निर्विघ्नमस्तु वो युष्माकं पराय परकूलाय। परस्तात्कस्मादविद्यातमसः। अविद्यारहितब्रह्मात्मस्वरूपगमनायेत्यर्थः॥ ६॥

**सिद्धान्ती**—आणखी म्हणतात. ज्याप्रमाणें रथनाभीमध्यें (तुंब्यामध्यें) चाकाच्या सर्व अरा एकत्र होतात, त्याप्रमाणें सर्व देहभर संचार करणाऱ्या नाड्या ज्या हृदयांत एकत्र होतात, त्या हृदयांत बुद्धिप्रत्ययांचा साक्षी असणारा हा प्रस्तुत विषयाचा नायक प्रत्यगात्मा, अंतर्यामीपणानें वास्तव्य करितो. आणि पाहतांना ऐकतांना, विचार करतांना, जाणतांना, अशा अनेकप्रकारांनीं उपलब्ध होतो. कधीं रागावलेला, कधीं हर्षभरित असलेला असा तो दिसतो. जणूं काय हा प्रत्येकवेळीं उत्पन्न होतोसाच दिसतो. कारण, अंतःकरणनामक उपाधीच्या द्वारानें हा प्रकट होतो. सामान्यलोक म्हणूं लागतात कीं, याला आनंद झाला आहे किंवा हा रागावला आहे. (सारांश, कधीं रागावलेला, कधीं आनंदित असलेला असा हा आत्मा सामान्य लोकांस नित्य उत्पन्न होतोसा दिसतो. एक असूनही तो अनेक असावा असा भास होतो.) असो, ह्या अद्वितीय आत्म्याचें ध्यान ओंकाराचा आश्रय घेऊन दोन ते सहा मंत्रांत सांगितल्याप्रमाणें एकाग्रचित्तानें करीत जावें, असा श्रुतीचा उपदेश आहे. हा विधि आचार्यांनें योग्य शिष्यांस सांगून त्यांस ॐकार ध्यानपर करावें. सामान्यतः खरा शिष्य तो होय कीं जो ब्रह्मविद्येचें ज्ञान व प्राप्ति करून घेण्याची तीव्र इच्छा करितो; यासाठीं कर्मापासून निवृत्त होतो; आणि मोक्षप्राप्तीसाठीं दृढ उद्योग करितो. याप्रमाणें ज्ञानी गुरु मुमुक्षुशिष्यांस वरील प्रकारचा उपदेश करून त्यांचा मार्ग निर्विघ्न व्हावा यासाठीं एकनिष्ठशिष्यांना आशिर्वाद देतात; तो असा. हे शिष्य हो! अविद्यानामक अंधकाराच्या दुसऱ्या तीराला जाऊन मोक्षप्राप्तीची इच्छा करणारे शिष्य हो! तुमच्या मार्गांत येणारी विघ्नें नाहींशी होवोत! अविद्याशून्य जें ब्रह्मात्मैक्यज्ञान तिकडे जात असतां तुमचें सदा सर्वदा कल्याण असो. ॥ ६ ॥

**रंगरामानुज**—आपला स्वभाव सोडून न देतां देवादि सर्व चराचर भूतांचें स्वरूप, आकार, गुण, कर्म, यांनीं समन्वित असणारा परमेश्वर स्वतःच्या इच्छेनें अनेक स्वरूपें धारण करितो. 'पराय' =पलीकडच्या तीरावर प्राप्त होण्यासाठीं.

**माध्व०**—हृदयांत राहणारा विष्णु एकस्वरूपानें किंवा अनेकस्वरूपानें स्वेच्छया प्रकट होतो आणि सर्वभूतांचे नियमन करितो. परमेश्वराचें ध्यान करावयाचें ते ओंकारस्वरूपानें, गुणपूर्णत्वस्वरूपानें करावें, निर्गुणत्वप्रकारानें करूं नये. 'तमः' अव्यक्त. 'पराय'=प्राप्त करून घेण्यासाठीं. 'अंतः' = इंद्रियांच्या अंतर्यामी.

---

## मंत्र सातवा.

**यः सर्वज्ञः सर्वविद्यस्यैष महिमा भुवि दिव्ये ब्रह्मपुरे ह्येष व्योम्न्यात्मा प्रतिष्ठितः। मनोमयः प्राणशरीरनेता प्रतिष्ठितोऽन्ने हृदयं संनिधाय। तद्विज्ञानेन परिपश्यन्ति धीरा आनन्दरूपममृतं यद्विभाति ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ—यः सर्वज्ञः, सर्वविद्, यस्य एषः महिमा भुवि, दिव्ये ब्रह्मपुरे, हि एषः आत्मा व्योम्नि प्रतिष्ठितः** ( जो सर्वज्ञ आहे, सर्वजाण आहे, ज्याचा महिमा ह्या लोकीं व दिव्य ब्रह्मलोकीं आहे आणि जो आत्मा अंतरिक्ष व्यापून राहिला आहे. ) **मनोमयः, प्राणशरीरनेता हृदयं संनिधाय अन्ने प्रतिष्ठितः** ( हा मनोमय असणारा, प्राणाचा व शरीराचा नायक हृदयामध्यें राहून अन्नामध्यें प्रतिष्ठित झाला आहे. ) **तद्विज्ञानेन यत् आनंदरूपं अमृतं विभाति–तत् धीराः परिपश्यंति** ( याचें ज्ञान झालें असतां जें सर्वदा आनंदरूप आहे आणि अमृतरूप असें प्रकाशत आहे, त्याचें पूर्ण दर्शन विवेकी पुरुषास होतें. ) ॥ ७ ॥

योऽसौ तमसः परस्तात्संसारमहोदधिं तीर्त्वा गन्तव्यः परविद्याविषय इति स कस्मिन्वर्तत इत्याह। यः सर्वज्ञः सर्वविद्व्याख्यातः। तं पुनर्विशिनष्टि। यस्यैष प्रसिद्धो महिमा विभूतिः। कोऽसौ महिमा। यस्येमे द्यावापृथिव्यौ शासने विधृते तिष्ठतः। सूर्याचन्द्रमसौ यस्य शासनेऽलातचक्रवदजस्रं भ्रमतः। यस्य शासने सरितः सागराश्च स्वगोचरं नातिक्रामन्ति। तथा स्थावरं जङ्गमं च यस्य शासने नियतम्। तथा चर्तवोऽयने अब्दाश्च यस्य शासनं नातिक्रामन्ति। तथा कर्तारः कर्माणि फलं च यच्छासनात्स्वंस्वं

कालं नातिवर्तन्ते स एष महिमा । भुवि लोके यस्य स एष सर्वज्ञ एवंमहिमा देवः । दिव्ये द्योतनवति सर्वबौद्धप्रत्ययकृतद्योतने ब्रह्मपुरे । ब्रह्मणोऽत्र चैतन्यस्वरूपेण नित्याभिव्यक्तत्वाद्ब्रह्मणः पुरं हृदयपुण्डरीकं तस्मिन्व्योम तस्मिन्व्योम्न्याकाशे हृत्पुण्डरीकमध्यस्थे प्रतिष्ठित इवोपलभ्यते । न ह्याकाशवत्सर्वगतस्य गतिरागतिः प्रतिष्ठा वाऽन्यथा संभवति । स ह्यात्मा तत्रस्थो मनोवृत्तिभिरेव विभाव्यत इति मनोमयो मनउपाधित्वात्प्राणशरीरनेता प्राणश्च शरीरं च प्राणशरीरं तस्यायं नेता स्थूलाच्छरीराच्छरीरान्तरं प्रति । प्रतिष्ठितोऽवस्थितोऽन्ने भुज्यमानान्नविपरिणामे प्रतिदिनमुपचीयमानेऽपचीयमाने च पिण्डरूपान्ने हृदयं बुद्धिं पुण्डरीकच्छिद्रे संनिधाय समवस्थाप्य । हृदयावस्थानमेव ह्यात्मनः स्थितिर्न ह्यात्मनः स्थितिरन्ने । तदात्मतत्त्वं विज्ञानेन विशिष्टेन शास्त्राचार्योपदेशजनितेन ज्ञानेन शमदमध्यानसर्वत्यागवैराग्योद्भूतेन परिपश्यन्ति सर्वतः पूर्णं पश्यन्त्युपलभन्ते धीरा विवेकिनः । आनन्दरूपं सर्वानर्थदुःखायासप्रहीणममृतं यद्विभाति विशेषेण स्वात्मन्येव भाति सर्वदा ॥ ७ ॥

**सिद्धान्ती**—अत्यंत अंधःकाराच्या पलीकडे असणारा व सर्व संसारसागर तरून जाऊन मग प्राप्ति करून घेण्यास योग्यअसणारा असा जो परमात्मा ब्रह्मविद्येचा विषय आहे तो कोठें असतो? असें विचाराल तर सांगतों ऐका:-जो सर्वज्ञ (सामान्य ज्ञानी) आणि सर्व-वेत्ता (विशेष ज्ञानी) आहे, असें मागें एका मंत्रांत सांगितलें आहे, त्याचेंच विशेष वर्णन येथें केलें आहे. श्रुति म्हणतेः याचा महिमा सर्व-प्रसिद्ध आहे. तो कसा तो पहा; ज्याच्या आज्ञेनुसार मात्र स्वर्ग आणि पृथ्वी आपापल्या स्थानीं स्वव्यापार करीत राहतात; ज्याच्या आज्ञेनें सूर्यचंद्र हे वाटोळे फिरणाऱ्या अलातचक्राप्रमाणें दिङ्मंडलांत अखंड गरगर भ्रमण करीत असतात; ज्याच्या सत्तेमुळें नद्या आणि समुद्र आपआपल्यास दिलेल्या प्रांतमर्यादांचे अतिक्रमण न करितां स्वनियत व्यापार करितात; त्याचप्रमाणें स्थावर-जंगम सर्व पदार्थ ज्यानें घालून दिलेल्या नियमांप्रमाणें मात्र चालतात; तसेंच ऋतु, अयनें आणि वर्षें ज्याच्या सत्तेचें उल्लंघन केव्हांही करीत नाहींत; त्याचप्रमाणें कर्म करणारे कर्ते, कर्में आणि कर्मफलें ज्याच्या शासनानुसार त्या त्या कालीं आपापला व्यापार बिनचुक रीतीनें करितात; त्या विश्वनियंत्या परमात्म्याच्या महिम्याचें वर्णन काय करावें? भूलोकावर त्या सर्वज्ञ पुरुषाचें दिसणारें हें माहात्म्य केवळ अवर्णनीय आहे. तसेंच अति तेजस्वी आणि प्रत्येक बुद्धि-प्रत्ययाच्या द्वारानें उपलब्ध होणारें जें ब्रह्मपुर त्यांत हा प्रतिष्ठित झाल्यासारखा

दिसतो. ब्रह्मपुर म्हणजे हृदय–कमल होय. ब्रह्म हें चैतन्यस्वरूपानें हृदयकमलांत नित्य प्रकट होत असतें म्हणून हृदयकमलाला ब्रह्मपुर असें म्हणतात. त्यामध्यें जें आकाश आहे, त्यांत, सारांश, हृदयकमलाच्या मध्यभागीं जें दहराकाश आहे, त्यांत ब्रह्म प्रतिष्ठित झालें आहे, असा भास होतो. भास होतो हें म्हणण्याचें कारण असें आहे कीं, आकाशाप्रमाणें सर्वगामी असणाऱ्या ब्रह्माला जाणें येणें आहे, किंवा राहण्याचें स्थान आहे असें म्हणणें केव्हांही मुख्यत्वानें म्हणतां येत नाहीं. म्हणून येथें लक्षणेचा आश्रय करावा लागतो आणि ब्रह्म प्रतिष्ठित होऊन उपलब्ध झाले असा भास होतो, असें म्हणावें लागतें.

असो, हा परमात्मा हृदयकमलांत राहून मनाच्या वृत्तींनीं मात्र प्रकाशित होतो म्हणून त्याला मनोमय असें म्हटलें आहे. या मनाच्या उपाधीनें तो मनोमय होतो. तो प्राणाचा आणि शरीराचा नियंता आहे व तो या उभयतांचा प्राण–शरीरांचा स्थूल शरीरापासून सूक्ष्मादि शरीरांत प्रवेश करवितो. त्याचप्रमाणें जीव ज्या अन्नाचा उपभोग घेतात त्या अन्नाच्या परिपाकामध्येंही अवस्थित असतो; म्हणजे रोजच्या रोज जीवांच्या पिंडस्वरूपांत भोगानें जी वृद्धि किंवा रोगानें जो क्षय होत असतो त्यांमध्यें राहतो; तो असा कीं, हृदयकमलाच्या अवकाशांत बुद्धीला ठेऊन मात्र तद्द्वारां आपण तेथें स्थित होतो. कारण, हृदयामध्यें प्रकटणें हीच आत्म्याची स्थिति आहे, अन्नामध्यें राहणें हें या आत्म्याला संभवत नाहीं. असो, वर सांगितल्याप्रमाणें ज्याचें माहात्म्य आहे; जो मनोमय प्राण शरीरांचा नायक आणि हृदयनिवासी परमात्मा अन्नाची व्यवस्था करितो, त्याचें स्वरूप ज्या साधकाला ज्ञातविज्ञात झालें म्हणजे शास्त्राध्ययनानें व आचार्यांच्या उपदेशानें परोक्षज्ञान उत्पन्न होऊन त्या साधकाला शम, दम, ध्यान, विषयवैराग्य यांच्या साहाय्यानें परमात्म्याचें विशेषज्ञान उत्पन्न होतें, हे धन्य साधक पूर्णस्वरूपाचा साक्षात्कार करून घेण्यास सर्वथा समर्थ होतात. हेच खरे विवेकी साधक होत. यांस झालेलें परमात्मदर्शन सर्वथा आनंदरूप आहे. मग सहजच येथें सर्व अनर्थ, सर्व दुःखें आणि सर्व आयास शून्यस्वरूप होतात. हेंच अमृतस्वरूप होय. हें आत्मरूप आपल्या स्वयंप्रकाशानें सर्वदा स्वस्वरूपीं प्रकाशित होत असतें. अशा स्वरूपाचें ज्ञान–विज्ञान विवेकी पुरुषास होतें. आत्मा व ब्रह्म एकरूप आणि एकच आहेत, असा साक्षात्कार विवेकी पुरुषांस होतो, म्हणून ते धन्य होत. ॥ ७ ॥

**रंगरामानुज**—'ब्रह्मपुर'=वैकुंठलोक. 'दिव्य' याचा संबंध 'व्योम्नि' या पदाकडे आहे. 'प्राणशरीरनेता'=जीवांस प्राण आणि शरीर प्राप्त करून देणारा, किंवा प्राण हेंच ज्याचें शरीर आहे, असा सर्व–स्वामी परमेश्वर. 'नेता'=स्वामी. 'अन्ने'=अन्नापासून उत्पन्न होणारें शरीरांत. 'विज्ञान'=परमेश्वराच्या यथार्थ स्वरूपाची ध्यानरूप उपासना.

**माध्व०**—'सर्वविद्'=सर्व मिळविणारा, आप्तकाम (पूर्णकाम). 'ब्रह्मपुर'=देह 'मनोमय'=मनःप्रेरक. 'अन्न'=मर्त्य. भगवान् हा हृदयाकाशांतील जीवस्वरूपांत

राहतो. ( जीवांच्या अंतर्यामी राहतो). 'धीर'=श्रवणमननपूर्ण. 'अमृत' स्वरूपानें व देहानें नाश न पावणारा. 'विभाति'=स्वयंप्रकाश असतो. सारांश, सर्वज्ञ आणि पूर्णकाम परमेश्वर देहांतील हृदयाकाशांत प्रतिष्ठित झाला आहे. हा मनःप्रेरक आणि प्राणशरीरनियंता असून हृदयाच्या आश्रयानें असणाऱ्या जीवाच्या अंतर्यामी राहतो. श्रवणमननपूर्ण उपासक या आनंदाकारविशिष्ट, सर्वथा अविनाशी, स्वयंप्रकाश आणि नित्य प्रकट असणाऱ्या परमेश्वराचें आनंदरूप दर्शन घेतात. यांना ध्यानामध्यें ब्रह्मसाक्षात्कार होतो.

---

## मंत्र आठवा.

**भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः ।**
**क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ—तस्मिन् परावरे दृष्टे** ( त्या परावर—सगुण निर्गुण—ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां ) **हृदयग्रंथिः भिद्यते, सर्वसंशयाः छिद्यंते च अस्य कर्माणि क्षीयंते** ( हृदय—ग्रंथीचा विनाश होतो, सर्व संशयाचा उच्छेद होतो आणि साधकाच्या सर्वकर्मांचा क्षय होतो.) ॥८॥

अस्य परमात्मज्ञानस्य फलमिदमभिधीयते। भिद्यते हृदयग्रन्थिरविद्यावासनाप्रचयो बुद्ध्याश्रयः कामः "कामा येऽस्य हृदि श्रिताः" इति श्रुत्यन्तरात्। हृदयाश्रयोऽसौ नाऽऽत्माश्रयः। भिद्यते भेदं विनाशमायाति। छिद्यन्ते सर्वज्ञेयविषयाः संशया लौकिकानामामरणात्तु गङ्गास्रोतोवत्प्रवृत्ता विच्छेदमायान्ति। अस्य विच्छिन्नसंशयस्य निवृत्ताविद्यस्य यानि विज्ञानोत्पत्तेः प्राक्तनानि जन्मान्तरे चाप्रवृत्तफलानि ज्ञानोत्पत्तिसहभावीनि च क्षीयन्ते कर्माणि। न त्वेतज्जन्मारम्भकाणि प्रवृत्तफलत्वात्तस्मिन्सर्वज्ञेऽसंसारिणि परावरे परं च कारणात्मनाऽवरं च कार्यात्मना तस्मिन्परावरे साक्षादहमस्मीति दृष्टे संसारकारणोच्छेदान्मुच्यत इत्यर्थः॥ ८॥

**सिद्धान्ती**—या मंत्रांत परमात्मज्ञान झालें असतां कोणत्या फलांची प्राप्ति होते हें सांगितलें आहे. श्रुति म्हणतेः परावर परब्रह्माचें ज्ञान झालें असतां हृदयग्रंथि म्हणजे अज्ञानानें उत्पन्न झालेल्या वासनांचा प्रचय ( गट्ठा ) फुटून जातो. वासना म्हणजे काम. हा बुद्धीचा आश्रय करून राहतो. "साधकाच्या हृदयाचा आश्रय करून ज्या वासना तेथें राहतात" ही अन्यश्रुति स्पष्ट सांगते कीं वासना हृदयाच्या ( बुद्धीच्या )

आश्रयानें राहतात, आत्म्याच्या आश्रयानें राहत नाहींत. असो, या वासनांचा नाश होतो. तसेंच जे जे म्हणून जाणण्यासारखे व्यावहारिक व पारमार्थिक ज्ञानविषय आहेत, त्यांच्या संबंधानें सर्व प्रकारचे संशय विच्छिन्न होतात. काय सांगावें! या ज्ञेय–विषयासंबंधाचे अनंत संशय गंगाप्रवाहाप्रमाणें अखंड विद्यमान असतात आणि ते मरणापर्यंत अज्ञानी जीवांस सोडीत नाहींत. पण या सर्व–संशयांचा परमात्म–ज्ञानानें मात्र नाश होतो. याप्रमाणें सर्व संशयांचे निरसन होऊन ज्याची अविद्या सर्वथा निवृत्त झाली, अथवा अविद्या नष्ट झाल्यामुळें सर्व संशय निरस्त झाले, त्या साधकाचा पूर्वजन्मार्जित कर्मसंचय सर्वथा नाहींसा होतो. हा कर्मसंचय म्हणजे ज्याच्या फलोत्पत्तीला अद्यापि प्रारंभ झाला नाहीं, अशीं ज्ञानोपत्तीच्या पूर्वींचीं कर्में होत. ज्ञान उत्पन्न होत असतांही उत्पन्न होणारीं कर्में वरील वर्गांत येतात, पण ज्ञान झाल्याबरोबर त्यांचाही क्षय होतो. सारांश पूर्वसंचिताचा नाश होतो. आतां, ज्या कर्मांच्या फलांनीं साधकाला जन्म प्राप्त झाला, तीं फलपरिपक्व झालेलीं कर्में (प्रारब्धकर्में) क्षीण होत नाहींत, कारण त्यांचा नाश भोगानें मात्र व्हावयाचा असतो. तात्पर्य, प्रारब्धकर्मांशिवाय बाकीच्या सर्व पूर्वसंचिताचा नाश होतो. केव्हां? जेव्हां सर्वज्ञ व सर्वसंसार–शून्य असें जें श्रेष्ठ कारण ब्रह्म (परब्रह्म) व अवर जें कार्यब्रह्म (सगुणब्रह्म) त्याचा साक्षात्कार झाला, मी ब्रह्म आहे असा निश्चय झाला म्हणजे सर्व संसारकारणांचा, अविद्यादिकांचा उच्छेद होऊन हा ज्ञानविज्ञानी साधक सर्वथा मुक्त होतो. ॥ ८ ॥

**रंगरामानुज**—'हृदय' याचा जीव असाही एक अर्थ आहे. कर्मांचा नाश होणें, म्हणजे फल उत्पन्न करण्याची जी कर्मांची शक्ति ती नाहींशी करणें. 'परावर'= दुसरे सर्व पदार्थ ज्या पर (श्रेष्ठ) ब्रह्मापेक्षां अवर, कनिष्ठ, आहेत. किंवा श्रेष्ठकनिष्ठ वस्तु ज्या परमेश्वराचें शरीर असून परमेश्वर ज्यांचा आत्मा म्हणजे नियंता आहे. दृष्ट होणें म्हणजे परमेश्वराच्या यथार्थ स्वरूपाचें ज्ञानानें परमेश्वराला ज्ञानविषय करणें. साक्षात्कार होत असतां (यथार्थ स्वरूपाची उपासना करण्यास आरंभ होत असतां) प्रसन्न झालेला परमेश्वर 'जीवाची पुण्यपापादि सर्व कर्में नाहींशी करीन' असा संकल्प करीत असतो.

**माध्व०**—'परावर'=पर म्हणजे श्रेष्ठ रमाब्रह्मदेवादि. तेही ज्याच्याहून अवर म्हणजे कनिष्ठ आहेत. 'हृदय'=जीव आणि विष्णु. 'ग्रंथि'=बंधक. अर्थातच हृदयग्रंथी म्हणजे विष्णुपासून जीवाला एकीकडे काढणारी अविद्या. (हीच सत्त्वादिगुणाविशिष्ट मूलप्रकृती होय) या अविद्येचा भेद होतो, म्हणजे स्वरूपनाश होतो. श्रवणानें अविद्या शिथिल होते आणि अपरोक्षज्ञानानें तिचा ध्वंस होतो. संशय म्हणजे बंध हे अनेक आहेतः जसें लिंगदेहबंध, कामक्रोधादि बंध, कर्मबंध, इत्यादि होत. परमेश्वरच या सर्वबंधांचा निरास करितो.

---

## मंत्र नववा.

**हिरण्मये परे कोशे विरजं ब्रह्म निष्कलम्।**
**तच्छुभ्रं ज्योतिषां ज्योतिस्तद्यदात्मविदो विदुः ॥९॥**

अन्वय व अर्थ—यत् आत्मविदः विदुः ( आत्मवेत्त्यांस ज्याचें ज्ञान असतें ) तत् हिरण्मये परे कोशे विरजं निष्कलं ब्रह्म, तत् शुभ्रं, तत् ज्योतिषां ज्योतिः ( तें हिरण्मय, श्रेष्ठ कोशांत राहणारें, निर्मल आणि निरुपाधिक वस्तु ब्रह्म होय; तें अत्यंत शुद्ध आहे आणि तें सर्वप्रकाशक वस्तूंचे प्रकाशक आहे. ) ॥ ९ ॥

उक्तस्यैवार्थस्य संक्षेपाभिधायका उत्तरे मन्त्रास्त्रयोऽपि हिरण्मये ज्योतिर्मये बुद्धिविज्ञानप्रकाशे परे कोशे कोश इवासेः। आत्मस्वरूपोपलब्धिस्थानत्वात्परं तत्सर्वाभ्यन्तरत्वात्तस्मिन्विरजमविद्याद्यशेषदोषरजोमलवर्जितं ब्रह्म सर्वमहत्त्वात्सर्वात्मत्वाच्च निष्कलं निर्गताः कला यस्मात्तन्निष्कलं निरवयवमित्यर्थः। यस्माद्विरजं निष्कलं चातस्तच्छुभ्रं शुद्धं ज्योतिषां सर्वप्रकाशात्मनामग्न्यादीनामपि तज्ज्योतिरवभासकम्। अग्न्यादीनामपि ज्योतिष्ट्वमन्तर्गतब्रह्मात्मचैतन्यज्योतिर्निमित्तमित्यर्थः। तद्धि परं ज्योतिर्यदन्यानवभास्यमात्मज्योतिस्तद्यदात्मविद आत्मानं स्वं शब्दादिविषयबुद्धिप्रत्ययसाक्षिणं ये विवेकिनो विदुर्विजानन्ति त आत्मविदस्तद्विदुरात्मप्रत्ययानुसारिणः। यस्मात्परं ज्योतिस्तस्मात्त एव तद्विदुर्नेतरे बाह्यार्थप्रत्ययानुसारिणः॥९॥

**सिद्धान्तो**—मागील मंत्रांत जो अर्थ विस्तारानें सांगितला त्याचें संक्षेपानें वर्णन करणारे हे पुढील तिन्ही मंत्र आहेत. पहा : हिरण्मय म्हणजे तेजस्वी अथवा बुद्धीचे विज्ञानद्वारा प्रकाशित होणारा जो विज्ञानमय नामक सर्वश्रेष्ठ कोश त्या कोशांत ब्रह्माचें वास्तव्य असतें. तरवारीला जशी म्यान हें वसतिस्थान असतें, तसें ब्रह्माला हें स्थान असतें. विज्ञानमयनामक श्रेष्ठ कोश असतो. या विज्ञानमय कोशांतच आत्मस्वरूपाची उपलब्धि होते, म्हणून. विज्ञानमय कोश श्रेष्ठ आहे. शिवाय, तो सर्वकोशांच्या अंतर्यामीं असतो म्हणूनही श्रेष्ठ आहे. असो, या कोशांत हें विरजब्रह्म प्रकट होतें. अविद्यादि सर्व दोष, सर्व मल, ब्रह्माच्या स्वरूपांत केव्हांही वास्तव्य करीत नाहींत, म्हणून ब्रह्माला विरज ( कामक्रोधादिविकारशून्य व वासनाशून्य आहे म्हणून निर्मळ ) म्हटलें. हें ब्रह्म महतांहून मोठें व

सर्वात्मक ( सर्व-नियामक ) आहे, म्हणून ही हें आत्मतत्त्व निष्कल आहे. हें निष्कल म्हणजे निरवयव आहे. येथें कलांचा अथवा भागप्रभागांचा संभव असत नाहीं, म्हणून तें निष्कल अथवा अवयवशून्य असतें. येथें सर्व कला ( अवयव ) अस्तंगत होतात. ब्रह्म निर्मळ आणि निरवयव आहे म्हणून तें शुद्ध आहे. तें अग्नि, सूर्य, चंद्रादि सर्वप्रकाशक तेजस्वी गोलांचें प्रकाशक आहे. तें तेजांचें तेज आहे. कारण अग्नि सूर्यादिकांचें तेज सुद्धां अग्न्यादिकांत नियामकत्वानें अंतर्यामी असणाऱ्या ब्रह्मात्मचैतन्याच्या ज्योतिर्निमित्तानें निर्माण झालेलें असतें. ब्रम्हतेज ( आत्मतेज ) हें सर्व तेजांहून श्रेष्ठ आहे म्हणून ब्रम्हतेजाला प्रकाशित करणारें दुसरें कोणतेंही तेज नाहीं. असो, असें हें निर्मळ, निरवयव व अत्यंत तेजस्वी ब्रम्ह ज्या विवेकीपुरुषांना समजून उमजलें, शब्द-स्पर्श-रूपादि विषय ज्या बुद्धीला प्रतीत होतात, त्या जीवबुद्धीचा नित्य साक्षी असणारा जो प्रत्यगात्मा तो स्पष्ट समजला व अनुभवाला आला, ज्या विवेकी आत्मवेत्त्यांना ब्रह्मस्वरूपाचें असें ज्ञान झालें व आत्मप्रत्यय घेऊन 'मी तें ब्रह्म आहें' असें ज्यांनीं ह्या सर्वश्रेष्ठ आत्मज्योतीचें साक्षात् दर्शन घेतलें, त्यांना मात्र ब्रह्मज्ञानविज्ञान होतें, इतरांना होत नाहीं. कारण, इतर लोक बाह्यविषयाच्या प्रत्ययाचे अनुसारी असतात व यांचें ज्ञान बाह्यप्रत्ययात्मक असतें पण आत्मवेत्त्याचें ज्ञानविज्ञान आत्मप्रत्ययाचें असतें. म्हणून इतरांना आत्मज्ञान होत नाहीं. व आत्मवेत्त्यांस होतें. ॥ ९ ॥

**रंगरामा०**—' हिरण्मय '=स्वयंप्रकाश अथवा सर्वांगसुंदर, यांस (या आचार्यांस) या मंत्रांत ' पुरे कोशे ' असा ही एक पाठ उपलब्ध होता ' पर '=उत्कृष्ट. ' विरज '= सत्त्वरजतमाहून पलीकडे असणारें. ' ज्योतिः '=इंद्रियें. यावरून यांच्या मतें परमेश्वरांस शरीर आहे असें स्पष्ट होतें.

**माध्व०**—हिरण्मय=ब्रह्मांडाच्या मध्यें असून सूर्यमंडळांत तपश्चर्या करणारा. याचा कोश हिरण्यमय कोश होय. या मंत्रांत सवितृमंडलमध्यवर्ती नारायणाचें ध्यान सांगितलें आहे. यालाच शिंशुमार म्हणतात. याला नमस्कार करून पुढें वैकुंठ लोकांत मुक्त लोक जातात.

---

## मंत्र दहावा.

**न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः । तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थ**—तत्र सूर्यः न भाति, न चंद्रतारकं, न इमाः विद्युतः भांति, अयं अग्निः कुतः ? ( तेथें—ब्रह्मस्वरूपांत—सूर्य प्रका-

शत नाहीं, चंद्र, तारे प्रकाशत नाहींत, विद्युत्प्रकाश तेथें असणें शक्य नाहीं, मग अग्नीची गोष्ट कशाला बोलावी ?) **तं एव भान्तं सर्वं अनुभाति, तस्य भासा इदं सर्वं विभाति** (तो परमात्मा प्रकाशित झाला म्हणजे मात्र हें सर्व त्याच्या मागून प्रकाशित होतें. त्याच्या मात्र तेजानें हें सर्व तेजस्वी होतें.) ॥ १० ॥

कथं तज्ज्योतिषां ज्योतिरित्युच्यते। न तत्र तस्मिन्स्वात्मभूते ब्रह्मणि सर्वावभासकोऽपि सूर्यो भाति। तद्ब्रह्म न प्रकाशयतीत्यर्थः। स हि तस्यैव भासा सर्वमन्यदनात्मजातं प्रकाशयतीत्यर्थः। न तु तस्य स्वतः प्रकाशनसामर्थ्यम्। तथा न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निरस्मद्गोचरः। किं बहुना। यदिदं जगद्भाति तत्तमेव परमेश्वरं स्वतो भारूपत्वाद्भान्तं दीप्यमानमनुभात्यनुदीप्यते। यथा जलोल्मुकाद्यग्निसंयोगादग्निं दहन्तमनुदहति न स्वतस्तद्वत्तस्यैव भासा दीप्त्या सर्वमिदं सूर्यादि जगद्विभाति। यत एवं तदेव ब्रह्म भाति च विभाति च कार्यगतेन विविधेन भासाऽतस्तस्य ब्रह्मणो भारूपत्वं स्वतोऽवगम्यते। न हि स्वतोऽविद्यमानं भासनमन्यस्य कर्तुं शक्नोति। घटादीनामन्यावभासकत्वादर्शनाद्भारूपाणां चाऽऽदित्यादीनां तद्दर्शनात् ॥ १० ॥

**सिद्धान्ती**—हें ब्रह्म तेजस्वी गोलांचेंही प्रकाशक आहे. हें कशावरून ? अशी शंका घेणेंही योग्य नाहीं. कारण, त्या आत्मस्वरूपी व स्वयंप्रकाश ब्रह्माचे ठिकाणीं सर्व-प्रकाशक सूर्यालाही आपला प्रकाश पाडितां येत नाहीं. ब्रह्म प्रकाशित करण्याचें सामर्थ्य सूर्याला नाहीं. इतकेंच नव्हे, तर ब्रह्मप्रकाशानें मात्र सर्व इतर अनात्म वस्तु सूर्याला प्रकाशित करतां येतात; हें तात्पर्य आहे. सूर्याला किंवा कोणाही अनात्म वस्तूला प्रकाशनाचें स्वतःसामर्थ्य नाहीं. असो, याचप्रमाणें हा चंद्र, हे तारे, ह्या विजा, यांचेंही तेजानें ब्रह्म प्रकाशित होत नाहीं. मग जीवांना गोचर होणाऱ्या अग्नीची गोष्ट काय सांगावयाची आहे ? जेथें दिव्य व अंतरिक्षस्थ तेजें लटकीं पडतात, तेथें भूलोकावरील अग्नीचा कांहीं उपयोग होईल असें मानणें शक्यच नाहीं. किंबहुना, या जगांत जी जी म्हणून प्रकाशक वस्तु आहे ती ती वस्तु स्वयंप्रकाश परमेश्वर स्वतःच्या तेजोरूपानें प्रकाशित असतो म्हणून व त्यापासून प्रकाश घेतें म्हणून प्रकाशित होत असते. प्रकाशक व सर्वदाहक अग्नीशीं संयोग झाल्यानंतर मात्र जल, उल्मुका (मशाली) इत्यादि प्रकाशित होऊन दाह करण्यास किंवा प्रकाशण्यास समर्थ होतात, त्या केवळ अग्नीच्या दहन-प्रकाशन-सामर्थ्यानें मात्र होतात; स्वतः

त्यांस प्रकाश नाहीं किंवा दहनसामर्थ्यही नाहीं. त्याप्रमाणें ब्रह्माच्या प्रकाशानें मात्र हें सर्व सूर्यादि विश्व प्रकाशित होतें आणि सूर्यादि तेजोगोल विषयप्रकाशक होतात. असें आहे म्हणून तें ब्रह्म ( आत्मा ) स्वयंप्रकाश आहे असें सिद्ध होतें. तेंच ब्रह्म स्वतः स्वकार्यांमध्यें प्रवेश करून अनेकरूपांनीं प्रकाशित होत असतें. म्हणून त्या ब्रह्माचें तेजस्वरूप स्वयंभु आहे, असें समजतें. खरेंच आहे. जेथें स्वतःलाच मुळांत प्रकाशन-सामर्थ्य नाहीं, तेथें दुसऱ्यास प्रकाशनसामर्थ्य देणें ही केवळ अशक्य गोष्ट आहे. येथेंच घटादि अप्रकाशक पदार्थ पटादिकांस प्रकाशित करूं शकत नाहींत आणि सूर्यादि तेजस्वी गोल इतरांस प्रकाशित करितात ह्याचा अनुभव आपल्यास नित्य आहेच. असो; यावरून इतर पदार्थ प्रकाशित करण्याचें व कांहीं पदार्थांस प्रकाशकत्व देण्याचें सामर्थ्य स्वयंप्रकाश ब्रह्माला (आत्म्याला) मात्र असतें हें स्पष्ट आहे. ॥ १० ॥

रंग०—या मंत्राचा अर्थ या आचार्यांनीं कठोपनिषदांत स्पष्ट केला आहे तो अवश्य पहावा.

---

## मंत्र अकरावा.

**ब्रह्मैवेदममृतं पुरस्ताद्ब्रह्म पश्चाद्ब्रह्म दक्षिणतश्चो-त्तरेण । अधश्चोर्ध्वं च प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् ॥ ११ ॥**

**इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषदि द्वितीयमुण्डके द्वितीयः खण्डः ॥ २ ॥**

**इत्यथर्ववेदीयमुण्डकोपानिषदि द्वितीयमुण्डकं समाप्तम् ॥२॥**

अन्वय व अर्थ—**इदं अमृतं ब्रह्म एव पुरस्तात्, ब्रह्म पश्चात्, ब्रह्म दक्षिणतः च उत्तरेण, अधः च ऊर्ध्वं च इदं प्रसृतं, ब्रह्म एव इदं विश्वं, इदं वरिष्ठं** ( हें अमृतब्रह्म आपल्या पुढें म्हणजे पूर्वेकडेस आहे; पाठीमागें म्हणजे पश्चिमेस आहे; उजव्या हातास म्हणजे दक्षिणेस आहे; तसेंच डाव्या हातास म्हणजे उत्तरेस आहे; खालीं आहे, वर आहे, हें ब्रह्म सर्वत्र पसरलेलें आहे, हें विश्व ब्रह्मच आहे, हेंच सर्व श्रेष्ठ आहे. ) ॥ ११ ॥

यत्तज्ज्योतिषां ज्योतिर्ब्रह्म तदेव सत्यं सर्वं तद्विकारं वाचारम्भणं विकारो नामधेयमात्रमनृतमितरादित्येतमर्थं विस्तरेण हेतुतः प्रतिपादितं निगमनस्थानीयेन मन्त्रेण पुनरुपसंहरति । ब्रह्मैवोक्तलक्षणमिदं

यत्पुरस्तादग्रे ब्रह्मैवाविद्यादृष्टीनां प्रत्यवभासमानं तथा पश्चाद्ब्रह्म तथा दक्षिणतश्च तथोत्तरेण तथैवाधस्तादूर्ध्वं च सर्वतोऽन्यदिव कार्याकारेण प्रसृतं प्रगतं नामरूपवदवभासमानम्। किं बहुना ब्रह्मैवेदं विश्वं समस्तमिदं जगद्वरिष्ठं वरतमम्। अब्रह्मप्रत्ययः सर्वोऽविद्यामात्रो रज्ज्वामिव सर्पप्रत्ययः। ब्रह्मैवैकं परमार्थसत्यमिति वेदानुशासनम्॥ ११॥

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषद्भाष्ये द्वितीयमुण्डके द्वितीयः खण्डः॥ २॥

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषद्भाष्ये द्वितीयं मुण्डकं समाप्तम्॥ २॥

**सिद्धान्ती—**जें ब्रम्ह तेजोगोलांचें तेज आहे, तें मात्र सत्य वस्तु आहे. सर्व दृश्यमान विश्व त्याचेच विकार असून ते नामरूप मात्र आहेत. ब्रह्मेत्तर सर्व असत्य आहे, इत्यादि अर्थ मागें विस्तरतः सांगितला आहे व या अर्थाच्या सत्यतेचीं कारणें हीं तेथें दिलीं आहेत. येथें या मंत्रांत केवळ सिद्धांतस्वरूपानें मात्र (मागील विषयाचा) उपसंहार केला आहे. सारांश, या मंत्रांत सिद्धांतच सांगितला आहे. ज्याचें लक्षण पूर्वीं सांगितलें तेंच ब्रह्म हें सर्व आहे. अज्ञानीदृष्टीला ज्या जगताचा आभास होतो, तें पुढें दिसणारें, पाठीमागें असणारें, दक्षिणेकडील व उत्तरेकडील जगत्, ऊर्ध्वदिशेस व अधोदिशेस असणारें जगत्, सर्व दाहीदिशांतील सर्व पदार्थ ब्रह्मच होत. हें दुसरेंसें दिसणारें जगत् कार्यरूपानें आविर्भूत झालें, पण वस्तुतः ब्रह्म होय. हें विस्तार पावलेलें कार्य ब्रह्म नामरूपात्मक मात्र असून दृश्य होतें खरें. पण अधिक न सांगतां आम्ही इतकेंच म्हणतों कीं हें सर्व स्वरूपतः ब्रह्मच आहे. ब्रह्म हें सत्य आहे म्हणून सर्वश्रेष्ठ आहे. आतां जेथें ब्रह्माचा प्रत्यय साक्षात् येत नाहीं, तो तो पदार्थ अज्ञानी अविद्येचा असतो आणि या अज्ञानामुळें रज्जूचे ठिकाणीं सर्प दिसतो, सर्प–प्रत्यय येतो. किंवा अविनाशिब्रह्माचें ठिकाणीं विनाशी नामरूपात्मक जगताचा आभास होतो, याचें कारण अविद्यात्मक नामरूपें आहेत, हें होय. सारांश, तात्पर्य हें आहे कीं ब्रह्म ही परमार्थतः सत्य वस्तु आहे, इतरत्र अपरमार्थ सत्य म्हणजे अविद्या आहे. असो; एक अद्वितीय ब्रह्म मात्र सत्य वस्तु आहे, असें वेदाचें मुख्य सांगणें आहे. हाच निश्चित सिद्धांत या मुंडकांत संक्षेपेंविस्तारानें सांगितला आहे. ॥११॥

**रंगरामानुज—**' वरिष्ठ ' = वरण्यास, स्वीकृत करण्यास योग्य.

**माध्व०—**'हें विश्व ब्रह्म आहे ' हा सत्याचा भाग नाहीं, असत्प्रलाप आहे. ब्रह्म हें विश्व आहे असें खरें तात्पर्य आहे, ब्रह्म हें सर्वोत्तम आहे. या मंत्रांतील ' इदं ' शब्द ब्रह्मपर आहे, विश्वपर नाहीं. या ब्रह्मानें सर्व कालप्रदेश, देशप्रदेश आणि गुणप्रदेश व्यापून टाकले आहेत. म्हणून विश्वाहून अत्यंत श्रेष्ठ असणाऱ्या ब्रह्माला विश्व या एकदेशीनामानें संबोधितां यावयाचें नाहीं.

मुण्डकोपनिषद् द्वितीय खण्ड समाप्तः.

**द्वितीयमुण्डक समाप्त झालें.**

---

# तृतीय-मुंडक।

## खंड पहिलें.

### मंत्र पहिला.

**द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते। तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ--**द्वा सुपर्णा सयुजा सखाया**-**द्वौ सुपर्णौ सयुजौ, सखायौ**-**समानं वृक्षं परिषस्वजाते** ( दोन सुंदर पक्ष असणारे सहोदर पक्षीरूपी स्नेही एकाच वृक्षावर आश्रय घेऊन राहिले आहेत, एकाच वृक्षाचा त्यांनीं आश्रय केला आहे. ) **तयोः अन्यः स्वादु पिप्पलं अत्ति** ( त्या पैकीं एकजण ' गोड गोड ' अशा फलाचा उपभोग घेतो. ) **अन्यः अनश्नन् अभिचाकशीति** ( आणि दुसरा कोणताही उपभोग न घेतां साक्षीरूपानें असतो. ) ॥ १ ॥

परा विद्योक्ता यया तदक्षरं पुरुषाख्यं सत्यमधिगम्यते। यदधिगमे हृदयग्रन्थ्यादिसंसारकारणस्याऽऽत्यन्तिकविनाशः स्यात्। तद्दर्शनोपायश्च योगो धनुराद्युपादानकल्पनयोक्तः। अथेदानीं तत्सहकारीणि सत्यादिसाधनानि वक्तव्यानीति तदर्थमुत्तरारम्भः। प्राधान्येन तत्त्वनिर्धारणं च प्रकारान्तरेण क्रियते। अत्यन्तदुरवगाह्यत्वात्कृतमपि तत्र सूत्रभूतो मन्त्रः परमार्थवस्त्ववधारणार्थमुपन्यस्यते द्वा द्वौ सुपर्णा सुपर्णौ शोभनपतनौ सुपर्णौ पक्षिसामान्याद्वा सुपर्णौ सयुजा सयुजौ सहैव सर्वदा युक्तौ सखाया सखायौ समानाख्यानौ समानाभिव्यक्तिकारणावेवंभूतौ सन्तौ समानमविशेषमुपलब्ध्यधिष्ठानतयैकं वृक्षं वृक्षमिवोच्छेदनसामान्याच्छरीरं वृक्षं परिषस्वजाते परिष्वक्तवन्तौ। सुपर्णाविवैकं वृक्षं फलोपभोगार्थम्। अयं हि वृक्ष ऊर्ध्वमूलोऽवाक्शाखोऽश्वत्थोऽव्यक्तमूलप्रभवः क्षेत्रसंज्ञकः सर्वप्राणि-

कर्मफलाश्रयस्तं परिष्वक्तौ सुपर्णाविवाविद्याकामकर्मवासनाश्रयलिङ्गोपाध्यात्मेश्वरौ। तयोः परिष्वक्तयोरन्य एकः क्षेत्रज्ञो लिङ्गोपाधिवृक्षमाश्रितः पिप्पलं कर्मनिष्पन्नं सुखदुःखलक्षणं फलं स्वाद्वनेकविचित्रवेदनास्वादरूपं स्वाद्वत्ति भक्षयत्युपभुङ्क्तेऽविवेकतः। अनश्नन्नन्य इतर ईश्वरो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावः सर्वज्ञः सर्वसत्त्वोपाधिरीश्वरो नाश्नाति। प्रेरयिता ह्यसावुभयोर्भोज्यभोक्त्रोर्नित्यसाक्षित्वसत्तामात्रेण। स त्वनश्नन्नन्योऽभिचाकशीति पश्यत्येव केवलम्। दर्शनमात्रं हि तस्य प्रेरयितृत्वं राजवत् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—येथपर्यंत परविद्येचें व्याख्यान झालें. परविद्येनें 'तो अविनाशी पुरुष' नामक सत्य वस्तु समजते. या वस्तूचें ज्ञान–विज्ञान झालें असतां हृदयग्रंथिप्रमुख संसारकारणांचा समूळ, सकारण आणि सफल, म्हणजे आत्यंतिक विनाश होतो. हें सत्यवस्तूचें व्याख्यान करून श्रुतीनें पुरुषनामक वस्तूचा साक्षात्कार करून देणारा जो जो योग त्याचेंही, धनुष्यादि उपायककल्पना स्वीकृत करून साधनांचेंही व्याख्यान केलें. आतां यापुढें योगाबरोबर सहचारित्वानें असणारीं सत्यप्रमुख साधनें सांगावयाचीं राहिलीं आहेत. म्हणून प्रधानत्वानें हीं साधनें सांगण्यासाठीं उत्तरग्रंथाला या खंडांत आरंभ केला आहे. शिवाय, तत्त्वाचा निश्चय व त्याची धारणा पुनः एकदां अन्यप्रकारानें (अन्य दृष्टांतादि देऊन) सांगितली आहे. सांगितलेलेंच पुनः सांगण्याचें कारण उघड आहे. विषय अत्यंत गहन असल्यामुळें ज्ञानकक्षेच्या आंत तो महाकष्टानें येतो. म्हणून मुख्य विषयाचें पुनः पुनः व्याख्यान करण्याचा श्रुतिपरिपाठच आहे. हा मंत्र सूत्रभूत आहे. (थोड्या पण ठळक शब्दांनीं जेथें सिद्धांताचा उच्चार केला असतो, त्याला सूत्र असें म्हणतात.) परमार्थवस्तूचा (ब्रह्मवस्तूचा) अधिगम व्हावा एतदर्थ सिद्धांताचा पुनः उपन्यास केला आहे. तो असाः–सुंदर आणि रमणीय पंख असणारे दोन सहचर जीव–शिवनामक पक्षी (या दोघांचा केव्हांही विरह होत नाहीं. दोघेही नित्य एकत्र असतात. म्हणून यांस 'सयुजौ' असें म्हटलें) समान वृत्त धारण करणारे स्नेही आहेत. या उभयतांचें प्रकटन एकाच कारणानें होत असतें. (कोणतेंही विषयज्ञान झालें असतां विज्ञानानें जीव प्रकट होतो व विज्ञानाचा आधार म्हणून शिव प्रकट होतो. असे हे दोन पक्षी एकाच वृक्षाचा आश्रय घेऊन राहतात. हा वृक्ष म्हणजे जीवांचें शरीर होय.) वृक्षाचा व शरीराचा उच्छेद होतो, म्हणून (उभयतांसही उच्छेद्यत्व हा गुण साधारण आहे म्हणून) शरीराला वृक्ष असें म्हटलें आहे. उभयतांच्या प्रकटनाचें अधिष्ठान एकच शरीर असतें म्हणून उभयताही एकाच वृक्षाचा (शरीराचा?) आश्रय करितात, अशी वाक्ययोजना केली आहे. पक्षी फलाच्या उपभोगासाठीं वृक्षावर बसतात त्याप्रमाणें जीव आणि शिव हे दोन पक्षी एकाच शरीरवृक्षाचा आश्रय करितात. उभयतांचें ज्ञानरूप हे त्यांचे पंख होत.

हा वृक्ष *ऊर्ध्वमूल, अधःशाख (शाखा खालीं आहेत असा), अश्वत्थ (क्षणभंगुर० आणि अव्यक्तापासून उत्पन्न झालेला, आहे. याला क्षेत्र अशी संज्ञा आहे. स्वकर्मांच्या फलाचा उपभोग सर्व प्राणी या वृक्षाचा आश्रय धरून घेतात. याप्रमाणें शरीरनामक वृक्षरूपी वस्तूचा आश्रय करणारे जीव–शिवनामक दोन पक्षी हे आविद्येला आलिंगून काम, कर्म आणि वासना या उपाधीनें ग्रस्त आहेत. ही लिंगदेहात्मक उपाधि जीव आणि शिव या उभयतांस लागलेली असते. या दोघां-पैकीं एक क्षेत्रज्ञ (जीव) लिंगशरीररूपी वृक्षाचा आश्रय करून राहतो आणि तेथें कर्मांपासून उत्पन्न झालेले सुख–दुःखात्मक रुचिकर फलाचा उपभोग घेतो. सत्त्वादि गुणत्रयानें अधिष्ठित झालेल्या जीवाचा हा उपभोग अज्ञानात्मक आहे. या वृक्षावर अनेक व विचित्र अनुभवांच्या फलाचा आस्वाद जीवांस घ्यावा लागतो. कर्में अनेक प्रकारचीं असतात म्हणून कर्मफलांचें स्वरूपही विविध आणि विलक्षण असतें. ही एका अज्ञानी पक्ष्याची (जीवाची) हकीकत झाली. दुसरा पक्षी कोणत्याही प्रकारचा उपभोग घेत नाहीं. कारण, तो स्वभावतः नित्य, शुद्ध, ज्ञानी आणि मुक्त असतो. तो सर्वज्ञ आहे, म्हणजे सत्त्वगुण हीच त्याची लिंगदेहात्मक उपाधि आहे. तो महासात्त्विक आहे. रजस्तमाचा येथें गंधही नाहीं. अर्थातच त्याला कोणत्याही प्रकारच्या फलाचा उपभोग घ्यावा लागत नाहीं. हाच ईश्वर होय. हा भोज्य आणि भोक्ते (चर आणि अचर विषय आणि जीव; चिद् आणि अचिद्) या उभयतांचाही साक्षी व प्रेरक आहे. ह्याच्याच प्रेरणेनें भोज्य आणि भोक्ते यांची व्यवस्था होत असते. नित्य ईश्वराच्या सात्त्विकसत्तेनें ही व्यवस्था होत असते. अर्थातच कोणत्याही विषयाचा उपभोग न घेतां केवळ साक्षी म्हणून मात्र हा ईश्वररूपी पक्षी शरीररूपी वृक्षावर राहत असतो. परमेश्वराची प्रेरणा म्हणजे त्याचें साक्षित्व होय. राजाचे आस्तित्व विद्यमान असलें म्हणजे जसे राज्यांतील प्रजांचे व्यवहार सुव्यवस्थित चालतात व प्रत्येकास आपापलें कर्तव्य करण्याची प्रेरणा होते, त्याप्रमाणें परमेश्वराच्या केवळ साक्षित्वानें भोज्यभोजकांस स्वकर्तव्याची प्रेरणा होते.

(सारांश, जीव आणि शिव या उभयतांचें वास्तव्य शरीरनामक वृक्षावर आहे. हे उभयतां नित्य सहचर असून अनुभवनामक एकाच कारणाच्या द्वारा अभिव्यक्त होतात. हे उभयतांही सुंदर आकाराचे आहेत, म्हणजे या उभयतांस चित्कलेचा आश्रय आहे. यांपैकीं एकजण कर्म करितो आणि कर्मफलाचा उपभोग घेतो; पण दुसरा साक्षीरूप असून चराचरविश्वाची व्यवस्था स्वतःच्या विद्यमानत्वानें लावितो. ॥१॥

**रंगरामानुज**—' सयुज '=समान गुण असणारे. ' सखायौ '=परस्परसदृश.

**माध्व०**—जीव हा नित्य स्वादु (गोड) पदार्थच खातो असें नाहीं. तो सर्व भोग्य पदार्थांचा उपभोग घेतो, स्वकर्मानें जें पुण्यपापरूपी फल उत्पन्न होतें त्याचा उपभोग घेतो. पण ईश्वर हा जीवानें भोग्य असणारें पुण्यफल किंवा सर्व पापफल खात नाहीं. हा ' अनश्नन् ' या पदाचा अर्थ आहे. ईश्वर हा उत्तम जें पुण्यफल

* श्रीमद्भगवद्गीता अ० १५ श्लोक १ पहा. कठोपनिषदांतील. शाङ्करभाष्य पहा.

आहे त्याचा मात्र स्वीकार करितो. तो स्वतत्र आहे. त्याला भोक्तृत्वाचा किंवा दुःखभोगाचा संबंध नाहीं. 'सखायौ' जीव उपकार्य आहे आणि परमेश्वर उपकारक आहे, म्हणून त्यांचा स्नेह असतो. अभिचाकशीति=अत्यंत प्रकाशरूपी असतो.

---

## मंत्र दुसरा.

**समाने वृक्षे पुरुषो निमग्नोऽनीशया शोचति मुह्यमानः। जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमानमिति वीतशोकः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—समाने वृक्षे पुरुषः निमग्नः अनीशया मुह्यमानः शोचति** ( या पूर्वोक्त वृक्षावर निमग्न झालेला मुग्ध जीव आपण स्वतंत्र नाहीं म्हणून शोक करीत राहतो. ) **जुष्टं यदा अन्यं ईशं पश्यति, अस्य महिमानं इति वीतशोकः**—( पण योगमार्गप्रेरित आत्मज्ञानानें समाधान वृत्ति प्राप्त करून घेऊन जेव्हां अन्यपक्ष्याचें–ईश्वराचें–दर्शन घेतो, मीच ईश्वर आहें असें त्याला समजतें, व त्याच्या माहात्म्याचें स्वरूप त्यास समजतें, तेव्हां तो शोकशून्य होतो. ) ॥ २ ॥

तत्रैवं सति समाने वृक्षे यथोक्ते शरीरे पुरुषो भोक्ता जीवोऽविद्याकामकर्मफलरागादिगुरुभाराक्रान्तोऽलाबुरिव सामुद्रे जले निमग्नो निश्चयेन देहात्मभावमापन्नोऽयमेवाहममुष्य पुत्रोऽस्य नप्ता कृशः स्थूलो गुणवान्निर्गुणः सुखी दुःखीत्येवंप्रत्ययो नास्त्यन्योऽस्मादिति जायते म्रियते संयुज्यते वियुज्यते च संबन्धिबान्धवैः। अतोऽनीशया न कस्यचित्समर्थोऽहं पुत्रो मम विनष्टो मृता मे भार्या किं मे जीवितेनेत्येवं दीनभावोऽनीशा तया शोचति संतप्यते मुह्यमानोऽनेकैरनर्थप्रकारैरविवेकतया चिन्तामापद्यमानः स एवं प्रेततिर्यङ्मनुष्यादियोनिष्वाजवं जवीभावमापन्नः कदाचिदनेकजन्मसु शुद्धधर्मसंचितनिमित्ततः केनचित्परमकारुणिकेन दर्शितयोगमार्गोऽहिंसासत्यब्रह्मचर्यसर्वत्यागशमदमादिसंपन्नः समाहितात्मा सञ्जुष्टं सेवितमनेकैर्योगमार्गैः कर्मि(र्म?)भिश्च,यदा यस्मिन्काले पश्यति ध्यायमानोऽन्यं वृक्षोपाधिलक्षणाद्विलक्षणमशिममसंसारिणमशनायापिपासाशोकमोहज

रामृत्स्वतीतमीशं सर्वस्य जगतोऽयमहमस्म्यात्मा सर्वस्य समः सर्वभूतस्थो नेतरोऽविद्याजनितोपाधिपरिच्छिन्नो मायात्मेति विभूतिं महिमानं च जगद्रूपमस्यैव मम परमेश्वरस्येति यदैवं द्रष्टा तदा वीतशोको भवति सर्वस्माच्छोकसागराद्विप्रमुच्यते कृतकृत्यो भवतीत्यर्थः ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—ऊर्ध्वमूलादिरूपी एकाच वृक्षावर दोघे पक्षी राहतात, असें मागच्या मंत्रांत श्रुतीनें सांगितलें. या मंत्रांत जीवाचें पारतंत्र्य व तज्जन्य शोक आणि या शोकाच्या निरसनाचें साधन इत्यादि गोष्टींचा उल्लेख केला आहे. मागें सांगितलेल्या जीव-शिवांपैकीं जीव हा भोक्ता असल्यामुळें त्याला अत्यंत दुःख होतें. तो अविद्येच्या, कामाच्या, कर्मांच्या, फलाच्या, राग-द्वेषादिकांच्या अत्यंत जड भारानें व्याकुल होऊन भोपळ्याप्रमाणें भवसागराच्या जलांत वर, खालीं, इकडे, तिकडे, असे हेलकावे खात राहतो. अज्ञानामुळें त्या बिचाऱ्याचा असा भ्रांतिष्ट निश्चय झाला असतो कीं, देह हाच आत्मा आहे व देह म्हणजे मी, मी अमक्याचा मुलगा, तमक्याचा नातु, मी कृश, मी स्थूल, मी गुणवान्, मी गुणशून्य, मी सुखी, मी दुःखी, इत्यादि अनेकप्रकारचा विचित्र अनुभव त्याला नित्य येत असतो. देहाहून मी निराळा नाहीं असें विपरीत ज्ञान असल्यामुळें मी जन्म पावतों, मी मरतों, आप्त-इष्ट-मित्रांचा व बंधु-बांधवांचा मला समागम होतो व सापगम (विरह) होतो, इत्यादि प्रकारचीं आशात्मक व भीत्यात्मक दुःखें त्याच्या पाठीमागें हात धुवून लागलेलीं असतात. तसेंच मी परतंत्र आहें, मला कांहींएक करण्याचें स्वतंत्र सामर्थ्य नाहीं, माझा पुत्र विनष्ट झाला, भार्या मेली, आतां जगून मला काय करावयाचें आहे, इत्यादि प्रकारच्या दीनभावांनीं तो शोकपूर्ण होतो. त्याला संताप प्राप्त होतो व तो मूढ होऊन अनेक प्रकारचें वेड्यासासारखें आचरण करितो. आपल्या सभोंवतालीं दिसणारे अनेक घातकारी अनर्थ पाहून अज्ञानानें तो चिंताकुल होतो. या अज्ञानामुळें एक देह सोडल्यावर लघुत्व प्राप्त होऊन प्रेत, पशुपक्षी, मनुष्यादियोनींमध्यें हा बिचारा जीव पुनःपुनः जन्ममरणाच्या अविश्रांत फेऱ्यांत सांपडतो. पुढें अनेक जन्म गेल्यानंतर केव्हांतरी सात्त्विकधर्मांचा संचय दैवयोगानें झालाच, तर एखाद्या परम दयाळु ज्ञानीसाधूची व त्याची गांठ पडते आणि त्या साधूच्या उपदेशानें योगशुद्धमार्गाचें ज्ञान होऊन हा दीन जीव अहिंसा, सत्य, ब्रह्मचर्य, विषयत्याग, शम, दम, इत्यादि साधनांनीं संपन्न होतो. अर्थात् त्याचे चित्ताला स्थैर्याची शांति मिळते. या वेळीं अनेक योगमार्गांचा व अनेक कर्ममार्गांचा आश्रय घेऊन ज्याचें योगी पुरुष ध्यान कारतात, त्या अंतर्यामी परमेश्वराचें हा शुद्धचित्त झालेला जीव ध्यान करूं लागतो.

ध्यान करण्यास योग्य असा परमेश्वर शरीरवृक्षावर असणाऱ्या उपाधींनीं जर्जर होत नाहीं. तो उपाधिग्रस्त जीवांहून निराळा व विलक्षणस्वरूपाचा आहे, तो असंसारी

म्हणजे जन्म-मरणशून्य आहे, त्याला क्षुधा, तृषा, शोक, मोह, जरा, मृत्यु इत्यादिकांची यत्किंचित् बाधा होत नाहीं, तो या आधिव्याधीच्या पलीकडे राहणारा आहे, तो जगत्स्वामी आहे व तो स्वतंत्र आहे असें या साधकयोग्यास समजतें. नंतर या लक्षणांनीं युक्त जो परमेश्वर तोच मी आहें; मी सर्वांचा आत्मा आहें, मी सर्वांस सम असून ( सर्वत्र निर्विकार असून ) सर्व भूतांमध्यें राहणारा आहें, मी परिच्छिन्न नव्हें म्हणजे अविद्येनें उत्पन्न केलेल्या उपाधींनीं संकुचित झालेला मायिक आत्मा (जीव) नव्हे, मी मायेचाही आत्मा आहें, माझा महिमा मोठा आहे, हें विश्व माझें म्हणजे परमेश्वराचें स्वरूप आहे, असें जेव्हां पूर्ण ज्ञान त्यास होतें, तेव्हां तो शोकशून्य होतो. अर्थातच सर्व शोकसागरापासून त्याची सुटका होते आणि तो कृतकृत्य होतो. हा तात्पर्यार्थ आहे. ॥ २ ॥

**रंग०**—' अनीशया ' = भोग्य होणाऱ्या प्रकृतीनें. आपण परमात्म्याचे शेषरूपी असूनही ( प्रकार असून ) आपलें स्वरूप ज्ञानात्मक व आनंदात्मक आहे हें विसरून जाणें व वृक्षाप्रमाणें नष्ट होणाऱ्या एकाच शरीरांत मी आहें, मी स्थूल आहें, कृश आहें, अशी शरीरतादात्म्यबुद्धि करणें, या अज्ञानामुळें जीवाला दुःखाचा अनुभव प्रकृतीच्या संसर्गानें येतो आणि तो शोक करीत राहतो. पण जेव्हां श्रीपरमेश्वर हा आपला आधार, आपला नियंता व आपला शेषी आहे, म्हणून जीवापेक्षां सर्वविलक्षण आहे, असें पाहतो व आपल्या कर्मानें आणि उपासनेनें प्रसन्न झालेल्या सर्व जगन्नियंत्या परमेश्वराचा महिमा आपल्या बुद्धीमध्यें प्रकट करितो, परमेश्वराचा महिमा त्यांस जेव्हां समजतो, तेव्हां तो शोकशून्य होतो. ' अनीश '=असमर्थ. हाही अर्थ या आचार्यांस मान्य आहे. सत्त्व म्हणजे अंतःकरण असा अर्थ करून हा मंत्र अंतःकरण-जीवपर आहे, जीव-परमेश्वरपर नाहीं, असा या आचार्यांनीं पूर्वपक्ष उत्पन्न करून त्याचें निराकारण केले आहे. आणि हा व इतर समानार्थक मंत्र जीव-ब्रह्मपर आहेत असें ठरविलें आहे. क्षेत्रज्ञ म्हणजे परमेश्वर आणि जीव म्हणजे भूतात्मा असे अर्थ देऊन जीव-परमेश्वरांमध्यें भेद आहे, हेंही यांनीं दाखविलें आहें. ही समग्र अर्थ-चर्चा चिंतनीय आहे, इतकें मात्र सुचविणें येथें शक्य आहे.

**माध्व०**—अनीशया=हरीशिवाय जिला दुसरा स्वामी नाहीं, ती हरीची शक्ति. ' जुष्ट '=सर्वसेव्य. ' ईश '=विष्णु. हा आपल्याहून निराळा आहे व त्याचे स्वरूप मागें सांगितल्याप्रमाणें असून त्या स्वरूपाचें मनन निदिध्यासन केलें, परमेश्वराची उपासना केली, असतां अपरोक्ष साक्षात्कार होऊन जीव शोकशून्य होतो. देहादिकाचें ठिकाणीं ममत्व उत्पन्न होणें हाच मोह होय. परमेश्वराचें स्वरूप समजलें म्हणजे हा मोह नाहींसा होतो.

---

## मंत्र तिसरा.

**यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् । तदा विद्वान्पुण्यपापे विधूय निरञ्जनः परमं साम्यमुपैति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—यदा पश्यः रुक्मवर्णं, कर्तारं, ईशं, पुरुषं, ब्रह्मयोनिं पश्यते** ( जेव्हां ज्ञानीपुरुषाला तेजस्वी जगत्कर्त्या पुरुषाचें, जगत्स्वामीचें, जगदाधाराचें व जगत्कारणाचें स्वरूप समजतें ) **तदा पुण्यपापे विधूय निरंजनः विद्वान् परमं साम्यं उपैति** ( तेव्हां सर्वपुण्यपापांचा विनाश करून दोषशून्य झालेला विद्वान् हा अतिश्रेष्ठ जी निर्विकारी समता ती प्राप्त करून घेतो. ) ॥ ३ ॥

अन्योऽपि मन्त्र इममेवार्थमाह सविस्तरम् । यदा यस्मिन्काले पश्यः पश्यतीति विद्वान्साधक इत्यर्थः । पश्यते पश्यति पूर्ववद्रुक्मवर्णं स्वयंज्योतिःस्वभावं रुक्मस्येव वा ज्योतिरस्याविनाशि कर्तारं सर्वस्य जगत ईशं पुरुषं ब्रह्मयोनिं ब्रह्म च तद्योनिश्चासौ ब्रह्मयोनिस्तं ब्रह्मयोनिं ब्रह्मणो वाऽपरस्य योनिं स यदा चैवं पश्यति तदा स विद्वान्पश्यः पुण्यपापे बन्धनभूते कर्मणी समूले विधूय निरस्य दग्ध्वा निरञ्जनो निर्लेपो विगतक्लेशः परमं प्रकृष्टं निरतिशयं साम्यं समतामद्वयलक्षणं द्वैतविषयाणि साम्यान्यतोऽर्वाञ्च्येवातोऽद्वयलक्षणमेतत्परमं साम्यमुपैति प्रतिपद्यते ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—वरील अर्थच आणखी एकदां हा मंत्र विस्तारानें सांगत आहे. जेव्हां ‘ पश्यः ’ म्हणजे ज्ञानी साधक परमेश्वराचें स्वरूप तें माझेंच आहे, हें समजून घेतो, व परमेश्वराचें स्वयंभु तेज सुवर्ण–तेजाप्रमाणें अविनाशी आहे, तो सर्वजगताचा कर्ता आणि स्वामी आहे, तोच चराचरजगताला पूर्णत्व देणारा आहे, तो परमेश्वर ब्रह्मरूप असून तोच जगत्कारण आहे किंवा अपरब्रह्माचें ( सगुण ब्रह्माचें ) आदिकारण आहे, असें जेव्हां परमेश्वरी स्वरूपाचें अथवा स्वस्वरूपाचें त्याला ज्ञान होतें, तेव्हां तो विद्वान् साक्षात्कारी पुरुष आपल्यास बद्ध करूं पाहणाऱ्या पुण्य–पापरूपी कर्मांचे बंध समूळ नाहींसे करून टाकतो अथवा जाळून टाकतो, निर्लेप होतो आणि सुख–दुःखातीत होऊन अत्यंत उत्कृष्ट असें जें परमेश्वरी साम्य तें प्राप्त करून घेतो. सारांश तो परब्रह्माशीं तादात्म्य पावतो. त्याचें व परमेश्वराचें अभिन्नत्व होतें. तो

परब्रह्म होतो. सामान्यतः साम्यें द्वैताचा संबंध दाखविणारीं असतात, म्हणून अलीकडचीं, व्यवहारात्मक, सारांश, कनिष्ठ प्रतीचीं असतात. साम्य दोघांत अथवा अनेकांत असतें म्हणून साम्य म्हटलें कीं द्वैताचा उद्भव होतो. पण येथें तर परम हें साम्याचें विशेषण श्रुतिपठित आहे; म्हणून हें साम्य अद्वयलक्षणाचें, एकत्वदर्शक मात्र असलें पाहिजे. सारांश मुक्तास जें साम्य प्राप्त होतें तें अद्वयलक्षणात्मक असतें, असें श्रुतीला एककंठानें सांगावयाचें आहे. असो, हा जीव जीवन्मुक्त होतो. ॥ ३ ॥

**रंगरामानुज**—जेव्हां ब्रह्मदर्शी ( ब्रह्म पाहणारा ) जीव हा अतितेजस्वी, मंगलशरीरी, जगत्कर्ता, जगन्नियंता, ब्रह्मयोनि ( ब्रह्म म्हणजे अव्याकृत, त्याचें उपादानकारण असणारा किंवा ब्रह्म हीच योनि असणारा स्वयंभु ) परमेश्वराचें, वासुदेवाचें, दर्शन घेतो, त्यावेळीं सर्व पुण्य–पापांचें निरसन होतें. मग प्रकृतीचे बंध तोडून ज्ञानी मुमुक्षु अपहतपाप्मत्वादि श्रुत्युक्त अष्ट लक्षणांनीं ब्रह्म–स्वरूपी होतो. अथवा त्यास सरूपता–मुक्ति मिळते.

**माध्व०**—ज्ञान झालें म्हणजे अप्रारब्ध (फलोन्मुख न झालेलें कर्म ) आणि काम्य कर्मांचें पुण्यफल या उभयतांचाही नाश होतो. ‘ रुक्मवर्ण ’ प्रकाशरूपी शरीर. ब्रह्मयोनि=हिरण्यगर्भाचें कारण. सारांश जेव्हां जीव प्रकाशरूपी जगत्कर्त्या, पूर्ण षड्गुणी, ब्रह्मदेवपित्याचे ( विष्णूचें ) संपूर्ण ज्ञान करून घेतो, तेव्हां त्याला अपरोक्ष ज्ञान होऊन तो निरंजन होतो, त्याचें सर्व अनिष्टकर्मबंध सुटतात आणि त्याला विष्णुसाम्य प्राप्त होतें.

---

## मंत्र चवथा.

**प्राणो ह्येष यः सर्वभूतैर्विभाति विजानन्विद्वान्भवते नातिवादी । आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ— हि एषः यः प्राणः सर्वभूतैः विभाति** ( सुप्रसिद्ध आहे कीं, हा प्राण सर्वभूतांसह प्रकाशित होतो ) **विजानन् विद्वान् अतिवादी न भवते** ( हें जाणून विज्ञान असणारा ज्ञानी पुरुष अतिवादी असत नाहीं. ) **एषः आत्मक्रीडः, आत्मरतिः, क्रियावान्, ब्रह्मविदां वरिष्ठः** ( हा आत्मक्रीडा करणारा आत्मरत पुरुष कृतकृत्य होऊन सर्व ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ होतो. ) ॥ ४ ॥

किंच योऽयं प्राणस्य प्राणः पर ईश्वरो ह्येष प्रकृतः सर्वैर्भूतैर्ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तैः । इत्थंभूतलक्षणे तृतीया । सर्वभूतस्थः सर्वात्मा

सन्नित्यर्थः । विभाति विविधं दीप्यते । एवं सर्वभूतस्थं यः साक्षादात्मभावेनायमहमस्मीति विजानन्विद्वान्वाक्यार्थज्ञानमात्रेण स भवते भवति न भवतीत्येतत्किमतिवाद्यतीत्य सर्वानन्यान्वदितुं शीलमस्येत्यतिवादी । यस्त्वेवं साक्षादात्मानं प्राणस्य प्राणं विद्वानतिवादी स न भवतीत्यर्थः । सर्वं यदात्मैव नान्यदस्तीति दृष्टं तदा किं ह्यसावतीत्य वदेत् । यस्य त्वपरमन्यदृष्टमस्ति स तदतीत्य वदति । अयं तु विद्वानात्मनोऽन्यन्न पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति । अतो नातिवदति । किंचाऽऽत्मक्रीड आत्मन्येव च क्रीडा क्रीडनं यस्य नान्यत्र पुत्रदारादिषु स आत्मक्रीडः । तथाऽऽत्मरतिरात्मन्येव च रती रमणं प्रीतिर्यस्य स आत्मरतिः । क्रीडा बाह्यसाधनसापेक्षा । रतिस्तु साधननिरपेक्षा बाह्यविषयप्रीतिमात्रमिति विशेषः । तथा क्रियावाञ्ज्ञानध्यानवैराग्यादिक्रिया यस्य सोऽयं क्रियावान् । समासपाठ आत्मरतिरेव क्रियाऽस्य विद्यत इति बहुव्रीहिमतुबर्थयोरन्यतरोऽतिरिच्यते । केचित्त्वग्निहोत्रादिकर्मब्रह्मविद्ययोः समुच्चयार्थमिच्छन्ति । तच्चैष ब्रह्मविदां वरिष्ठ इत्यनेन मुख्यार्थवचनेन विरुध्यते । न हि बाह्यक्रीड आत्मरतिश्च भवितुं शक्तः । कश्चिद्बाह्यक्रियाविनिवृत्तो ह्यात्मक्रीडो भवति बाह्यक्रियात्मक्रीडयोर्विरोधात् । न हि तमःप्रकाशयोर्युगपदेकत्र स्थितिः संभवति । तस्मादसत्प्रलपितमेवैतदनेन ज्ञानकर्मसमुच्चयप्रतिपादनम् । "अन्या वाचो विमुञ्चथ" "संन्यासयोगात्" इत्यादिश्रुतिभ्यश्च । तस्मादयमेवेह क्रियावान्यो ज्ञानध्यानादिक्रियावान्सोऽभिन्नार्थमर्यादः संन्यासी । य एवंलक्षणो नातिवाद्यात्मक्रीड आत्मरतिः क्रियावान्ब्रह्मनिष्ठः स ब्रह्मविदां सर्वेषां वरिष्ठः प्रधानः ॥ ४ ॥

**सिद्धान्ती**—आणखी; जो हा परमेश्वर प्रस्तुतचा विषय आहे, तो प्राणांचा प्राण असून ब्रह्मदेवापासून तों गवताच्या काडीपर्यंतच्या सर्वभूतांच्या स्वरूपांनीं प्रकाशमान होत असतो, म्हणजे सर्वभूतांमध्यें राहून व सर्वांचा आत्मा होऊन सर्वप्रकाशक होतो. याप्रमाणें सर्वभूत–निवासी जो परमेश्वर तो प्रत्यक्ष मीच आहें, असें ज्या विद्वानाला ज्ञान–विज्ञान होतें, महावाक्यांचा उपदेश होतांक्षणी ज्या अधिकारी मुमुक्षूला ' मी ब्रह्म आहें. ' असें समजून उमजतें, तो केव्हांही अतिवादी होत नाहीं. अतिवादी म्हणजे इतर सर्वांस अतिक्रांत करून वाद करण्याचा ज्याचा स्वभाव असतो, ते अतिवादी होत. श्रुतिवाक्यांचा अर्थ मात्र करून त्याच्या जोरावर 'तो आहे,'

'तो नाहीं' असा वाक्पाटवानें वाद करून प्रतिपक्ष्यांचा पाडाव करितात, ते अतिवादी होत. पण प्राणांचा प्राण असणारा आत्मा मी प्रत्यक्ष आहें, असें ज्याला समजतें, तो अतिवादी होणें शक्य नाहीं. जेव्हां सर्व मी आहें, दुसरी वस्तु नाहीं, असें ज्ञान होतें, तेव्हां हा विद्वान् पुरुष बोलेल तरी काय! दुसरी कांहीं तरी वस्तु आहे, ती दिसत भासत आहे, असें ज्ञान असतें तेव्हां तिच्या पलीकडे उभें राहून बोलतां येतें; हें ठीक आहे. पण वरील आत्मज्ञानी विद्वानाला सर्वात्मकस्वरूपाशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं, ऐकूं येत नाहीं किंवा समजत नाहीं, म्हणून अर्थातच तो आपल्या पलीकडे जाऊन बोलूं शकत नाहीं. आपणच सर्व झाल्यावर पलीकडे अलीकडे इत्यादि शब्द व शब्दसामर्थ्यें कुंठित होतात. म्हणून हा विद्वान् पुरुष अतिवादी होत नाहीं. तो केवळ आत्मस्वरूपाशीं क्रीडा करण्यांत दंग होऊन जातो. पुत्र, दारा, इत्यादिकांशीं ( इतर जड विषयांशीं ) क्रीडा करणें जीवन्मुक्ताला असंभवनीय होतें. तसेंच त्याची निरतिशय प्रीति आत्मस्वरूपावर मात्र असते. आत्मस्वरूपीं त्याचें प्रेमसर्वस्व समर्पित होतें. क्रीडा करण्याला बाह्य साधनांची अपेक्षा असते, पण रतीला साधनांची आवश्यकता नसते. रति म्हणजे साधननिरपेक्ष शुद्ध बाह्यविषयप्रीति होय. हिला साधन नको असतें. असा 'क्रीडा आणि रति' यांत विशेष आहे. ही प्रीति बाह्यविषयात्मक किंवा आत्मविषयात्मक असेल. आत्मज्ञानी विद्वानाची प्रीति आत्मस्वरूपी मात्र असते. याचप्रमाणें ज्ञान, ध्यान, वैराग्य इत्यादि क्रियांनीं जो संपन्न असतो त्याला क्रियावान् असें म्हणतात. 'आत्मरतिक्रियावान्' असा समस्तपाठ घेतला तर त्याचा अर्थ आत्मरति हीच ज्याची क्रीडा आहे असा बहुव्रीहि समासाच्या विग्रहानें होईल. दोन्ही पाठ एकच अर्थ उद्भावितात, पण दुसऱ्यापेक्षां पहिला बरा.* कारण त्याच्या योगें 'बाह्यक्रियानिवृत्तीचा' अर्थ सहज लक्ष्यांत येतो. आतां कांहीं लोक या मंत्रांत क्रियावान् या शब्दानें अग्निहोत्रादि कर्मे व 'आत्मक्रीडः' व 'आत्मरतिः' इत्यादि शब्दांनीं ब्रह्मविद्या असे अर्थ समजून ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय श्रुतीला अभिप्रेत आहे, असें म्हणतात; पण हें म्हणणें योग्य नाहीं. कारण, मंत्रांतील 'ब्रह्मवेत्त्यांमध्यें हा पुरुष वरिष्ठ असतो' या प्रधान अर्थाच्या विरुद्ध हा समुच्चयाचा अर्थ होतो. शिवाय बाह्य क्रिया करणारा पुरुष आत्मस्वरूपीं रममाण होणें शक्य नाहीं. बाह्यकर्मापासून निवृत्ति झाली तर मात्र आत्मक्रीडा होण्याचा यथार्थ संभव प्राप्त होतो. बाह्यक्रीडा आणि आत्म–क्रीडा यांचा विरोध अत्यंत तीव्र आहे. तम आणि प्रकाश हीं केव्हांही एकत्र राहूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें बाह्य–क्रीडा आणि आत्म–क्रीडा एकत्र असणें

---

* पहिला अर्थ बरा आहे, कारण व्याकरणपद्धतीनें 'आत्मरति क्रियः' असा समस्तशब्द हा दुसरा इष्ट–अर्थ प्राप्ति करून देतो. पण श्रुतीनें 'वान्' असा प्रत्यय लावून मुद्दाम 'क्रियावान्' असा शब्द उपयोजिला आहे. तेव्हां 'क्रियावान्' हा शब्द निराळा घेऊन अधिक अर्थ समजणें उत्तम पक्ष होय.

संभवनीय नाहीं. म्हणून या मंत्राचा अर्थ ज्ञान–कर्म–समुच्चय–पर करणें म्हणजे वेडेपणाची बडबड करण्यासारखी होय. 'दुसऱ्या वार्णीचा अथवा विद्यांचा त्याग करा' 'कर्मसंन्यास करा' इत्यादि श्रुति समुच्चयवादाचा सर्वथा निषेध करितात. म्हणून येथें क्रियावान् या शब्दाचा अर्थ आम्ही केला आहे, असाच असला पाहिजे. म्हणजे ज्ञान, ध्यान, इत्यादि प्रकारचा मात्र ज्ञानपर अर्थ क्रियावान् या शब्दाचा केला पाहिजे. आत्मविद्येची मर्यादा आमचा अर्थ उल्लंघित नाहीं. इतकेंच नव्हे तर आमचा अर्थ विद्यापर मात्र होतो. सारांश, येथें या मंत्रांत तोच क्रियावान् इष्ट आहे कीं ज्ञानात्मक मात्र क्रिया करून जो अद्वैतज्ञानवस्तूची मर्यादा उल्लंघित नाहीं. असो; जो या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें संन्यासी आहे, जो अनतिवादी आहे. आत्मक्रीड आहे, आत्मरति असून ज्ञान-ध्यानादि मात्र क्रिया करणारा आहे, तो ब्रह्मनिष्ठ पुरुष सर्व ब्रह्मवेत्त्या पुरुषांमध्यें श्रेष्ठ म्हणजे प्रधान असतो. ॥ ४ ॥

**रंगरामानुज**—'प्राण'=परमात्मा. ह्याचा आश्रय सर्व भूतें करितात. 'विजानन्=विद्वान् भव तेनातिवादी' असा पाठ स्वीकारून या आचार्यांनीं असा अर्थ केला आहे कीं, श्रवण-मननांच्या योगानें ज्ञानीपुरुषानें भगवंताची उपासना करीत होत्साता परमेश्वराचें साहाय्य घेऊन अतिवादी व्हावें ( परमेश्वर सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे असें दृढ-चिंतनपूर्वक म्हणावें) असा उपदेश श्रुतीनें मुमुक्षूस केला आहे. 'क्रियावान्'=निष्काम-कर्माचें अनुष्ठान करणारा. वेदविहित कर्म केलें तर मात्र अंतःकरणपरिशुद्ध होऊन निष्कामकर्मानें ब्रह्मविद्येची उत्पात्ति होते आणि विहित कर्म करणारा ज्ञानी पुरुष सर्व ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ होतो.

**माध्व०**—क्रीयावान्=प्रारब्धकर्मकर्ता. एषः=हा हरि. सर्वभूतैः=इंद्रादि इंद्रियां-भिमानी देवतांसह अतिवादी, मी कर्ता आहें असें म्हणणारा. जेव्हां मी कर्ता नाहीं; स्वतंत्र नाहीं, असें ज्ञान होऊन 'हा हरि सर्वेंद्रियांचा स्वामी आहे' असें अपरोक्ष ज्ञान करून घेतो तेव्हां प्रारब्धकर्मकर्ता सर्व भगवंताची क्रीडा आहे, सर्व प्रेमाचें स्थान भगवान् आहे, असें समजतो आणि त्याचें बाह्यविषयात्मक अनुसंधान संपतें. ही असंप्रज्ञात-समाधि होय. जेव्हां ही समाधि नसते तेव्हां तो सत्कर्म मात्र करीत असतो. त्याचें प्रारब्धच भगवत्पूजात्मक कर्मं करण्याचें असतें.

---

## मंत्र पांचवा.

**सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन**
**ब्रह्मचर्येण नित्यम् । अन्तःशरीरे ज्योतिर्मयो हि**
**शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ**—हि एषः आत्मा नित्यं सत्येन, तपसा, सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण लभ्यः ( हा आत्मा नित्य सत्याचरणानें, नित्य तपानें, नित्य परमार्थज्ञानानें म्हणजे नित्य ब्रह्मचर्यानें लक्षावयाचा असतो. ) हि अंतःशरीरे ज्योतिर्मयः शुभ्रः, क्षीणदोषाः यतयः यं पश्यंति ( हें प्रसिद्ध आहे कीं, हा शरीराच्या अंतर्यामी राहणारा प्रकाशरूप निर्मळ आत्मा ज्यांचे दोष नष्ट झाले आहेत त्या यतींना मात्र साक्षात् प्रकट होतो)॥५॥

सारांश चित्त शुद्ध झालेल्या भोगविरक्त विद्वानांस आत्मदर्शन होतें, तें सत्याचरण, तपश्चर्या, यथार्थ ज्ञान आणि ब्रह्मचर्य यांच्या नित्य अनुष्ठानानें होतें.

अधुना सत्यादीनि भिक्षोः सम्यग्ज्ञानसहकारीणि साधनानि विधीयन्ते निवृत्तिप्रधानानि । सत्येनानृतत्यागेन मृषावदनत्यागेन लभ्यः प्राप्तव्यः । किंच तपसा हीन्द्रियमनएकाग्रतया " मनसश्चेन्द्रियाणां च ह्यैकाग्र्यं परमं तपः " इति स्मरणात् । तद्ध्यनुकूलमात्मदर्शनाभिमुखीभावात्परमं साधनं तपो नेतरच्चान्द्रायणादि । एष आत्मा लभ्य इत्यनुषङ्गः सर्वत्र । सम्यग्ज्ञानेन यथाभूतात्मदर्शनेन ब्रह्मचर्येण मैथुनासमाचारेण । नित्यं सर्वदा नित्यं सत्येन नित्यं तपसा नित्यं सम्यग्ज्ञानेनेति सर्वत्र नित्यशब्दोऽन्तर्दीपिकान्यायेनानुषक्तव्यः । वक्ष्यति च–" न येषु जिह्ममनृतं न माया च " इति । कोऽसावात्मा य एतैः साधनैर्लभ्य इत्युच्यते । अन्तःशरीरेऽन्तर्मध्ये शरीरस्य पुण्डरीकाकाशे ज्योतिर्मयो हि रुक्मवर्णः शुभ्रः शुद्धोऽयमात्मानं पश्यन्त्युपलभन्ते यतयो यतनशीलाः संन्यासिनः क्षीणदोषाः क्षीणक्रोधादिचित्तमलाः स आत्मा नित्यं सत्यादिसाधनैः संन्यासिभिर्लभ्यत इत्यर्थः । न कादाचित्कैः सत्यादिभिर्लभ्यते । सत्यादिसाधनस्तुत्यर्थोऽयमर्थवादः ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—आतां येथून यथार्थज्ञानाच्या सहचारित्वानें असणारीं सत्यादि-आचरणाचीं साधनें भिक्षूला ( कर्मसन्यस्त पुरुषाला ) विहित केलीं आहेत. हीं सर्व साधनें निवृत्तिपर आहेत. असो; सत्य म्हणजे अनृतत्याग ( मृषा, मिथ्या वचनाचा त्याग ) होय. आत्मप्राप्ति करून घ्यावयाची असेल तर प्रथम असत्याचा नित्य त्याग केला पाहिजे ( २ ) तपश्चर्या म्हणजे इंद्रियांसह मनाची अखंड एकाग्रता करणें हें होय ' मनाची आणि इंद्रियांची एकाग्रता करणें हें परम श्रेष्ठ तप आहे ' असें स्मृतीचें म्हणणें आहे. आपल्या परमार्थास परम अनुकूल म्हणजे आत्मदर्शन

प्रत्यक्ष करण्यांत परम कुशल असें जें श्रेष्ठ साधन तें एकाग्रतारूप तप होय. इतर चांद्रायणादि करणें ही आत्मसाधक तपश्चर्या नव्हे. असो; आत्मसाधनाला एकनिष्ठ तपश्चर्या नित्य हवी. याचप्रमाणें ( ३ ) आत्मस्वरूपाचें यथार्थ दर्शन म्हणजे सम्यग्ज्ञान असें ब्रह्मचर्य म्हणजे अशिष्टमैथुनाचा–विषयभोगाचा नित्य त्याग होय. हीं सर्व साधनें आत्म–प्राप्तीच्या उपयोगी पडतात. याप्रमाणें नित्य सत्याचरण, नित्य तपश्चर्या, नित्य यथार्थज्ञान म्हणजे नित्य ब्रह्मचर्य हीं सहकारी करणें साधनें आत्म–प्राप्ति करून देतात. मंत्रांतील नित्य शब्दाचा अंतस्थदीपिकान्यायानें सर्व साधनांशीं अन्वय करावयाचा आहे. ' ज्यांच्या ठिकाणीं कपट नाहीं, अनृत नाहीं व माया नाहीं ' अशी पुढें येणारी श्रुति आम्ही म्हणतों याला प्रमाण* आहे.

या साधनांनीं प्राप्त होणारा आत्मा कोणत्या स्वरूपाचा असतो, हें या मंत्राच्या उत्तरार्धात पुनः सांगितलें आहे. हा आत्मा शरीराच्या अंतर्यामीं ( हृदयाकाशांत ) प्रकाशरूपानें व शुद्धस्वरूपानें वास्तव्य करितो. या आत्म्याचें दर्शन यतींस, मनःसंयमन करणाऱ्या विरक्त पुरुषांस मात्र होत असतें. हे विरक्त संन्यासी क्षीणदोष असतात. म्हणजे त्यांच्या चित्तांतील काम–क्रोधादि मळ नाहींसे झालेले असतात. यांचें चित्त निर्मळ असतें. असो; याप्रमाणें नित्य सत्याचरणादिसाधनांनीं हा आत्मा संन्याशांस मात्र प्राप्त होतो. उगीच एखादे सणासुदीचे वेळीं सत्यादिसाधनांचा अवलंब करणाऱ्या पुरुषांस हा आत्मा मिळावयाचा नाहीं. असो; पुढील मंत्र अर्थातच सत्यादिसाधनांच्या स्तुतीसाठीं आहे, अर्थवादपर आहे. येथें साधनांची स्तुति आहे, ब्रह्मस्वरूपाचा साक्षात् अवतार नाहीं. ॥ ५ ॥

**रंगरामानुज**—' सत्य ' = भूतांचे कल्याण करणारें भाषण. परमेश्वराची प्राप्ति उपासनाद्वारानें होते.

**माध्व०**—' सत्य '=सतांचे हित करणारें तें. ' ब्रह्मचर्य '=श्रवणादिरूप वेदाभ्यास. ज्ञानोत्तर केलेल्या निष्कामकर्मानें, श्रवणादिकांनीं व अपरोक्षज्ञानानें ज्या स्वरूपानंदाचा आविर्भाव होतो, तो केवळ विलक्षण आहे. ' यति ' = श्रवणादि अनुकूल प्रयत्न करणारे. सम्यग्ज्ञान = माहात्म्यज्ञान आणि स्नेहरूप भक्ति.

---

## मंत्र सहावा.

**सत्यमेव जयति नानृतं सत्येन पन्था विततो देवयानः । येनाऽऽक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामा यत्र तत्सत्यस्य परमं निधानम् ॥ ६ ॥**

---

* यावरून कठोपनिषदांवरील भाष्य आचार्यांनीं मागाहून लिहिलें असा ध्वनि कदाचित् निघूं शकेल.

**अन्वय व अर्थ—सत्यं एव जयति न अनृतं** ( सत्यानें मात्र जय-प्राप्ति होते, असत्यानें होत नाहीं. ) **देवयानः पंथाः सत्येन विततः** ( देवयान मार्ग सत्यानें मंडित झाला आहे. ) **येन आप्तकामाः ऋषयः यत्र आक्रमन्ति** ( या सत्यानें मात्र पूर्णकाम ऋषी ज्या देवयानमार्गाचें आक्रमण करितात. ) **तत् सत्यस्य परमं निधानं** ( तो देवयानमार्ग सत्याचें श्रेष्ठ वसतिस्थान आहे. ) ॥ ६ ॥

सत्यमेव सत्यवानेव जयति नानृतं नानृतवादीत्यर्थः । न हि सत्यानृतयोः केवलयोः पुरुषानाश्रितयोर्जयः पराजयो वा संभवति । प्रसिद्धं लोके सत्यवादिनाऽनृतवाद्यभिभूयते न विपर्ययोऽतः सिद्धं सत्यस्य बलवत्साधनत्वम् । किंच शास्त्रतोऽप्यवगम्यते सत्यस्य साधनातिशयत्वम् । कथम् । सत्येन यथाभूतवादव्यवस्थया पन्था देवयानाख्यो विततो विस्तीर्णः सातत्येन प्रवृत्तः । येन पथा ह्याक्रमन्ति क्रमन्त ऋषयो दर्शनवन्तः कुहकमायाशाठ्याहंकारदम्भानृतवर्जिता ह्याप्तकामा विगततृष्णाः सर्वतो यत्र यस्मिंस्तत्परमार्थतत्त्वं सत्यस्योत्तमसाधनस्य संबन्धि साध्यं परमं प्रकृष्टं निधानं पुरुषार्थरूपेण निधीयत इति निधानं वर्तते । तत्र च येन पथाऽऽक्रमन्ति स सत्येन वितत इति पूर्वेण संबन्धः ॥ ६ ॥

**सिद्धान्ती—**सत्याचरण करणारा पुरुष मात्र जय पावतो. असत्यवादी पुरुष केव्हांही विजयी होत नाहीं. मंत्रांत सत्य आणि अनृत असे शब्द आहेत खरे, पण पुरुषाचा आश्रय घेतल्याशिवाय केवळ सत्यानें जय मिळतो किंवा अनृतानें पराजय होतो, असें संभवत नाहीं, म्हणून सत्य म्हणजे सत्याचरणी पुरुष व अनृत म्हणजे अनृतवादी पुरुष असा अर्थ केला आहे. असो; व्यवहारांत हें प्रसिद्धच आहे कीं, सामान्यतः सत्यवक्त्या पुरुषाला मिथ्या भाषण करणाराचा लीलेनें पराजय करतां येतो. चिरकाल टिकणारा उलट अनुभव केव्हांही येत नाहीं, म्हणून सत्य हें साधन बलवत् आहे, हें सिद्ध होतें. तसेंच, शास्त्रावरूनही असें समजतें कीं, सत्य हें अत्यंत उत्कृष्ट कार्यक्षम साधन आहे. कसें तें ऐका:-देवयाननामक जो मार्ग आहे तो सत्यानें मात्र विस्तीर्ण होऊन अखंडत्वानें नित्य सिद्ध झाला आहे. वस्तुस्थिति असेल तशी ती प्रकट करणें याचें नांव सत्यवाद होय. याच मार्गानें ऋषी ( त्रैकालिक ज्ञान असणारे महापुरुष ) जातात. कपट, माया शठपणा, अहंकार, दंभ, अनृत इत्यादि गोष्टी सर्वथा वर्ज्य करणें हें सत्याचें लक्षण आहे. असो; ज्यांच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या, जे सर्वथा

तृष्णाशून्य झाले, ते सर्वज्ञ ऋषि या सत्याच्या मार्गानें जातात. उत्तम साधन जें सत्य त्यानें साध्य होणारें परमार्थतत्त्व, सर्वश्रेष्ठ पुरुषार्थरूपी निधान, म्हणजे परमात्मस्वरूप जेथें नित्य वास्तव्य करितें, तें देवयान होय. त्या स्थानाकडे (देवयानाकडे) ज्या मार्गानें ऋषी जातात, तो मार्ग सत्यानें मात्र पूर्ण खचिलेला आहे, हें ध्यानांत ठेवावयाचें आहे. सारांश, देवयानानें पुरुषार्थसिद्धि होते. आणि देवयानमार्ग सत्यानें साध्य होतो. ॥ ६ ॥

**माध्व०**—'सत्य'=वैकुंठस्थ भगवान् विष्णु. अनृत = असुर. सत्याचें निधान वैकुंठलोक आहे. 'आप्तकाम' = इष्ट असलेलें महाज्ञान ज्यांस प्राप्त झालें आहे ते. 'देवयानमार्ग' हा श्रीविष्णूनें भक्तांस परमपद प्राप्ती व्हावी म्हणून निर्माण केला आहे.

---

## मंत्र सातवा.

**बृहच्च तद्दिव्यमचिन्त्यरूपं सूक्ष्माच्च तत्सूक्ष्मतरं विभाति । दूरात्सुदूरे तदिहान्तिके च पश्यत्स्विहैव निहितं गुहायाम् ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ—बृहत् च तत् दिव्यं, अचिंत्यरूपं, सूक्ष्मात् च तत् सूक्ष्मतरं विभाति** ( तें अत्यंत मोठें असून अति तेजस्वी आहे. त्याचें स्वरूप मनोबुद्धींस अगोचर आहे. तें लहानाहूनही अत्यंत लहान आहे.) **दूरात तत् सुदूरे इह अंतिके च** (ते दूराहून दूर ठिकाणीं व जवळच्या वस्तूहून अत्यंत जवळ आहे. ) **पश्यत्सु इह एव गुहायां निहितं** ( ज्ञानी पुरुषांस हें ब्रह्मतत्त्व आपल्या हृदयाकाशांत आहे, असें येथें सुद्धां दिसतें. ) ॥ ७ ॥

किं तत्किंधर्मकं च तदित्युच्यते—बृहन्महच्च तत्प्रकृतं ब्रह्म सत्यादिसाधनं सर्वतो व्याप्तत्वात् । दिव्यं स्वयंप्रभमनिन्द्रियगोचरमत एव न चिन्तयितुं शक्यतेऽस्य रूपमित्यचिन्त्यरूपम् । सूक्ष्मादाकाशादेरपि तत्सूक्ष्मतरं निरतिशयं हि सौक्ष्म्यमस्य सर्वकारणत्वाद्विभाति विविधमादित्यचन्द्राद्याकारेण भाति दीप्यते । किंच दूराद्विप्रकृष्टदेशात्सुदूरे विप्रकृष्टतरे देशे वर्ततेऽविदुषामत्यन्तागम्यत्वात्तद्ब्रह्म । इह देहेऽन्तिके समीपे च विदुषामात्मत्वात् । सर्वान्तरत्वाच्चाऽऽकाशस्याप्यन्तरश्रुतेः । इह पश्यत्सु चेतनावत्स्वित्येतन्निहितं स्थितं दर्शनादिक्रियावत्त्वेन योगिभिर्लक्ष्यमाणम् । क्व गुहायां बुद्धिलक्षणायाम् ।

तत्र हि निगूढं लक्ष्यते विद्वद्भिः। तथाऽप्यविद्यया संवृतं सन्न लक्ष्यते तत्रस्थमेवाविद्वद्भिः ॥ ७ ॥

**सिद्धान्ती**—तें काय आहे व त्याचे धर्म कसे आहेत ते ह्या मंत्रांत सांगतात. ऐका:—तें प्रकृत ब्रह्म सर्वांहून मोठें आहे. हेंच सत्यादिकांचेंही साधन आहे. ब्रह्म सर्वव्यापी आहे, म्हणून सत्यादि साधनांचें तें उपादान कारण होतें. हें सत्यादि साधनांनीं प्रकट होतें, तथापि सत्यादि साधनें याच्या अस्तित्वानें सिद्ध होतात. ब्रह्मतेज स्वयंभु आहे. तें ब्रह्म इंद्रियांस गोचर असत नाहीं, म्हणून त्याचें चिंतनही करितां येत नाहीं. सूक्ष्म आकाशापेक्षांही हें ब्रह्म अत्यंत सूक्ष्म आहे. याच्यापेक्षां जास्त सूक्ष्मतर-वस्तूचा अभाव आहे. सर्व सूक्ष्मवस्तूंचें कारण व आत्मा ब्रह्म आहे म्हणून तें सूक्ष्माहून सूक्ष्म आहे. तें ब्रह्म सूर्यचंद्रादि भिन्नभिन्न स्वरूपें घेऊन प्रकाशित मात्र होतें. शिवाय, अत्यंत दूर असणाऱ्या प्रदेशाहून तें जास्त दूर असतें. कोणाला? अज्ञानी लोकांना. या पुरुषांस ब्रह्मस्वरूप मुळींच समजत नाहीं. म्हणून त्यांच्यापासून तें अत्यंत दूर दूर आहे. पण जे विद्वान् आहेत, ज्यांना आत्मज्ञान झालें आहे, त्यांच्या हे अत्यंत जवळ म्हणजे ब्रह्म हे त्यांचा आत्मा असतें. कारण तें सर्वांतर्यामी आहे. 'आकाशाचेंही तें अंतर्यामी आहे' असा श्रुतीचा उपदेश आहे. येथें ज्यांना ज्यांना म्हणून बुद्धि आहे त्यांच्या म्हणजे जीवमात्राच्या ठिकाणीं हें वास्तव्य करितें. आणि दर्शन, स्पर्शन, इत्यादि क्रियांच्या द्वारानें योगीलोकांचें हें लक्ष्य होतें. सारांश, योगीलोक दर्शनस्पर्शनवंदनादि क्रिया पाहून असें निश्चित अनुमान करितात कीं, जीवाच्या ठिकाणीं ब्रह्माची वसति आहे. हें कोठें राहतें? बुद्धिनामकगुहेमध्यें याचें वास्तव्य आहे. पण विद्वान् लोकांस मात्र बुद्धीमध्यें गुप्त असलेल्या ब्रह्माचें अनुमान करितां येतें. तथापि त्यावर अज्ञानाचें दडपण असल्यामुळें स्वहृदयांत असूनही अज्ञानीपुरुषांस तें दिसत नाहीं, म्हणून त्याला गुहास्थ, गूढ, असें म्हटलें.

सारांश, एकच ब्रह्मवस्तु निरनिराळ्या अधिकाराच्या जीवांस निरनिराळ्या स्वरूपानें प्रकट होत असतें. याप्रमाणें ब्रह्म हें सर्वव्यापी, सर्वांतर्यामीं, स्वयंप्रकाश इत्यादि गुणांनीं युक्त आहे, असें स्वरूप समजण्यासाठीं श्रुति या मंत्रांत ब्रह्मवर्णन करित आहे. ॥ ७ ॥

**रंगरामानुज**—स्वरूपांनीं आणि गुणांनीं अत्यंत थोर असणारें, आकाशास आधार देणारें, वाणीला व मनाला अगोचर, मंगलशरीरी, सर्व चराचरांच्या अंतर्यामांत प्रवेश करण्यास समर्थ असणारें आणि म्हणून अति सूक्ष्म असणारे हें ब्रह्मतत्त्व आहे.

**माध्व०**—यांचा अभिप्राय असा दिसतो कीं, प्रत्येक अपरोक्ष ज्ञानी पुरुषास विचित्र स्वबिंबाचें दर्शन होतें आणि प्रत्येक ज्ञान्यास विचित्र मोक्ष मिळतो. यांच्या मोक्षांतही भिन्नता आहेच. विचित्र=असाधारण; प्रत्येकाला ब्रम्हस्वरूप निरनिराळें दिसतें, सारांश, मोक्षस्थितींत भेद आहे, मग व्यवहारांत आहे, याचें नवल काय?

---

### मंत्र आठवा.

**न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा । ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ—चक्षुषा न गृह्यते, वाचा अपि न, अन्यैः देवैः न, तपसा वा कर्मणा न** ( ब्रह्मस्वरूपाचें ग्रहण नेत्रानें करितां येत नाहीं, वाणीनें सुद्धां नाहीं, इतर इंद्रियांनीं किंवा तपानें किंवा कर्मानें करितां येत नाहीं.) **ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वः** (ज्ञानप्रसादानें चित्त शुद्ध झालें–) **ततः तु तं निष्कलं ध्यायमानः पश्यते** ( म्हणजे मात्र ध्यान करणाऱ्या शुद्धचित्त पुरुषाला त्या निर्गुण ब्रह्मस्वरूपाचें दर्शन होतें. ) ॥ ८ ॥

पुनरप्यसाधारणं तदुपलब्धिसाधनमुच्यते । यस्मान्न चक्षुषा गृह्यते केनचिदप्यरूपत्वान्नापि गृह्यते वाचाऽभिधेयत्वान्न चान्यैर्देवैरितरेन्द्रियैः । तपसः सर्वप्राप्तिसाधनत्वेऽपि न तपसा गृह्यते । तथा वैदिकेनाग्निहोत्रादिकर्मणा प्रसिद्धमहत्त्वेनापि न गृह्यते । किं पुनस्तस्य ग्रहणे साधनमित्याह—ज्ञानप्रसादेनाऽऽत्मावबोधनसमर्थमपि स्वभावेन सर्वप्राणिनां ज्ञानं बाह्यविषयरागादिदोषकलुषितमप्रसन्नमशुद्धं सन्नावबोधयति नित्यं संनिहितमप्यात्मतत्त्वं मलावनद्धमिवाऽऽदर्शम् । विलुलितमिव सलिलम् । तद्यदेन्द्रियविषयसंसर्गजनितरागादिमलकालुष्यापनयनादादर्शसलिलादिवत्प्रसादितं स्वच्छं शान्तमवतिष्ठते तदा ज्ञानस्य प्रसादः स्यात् । तेन ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वो विशुद्धान्तःकरणो योग्यो ब्रह्म द्रष्टुं यस्मात्ततस्तस्मात्तु तमात्मानं पश्यते पश्यत्युपलभते निष्कलं सर्वावयवभेदवर्जितं ध्यायमानः सत्यादिसाधनवानुपसंहृतकरण एकाग्रेण मनसा ध्यायमानश्चिन्तयन् ॥ ८ ॥

**सिद्धान्ती**—या मंत्रांत ब्रह्माच्या उपलब्धीचें (प्राप्तीचें) जें असाधारण (अद्वितीय) कारण आहे, तें सांगतात, ऐका:–ज्या पक्षीं ब्रह्म हें रूपशून्य आहे, त्या पक्षीं त्याचें ग्रहण कोणाच्याही नेत्रांनीं होत नाहीं. वाणीस अगोचर म्हणून कोणत्याही वाणीनें त्याचें स्वरूप सांगतां येत नाहीं, तसेंच दुसऱ्या कोणत्याही इंद्रियांनीं त्या अमूर्ताचें ग्रहण करितां येत नाहीं. याचप्रमाणें सर्व विषयांची प्राप्ति करून देणारी तपश्चर्या येथें

उपयोगी पडत नाहीं; आणि श्रौत, अग्निहोत्रादि प्रसिद्ध व महासमर्थ कर्मांनेंही ब्रह्म-स्वरूपाची प्राप्ति होत नाहीं. सारांश, इंद्रियांस अगोचर असणारें, केवळ तपानें किंवा विहितकर्मानें प्राप्त न होणारें ब्रह्म इंद्रियांच्या, तपाच्या किंवा वैदिक-कर्मांच्या साहाय्यानें प्राप्त होत नाहीं. मग ब्रह्मप्राप्तीचें साधन तरी काय? असा प्रश्न उत्पन्न होतो. त्याचें उत्तर श्रुति सांगत आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, स्वभावतः सर्व-जीवांस आत्म-स्वरूपाचें ज्ञान करून घेण्याचें सामर्थ्य आहे. ब्रह्मज्ञान-प्राप्तीचें साधन जी शुद्ध बुद्धि ( आत्म-चैतन्य ) ती सर्वांस स्वरूपतः प्राप्त झालेली असते. पण बाह्यविषयांवरील प्रेमादिदोषांनीं कलुषित झाल्यामुळें सामान्यतः जीवांची पूर्वोक्तशुद्ध-बुद्धि अशुद्ध ( मलीन ) व अप्रसन्न झालेली असते. म्हणून जीवांच्या नित्य अतिनिकट सहवासास असणारें हें आत्मतत्त्व मलिन व चंचलबुद्धीला दिसत नाहीं. मळकट आरशांत किंवा नित्य चंचल असणाऱ्या जलांत जसें स्वच्छ प्रतिबिंब दिसत नाहीं, त्याप्रमाणें चंचल आणि मलीन जीवबुद्धीला यथार्थ ब्रह्मबिंब गोचर होत नाहीं. पण जेव्हां, ज्या वेळीं इंद्रियविषयसंगतीनें उत्पन्न झालेले रागद्वेषादि मलदोष नाहींसे होतात, त्या वेळीं बुद्धि प्रसन्न ( निर्मळ ) होते. आरशावरील मळ काढून टाकिला म्हणजे तो जसा स्वच्छ होतो, किंवा जल स्थिर झालें म्हणजे तें जसें शांत होतें, त्याप्रमाणें बुद्धीवर आलेला मळ काढून टाकिला म्हणजे ती प्रसन्न व समाहित होते. या निर्मळ व स्थिर बुद्धीच्या योगानें ज्याचें अंतःकरण शुद्ध व चैतन्यमय झालें आहे, तो मात्र ब्रह्मदर्शनाला योग्य होतो व शुद्धचित्त पुरुषाला आत्मस्वरूपाचें दर्शन होतें. हें प्रसिद्धच आहे कीं, आत्मा हा निष्कल म्हणजे सर्वप्रकारच्या अवयवादिभेदांनीं वर्जित आहे. तो निरवयव आहे. त्याचें एकाग्र व शुद्धचित्तानें ध्यान केलें, पांचव्या व सहाव्या मंत्रांत सांगितलेल्या सत्यादिसाधनयुक्तपुरुषानें आपलीं इंद्रियें निवृत्त करून एकाग्रमनानें श्रुत ब्रम्हस्वरूपाचें ध्यान केलें म्हणजे या निर्मळचित्त पुरुषाच्या प्रसन्न बुद्धीला निरवयव आत्मस्वरूपाचें दर्शन होतें. ॥ ८ ॥

**रंगरामानुज**—' ज्ञानप्रसादेन '= परमेश्वराच्या प्रसादानें.

**माध्व०**—ज्ञानरूप वायु, ब्रह्मदेव आणि परमज्ञानरूप हरि प्रसन्न झाल्याशिवाय कोणत्याही इंद्रियाच्या द्वारानें किंवा तदभिमानी देवतांच्या प्रसादानें ब्रह्मज्ञान प्राप्त होत नाहीं. इतर देवता केवल ब्रह्मापरोक्षज्ञानाला अनुकूल असणारें ज्ञानाची उत्पत्ति करण्यासाठीं इंद्रियांची प्रेरणा करितात. याचप्रमाणें शुद्धमनाशिवाय इतर कोणतेंही इंद्रिय भगवज्ज्ञान देण्याला समर्थ नाहीं.

---

## मंत्र नववा.

**एषोऽणुरात्मा चेतसा वेदितव्यो यस्मिन्प्राणः पञ्चधा संविवेश । प्राणैश्चित्तं सर्वमोतं प्रजानां यस्मिन्विशुद्धे विभवत्येष आत्मा ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ—यस्मिन् प्राणः पञ्चधा संविवेश, चेतसा एषः अणुः आत्मा वेदितव्यः** ( ज्यामध्यें मुख्य प्राण पंचरूप होऊन प्रविष्ट झाला आहे, त्या शरीरस्थहृदयानें, शुद्धबुद्धीनें, हा अत्यंत सूक्ष्म असणारा आत्मा समजून घ्यावयाचा आहे. ) **प्रजानां चित्तं प्राणैः सर्वं ओतं** ( प्राणादिकांसह जीवांचें अंतःकरण चैतन्यानें ओतप्रोत व्यापिलेलें असतें. ) **विशुद्धे यस्मिन् एषः आत्मा विभवति** ( निर्मळ झालेल्या ज्या या चित्तांत आत्मा प्रकाशित होत असतो ) तें चित्त प्राणादिकांनीं व्यापिलेलें आहे. ॥ ९ ॥

यमात्मानमेवं पश्यत्येषोऽणुः सूक्ष्मश्चेतसा विशुद्धज्ञानेन केवलेन वेदितव्यः । क्वासौ । यस्मिञ्शरीरे प्राणो वायुः पञ्चधा प्राणापानादिभेदेन संविवेश सम्यक्प्रविष्टस्तस्मिन्नेव शरीरे हृदये चेतसा ज्ञेय इत्यर्थः । कीदृशेन चेतसा वेदितव्य इत्याह—प्राणैः सहेन्द्रियैश्चित्तं सर्वमन्तःकरणं प्रजानामोतं व्याप्तं येन क्षीरमिव स्नेहेन काष्ठमिवाग्निना । सर्वं हि प्रजानामन्तःकरणं चेतनावत्प्रसिद्धं लोके । यस्मिंश्च चित्ते क्लेशादिमलवियुक्ते शुद्धे विभवत्येष उक्त आत्मा विशेषेण स्वेनाऽऽत्मना विभवत्यात्मानं प्रकाशयतीत्यर्थः ॥ ९ ॥

**सिद्धान्ती**--याप्रमाणें ज्या वेद्य व अतिसूक्ष्म आत्म्याचें शुद्धचित्ती पुरुषाला निर्मळबुद्धीनें मात्र ज्ञान व्हावयाचें तो आत्मा मुख्यतः राहतो तरी कोठें ? या प्रश्नाला येथें उत्तर दिलें आहे; ऐका: मुख्य प्राणवायु प्राणापानादिरूपांनीं भिन्नस्वरूप होऊन ज्या शरीरांत व्यवस्थेनें प्रवेश करितो त्याच शरीरांत अथवा हृदयांत हा सूक्ष्म आत्मा राहतो व येथें प्रकट होणारा आत्मा मात्र निर्मळचित्तानें ( बुद्धीनें ) जाणतां येतो. ही आत्मज्ञबुद्धि कोणत्या स्वरूपाची असते ती पहा: जीवांचें चित्त (अंतःकरण) तसेंच त्याचे प्राण व इंद्रियें हीं सर्व ज्ञानरूपानें ओतप्रोत व्यापिलेलीं असतात. दुग्धामध्यें घृत सर्वव्यापी असतें, किंवा काष्ठामध्यें ( लाकडामध्यें ) अग्नि व त्याची उष्णता सर्वत्र पसरलेलीं असतात, त्याप्रमाणें सर्व अंतर्बाह्य इंद्रियांत शुद्धबुद्धि म्हणजे चित्कला सर्वत्र

व्यापिलेली असते. जीवांचें अंतःकरण चैतन्ययुक्त आहे, ही गोष्ट व्यवहारांत ही प्रसिद्ध आहे. असो, जें अंतःकरण क्लेशादिमलांनीं अशुद्ध झालेलें नसतें, त्या अंतःकरणांत वर सांगितलेला स्वयंप्रकाश आत्मा आपल्या तेजानें स्वतःलाच प्रकाशवित होत असतो अथवा शुद्धचित्ताच्या एकाग्रज्ञानी पुरुषास प्रकट होत असतो. ॥ ९ ॥

**माध्व०**—'चित्त'=मन, बुद्धि अहंकार, चित्त, चेतन. आत्मा हा ब्रह्मापरोक्ष ज्ञानाला अवश्य असणाऱ्या संकल्पनिश्चयांची शक्ति घेऊन ज्या चित्तामध्यें प्रवेश करितो, तें चित्त खरें शुद्ध होय.

---

## मंत्र दहावा.

**यं यं लोकं मनसा संविभाति विशुद्धसत्त्वः कामयते यांश्च कामान्। तं तं लोकं जयते तांश्च कामांस्तस्मादात्मज्ञं ह्यर्चयेद्भूतिकामः ॥ १० ॥**

**इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषदि तृतीयमुण्डके प्रथमः खण्ड ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—विशुद्धसत्त्वः यं यं लोकं मनसा संविभाति यान् च कामान् कामयते, तं तं लोकं तान् च कामान् जयते** (शुद्धचित्ताचा पुरुष ज्या ज्या भुवनांचा मनानें संकल्प करितो आणि त्याच्या ज्या ज्या इच्छा असतात तो तो लोक त्याला प्राप्त होऊन त्याच्या त्या त्या इच्छाही परिपूर्ण होतात.) **तस्मात् भूतिकामः आत्मज्ञं अर्चयेत्** (म्हणून ज्याला ज्याला आपलें कल्याण करून घ्यावयाचें आहे, त्यानें आत्म्यास जाणणारी जी बुद्धि तिचें व आत्मज्ञपुरुषाचें आराधन करावें.) ॥१०॥

य एवमुक्तलक्षणं सर्वात्मानमात्मत्वेन प्रतिपन्नस्तस्य सर्वात्मत्वादेव सर्वावाप्तिलक्षणं फलमाह। यं यं लोकं पित्रादिलक्षणं मनसा संविभाति संकल्पयति मह्यमन्यस्मै वा भवेदिति विशुद्धसत्त्वः क्षीणक्लेश आत्मविन्निर्मलान्तःकरणः कामयते यांश्च कामान्प्रार्थयते भोगास्तं तं लोकं जयते प्राप्नोति तांश्च कामान्संकल्पितान्भोगान्। तस्माद्विदुषः सत्यसंकल्पत्वादात्मज्ञमात्मज्ञानेन विशुद्धान्तःकरणं

ह्यर्चयेत्पूजयेत्पादप्रक्षालनशुश्रूषानमस्कारादिभिर्भूतिकामो विभूतिमिच्छुः । ततः पूजार्ह एवासौ ॥ १० ॥

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषद्भाष्ये तृतीयमुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—मागील मंत्रांत ज्याचें स्वरूप सांगितलें तो सर्वांतर्यामी असणारा आत्मा ज्या आत्मज्ञ पुरुषाला स्वात्मत्वानें प्राप्त झाला, तो पुरुषही सर्वात्मक (ब्रह्म) झाल्यामुळें त्याला सर्व–प्राप्ति करून देणारें फल मिळतें, असें या मंत्रांत सांगितलें आहे. हा आत्मज्ञ पुरुष आपल्या मनानें जे जे पितरादि लोक आपल्यास किंवा इतरांस प्राप्त व्हावे असा संकल्प करितो, किंवा हा शुद्धचित्त, क्लेशशून्य, आत्मज्ञानी निर्मळ अंतःकरणाचा असल्यामुळें तो ज्या ज्या भोगांची स्वस्वेतरांसाठीं इच्छा करितो, ते ते लोक व ते ते भोग प्राप्त होण्याच्या या ब्रह्मज्ञ पुरुषाच्या इच्छा तृप्त होतात. सारांश, आत्मज्ञानी पुरुष सत्यसंकल्पी होतो, म्हणून या निर्मळ चित्ताच्या आत्मज्ञ पुरुषाची आराधना आपलें कल्याण इच्छिणाऱ्या प्रत्येक पुरुषानें करावी हीं योग्य आहे. ही आराधना म्हणजे पूर्वोक्त सत्पुरुषाचें पादप्रक्षालन करणें, सेवा चाकरी करणें, त्याला नमस्कार करणें, इत्यादि प्रकारची असावी. असो; हा कल्याणकारी साधुपुरुष सर्वांस वंदनीय असावा. ॥ १० ॥

**रंगरामानुज**–'संविभाति'=संकल्प करितो. 'जयते'=वश करून घेतो. आपल्या सर्व इच्छा परमेश्वर वर देऊन पूर्ण करील अशी बुद्धि धरून ऐश्वर्यकामी पुरुषानें भक्तांचे सर्व मनोरथ पूर्ण करण्यास समर्थ असणाऱ्या जगन्नियंत्या परमेश्वराची उपासना करावी.

**माध्व०**—ज्ञानी पुरुषाचे संकल्प अमोघ असतात, म्हणून त्याच्या इच्छा पूर्ण होतात.

**तृतीयमुण्डक प्रथमखण्ड समाप्त.**

# तृतीय-मुंडक।

## खंड दुसरें.

### मंत्र पहिला.

**स वेदैतत्परमं ब्रह्म धाम यत्र विश्वं निहितं भाति शुभ्रम्। उपासते पुरुषं ये ह्यकामास्ते शुक्रमेतदतिवर्तन्ति धीराः॥ १॥**

अन्वय व अर्थ—**यत्र विश्वं निहितं शुभ्रं भाति, एतत् परमं ब्रह्म धाम सः वेद** (जेथें सर्व विश्व अर्पित झालें आहे आणि हें ब्रह्मतेज स्वतेजानें स्वच्छ प्रकाशित होत आहे, तें जें श्रेष्ठ ब्रह्म, सर्व कल्याणाचें निधान आहे, तें ब्रह्म या पुरुषाला गोचर झालेलें असतें.) **हि ये अकामाः पुरुषं उपासते ते धीराः एतत् शुक्रं अतिवर्तंति** (जे निष्काम जीव या आत्मज्ञ पुरुषाची उपासना करितात, ते ज्ञानी जीव जन्ममरणाच्या पलीकडे जातात.)॥ १॥

यस्मात्स वेद जानातीत्येतद्यथोक्तलक्षणं ब्रह्म परममुत्कृष्टं धाम सर्वकामानामाश्रयमास्पदं यच्च यस्मिन्ब्रह्माणि धाम्नि विश्वं समस्तं जगन्निहितमर्पितं यच्च स्वेन ज्योतिषा भाति शुभ्रं शुद्धम्। तमप्येवमात्मज्ञं पुरुषं ये ह्यकामा विभूतितृष्णावर्जिता मुमुक्षवः सन्त उपासते परामिव सेवन्ते ते शुक्रं नृबीजं यदेतत्प्रसिद्धं शरीरोपादानकारणमतिवर्तन्त्यतिगच्छान्ति धीरा धीमन्तो न पुनर्योनिं प्रसर्पन्ति "न पुनः क्वचिद्रतिं करोति" इति श्रुतेः। अतस्तं पूजयेदित्यभिप्रायः॥ १॥

**सिद्धान्ती**—ज्याअर्थी पूर्वोक्त आत्मज्ञपुरुषाला वर सांगितलेलें ब्रह्म यथार्थ समजतें—

**शिष्य**—या ब्रह्माचें लक्षण पुन्हां एकवार सांगावें.

**सिद्धान्ती**—हें ब्रह्म उत्कृष्ट असून सर्व इच्छा परिपूर्ण होण्याचें उत्तम स्थान आहे. सर्व इच्छा व संकल्प याचाच आश्रय करून राहतात. या ब्रह्मधामांत सर्व विश्व अर्पित

झालेलें आहे आणि हें ब्रह्म आपल्या स्वयंभु प्रकाशानें देदीप्यमान असतें. याचा प्रकाश शुद्ध आणि निर्मल असतो. असो, अशा ब्रह्माचें ज्ञान ज्याअर्थी त्या ब्रह्मज्ञ पुरुषाला झालें असतें, त्याअर्थी सर्व कल्याणेच्छूंनीं त्याची आराधना करावी. आतां जे लोक विषय-संपत्तिसंबंधानें किंवा ऐहिकऐश्वर्याच्या संबंधानें निष्काम होऊन मुमुक्षु होतात आणि ब्रह्माप्रमाणेंच या आत्मज्ञ पुरुषाची सेवा करितात, ते साधक मात्र शुक्र म्हणजे पुरुषबीज अथवा शरीरोत्पत्ति होण्याचें उपादानकारण, त्याचा पराभव करितात म्हणजे जन्म-मरण चुकवितात. या निष्कामज्ञानी पुरुषांना जन्म-मरणाच्या फेऱ्यांत पडावें लागत नाहीं. हे संसाराच्या किंवा मृत्यूच्या पलीकडे जातात. 'पुनः कोणत्याही प्रकारची इच्छा या पुरुषांना होत नाहीं.' अशी श्रुतिही याला प्रमाण आहे. असो, येणेंप्रमाणें जन्म-मरण चुकवून मोक्ष मिळतो म्हणून स्वकल्याणेच्छूनें आत्मज्ञ पुरुषाची सेवा करावी. ॥ १ ॥

**रंगरामानुज**—'धाम'=श्रेष्ठ, सर्व इच्छा पूर्ण करणारा.

**माध्व०**—प्राणांत वास्तव्य करणाऱ्या ब्रह्माची उपासना केली असतां प्राणव्यापी ब्रह्माचा साक्षात्कार होतो म्हणजे मोक्ष-प्राप्ती होते. 'ब्रह्मधाम'=ब्रह्मलोक. 'विश्व'=पूर्ण. जेथें पूर्णब्रह्म आपल्या शुद्धस्वरूपानें राहतें, तो प्राण जगाचें धारण करितो. प्राण हें ब्रह्माचें प्रधान गृह आहे. श्रीभगवान् सर्वदा प्राणस्थित आहे; तथापि ज्ञान उत्पन्न झालें असतां हा जास्त प्रकाशित होतो आणि प्रकाशित झाला म्हणजे श्रेष्ठज्ञानाची उत्पत्ति करितो. 'शुक्र'=ब्रह्म. अन्य कर्मादिकांचें अतिक्रमण करून शोकरहित जो श्रीभगवान् त्यापाशीं ज्ञानी साधक प्राप्त होतो. सारांश, पूर्णस्वरूपी ब्रह्म मुख्य प्राणांत राहून जगाचें धारण करितें, म्हणून मुख्य प्राण वैकुंठापेक्षांही श्रेष्ठ आहे. आत्मज्ञपुरुषाला प्रथम ब्रह्मधामाचें (प्राणांचें) नंतर प्राणस्थ ब्रह्माचें श्रवणादि उपायांनीं ज्ञान होतें. नंतर उपासकाच्या प्राणामध्यें राहून ब्रह्म प्रकाशित, ज्ञात होतें. हा तात्पर्यार्थ आहे. या भक्तांस सालोक्यादि मुक्तिरूप वृत्ति प्राप्त होते.

---

## मंत्र दुसरा.

**कामान्यः कामयते मन्यमानः स कामभिर्जायते तत्रतत्र। पर्याप्तकामस्य कृतात्मनस्त्विहैव सर्वे प्रविलीयन्ति कामाः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—यः मन्यमानः कामान् कामयते सः तत्रतत्र कामभिः जायते** (जो जीव विषयांचें चिंतन करून अनेक इच्छा धारण करितो, तो जीव आपल्या इच्छेप्रमाणें इष्ट असणाऱ्या त्या त्या लोकांत

जन्म पावतो. ) **तु पर्याप्तकामस्य कृतात्मनः इह एव सर्वे कामाः प्रविलीयन्ति** ( पण आत्मज्ञान झाल्यामुळें ज्याच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या त्याच्या सर्व इच्छा येथेंच ह्या लोकीं व ह्याच देहांत विनाश पावतात. ) ॥ २ ॥

मुमुक्षोः कामत्याग एव प्रधानं साधनमित्येतद्दर्शयति । कामान्यो दृष्टादृष्टेष्टविषयान्कामयते मन्यमानस्तद्गुणांश्चिन्तयानः प्रार्थयते स तैः कामभिः कामैर्धर्माधर्मप्रवृत्तिहेतुभिर्विषयेच्छारूपैः सह जायते तत्रतत्र । यत्रयत्र विषयप्राप्तिनिमित्तं कामाः कर्मसु पुरुषं नियोजयन्ति तत्रतत्र तेषुतेषु विषयेषु तैरेव कामैर्वेष्टितो जायते । यस्तु परमार्थतत्त्वविज्ञानात्पर्याप्तकाम आत्मकामत्वेन परि समन्तत आप्ताः कामा यस्य तस्य पर्याप्तकामस्य कृतात्मनोऽविद्यालक्षणादपररूपादपनीय स्वेन परेण रूपेण कृत आत्मा विद्यया यस्य तस्य कृतात्मनस्त्विहैव तिष्ठत्येव शरीरे सर्वे धर्माधर्मप्रवृत्तिहेतवः प्रविलीयन्ति विलयमुपयान्ति नश्यन्तीत्यर्थः । कामास्तज्जन्महेतुविनाशान्न जायन्त इत्यभिप्रायः ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—जो मुमुक्षु आहे, त्यानें आपल्या सर्व इच्छांचा त्याग केलाच पाहिजे. कामत्याग हें मोक्षाचें मुख्य साधन आहे, असें या मंत्रांत सांगितलें आहे. पहाः जो पुरुष आपल्यास इष्ट असणाऱ्या दृष्ट विषयांची किंवा अदृष्ट विषयांची इच्छा करितो, त्या त्या विषयाचे गुणधर्म चिंतीत असतो व ते ते विषय मिळावे अशी जो याचना व उद्योग करीत असतो, त्या पुरुषाला धर्माधर्म आचरण्याची प्रवृत्ति उत्पन्न करणाऱ्या विषयेच्छेमुळें जेथें जेथें त्या इच्छा पूर्ण व्हावयाच्या असतील तेथें तेथें त्यास जन्म घ्यावा लागतो. उघडच आहे कीं हव्या असणाऱ्या विषयांच्या प्राप्तीसाठीं आपल्या इच्छा जेथें जेथें आपल्यास कर्म करावयास लावितात, तेथें तेथें म्हणजे त्या त्या विषयांच्या किंवा प्रदेशांच्या ठिकाणीं त्या त्या इच्छांसह कामीपुरुषाला जन्म घ्यावा लागतो.

पण परमार्थतत्त्वाचें, आत्मतत्त्वाचें, ज्ञान-विज्ञान झाल्यामुळें ज्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या, आत्मैकत्वप्राप्तीची मात्र इच्छा तीव्रतम झाल्यामुळें ज्याच्या सर्वविषयेच्छा परिपूर्णच झाल्या तो कृतात्मा होय. म्हणजे अविद्या किंवा अज्ञान हेंच चिह्न आहे ज्याचें असें जें अपररूप ( विषयभोगात्मक हें सर्व विश्व ) त्याचा त्याग करून ज्यानें आपल्या श्रेष्ठ आत्मस्वरूपाला विद्येनें कृत म्हणजे प्रकट केलें आहे, सारांशः जो स्वतः ब्रह्मरूप झाला आहे, त्याला कृतात्मा असें म्हणावें. असो, त्या कृतकृत्य आत्मज्ञ-

पुरुषाचें सर्व काम ( इच्छा ) येथेंच म्हणजे या शरीरांत नाश पावतात. प्रत्येक विषयेच्छा धर्म किंवा अधर्म आचरण्याला प्रवृत्ति उत्पन्न करिते हें तुला ठाऊक आहे. अर्थात् ज्ञानीपुरुषाच्या पुण्यपापकर्मप्रवर्तक इच्छा नाहींशा होतात. कारण या इच्छांचें आदिकारण जें अज्ञान त्याचा नाश ज्ञानी पुरुषानें केलेला असतो म्हणून त्याच्या विषयेच्छा नष्ट होतात व पुढेंही त्या उत्पन्न होत नाहींत ॥ २ ॥

**रंगरामानुज**—कृतात्मा=ज्ञानी आहे आत्मा ज्याचा

**माध्व**:—पर्याप्तकाम=भगवद्भक्तीची इच्छा पूर्ण झालेला.

---

## मंत्र तिसरा.

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन । यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ—अयं आत्मा प्रवचनेन न लभ्यः, मेधया न, बहुधा श्रुतेन न** ( हा आत्मा शास्त्राची पुष्कळशी चर्चा केली म्हणून प्राप्त व्हावयाचा नाहीं, तीव्रबुद्धीनें किंवा अत्यंत विस्तृत विद्वत्तेनें मिळावयाचा नाहीं. ) **एषः यं एव वृणुते तेन लभ्यः** ( हा विद्वान् पुरुष ज्या आत्मस्वरूपाची प्राप्ति इच्छितो त्या परब्रह्म इच्छिण्यानें मात्र हा परमात्मा प्राप्त होतो. ) **एषः आत्मा तस्य स्वां तनुं विवृणुते** ( हा आत्मा त्याला मात्र आपलें स्वरूप प्रकाशित करितो. ) ॥ ३ ॥

यद्येवं सर्वलाभात्परम आत्मलाभस्तल्लाभाय प्रवचनादय उपाया बाहुल्येन कर्तव्या इति प्राप्त इदमुच्यते । योऽयमात्मा व्याख्यातो यस्य लाभः परः पुरुषार्थो नासौ वेदशास्त्राध्ययनबाहुल्येन प्रवचनेन लभ्यः । तथा न मेधया ग्रन्थार्थधारणशक्त्या । न बहुना श्रुतेन नापि भूयसा श्रवणेनेत्यर्थः । केन तर्हि लभ्य इत्युच्यते । यमेव परमात्मानमेवैष विद्वान्वृणुते प्राप्तुमिच्छति तेन वरणेनैष परमात्मा लभ्यो नान्येन साधनान्तरेण । नित्यलब्धस्वभावत्वात् । कीदृशोऽसौ विदुष आत्मलाभ इत्युच्यते । तस्यैष आत्माऽविद्यासंछन्नां स्वां परां तनुं स्वात्मतत्त्वं स्वरूपं विवृणुते प्रकाशयति प्रकाश इव घटादिर्वि-

द्यायां सत्यामाविर्भवतीत्यर्थः । तस्मादन्यत्यागेनाऽऽत्मलाभप्रार्थनैवात्मलाभसाधनमित्यर्थः ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—ज्यापक्षीं आत्मलाभ हा सर्व लाभांपेक्षां अत्यंत श्रेष्ठ आहे, त्यापक्षीं आत्म-प्राप्तीसाठीं प्रवचनादि उपाय पुष्कळसे करावे म्हणजे इष्टसिद्धि होईल असें वाटण्याचा संभव आहे, त्याचें निराकरण या मंत्रांत केलें आहे. पहा, ज्या आत्म्याचें आतांपर्यंत व्याख्यान केलें, ज्याचा लाभ म्हणजे अत्यंत श्रेष्ठ पुरुषार्थ होय, तो आत्मा वेदशास्त्रांचें पुष्कळसें अध्ययन करून, ज्ञानाच्या जोरावर पुष्कळशी पांडित्य-मूलक चर्चा केली म्हणून, तो प्राप्त होणें शक्य नाहीं. तसेंच ग्रंथाचा अर्थ धारण करण्याचें सामर्थ्य असणारी अलौकिक बुद्धि असली तरीही तो सांपडावयाचा नाहीं. आणि वेदांतविचाराव्यतिरिक्त पुष्कळसें वेदांत श्रवण केलें तरीही आत्मप्राप्ति होणं अशक्य आहे. असें आहे तर आत्मप्राप्तीचें साधन तरी काय? या प्रश्नाला पुढील उत्तर आहे. तें असें कीं, हा विद्वान् ज्या आत्मस्वरूपाचें वरण ( स्वीकरण ) करितो—'मीच परमात्मा आहें' असें नित्य अनुसंधान ठेवणें म्हणजे जीवानें आत्म्याला वरणें असें होतें—असो, अशी आत्मप्राप्तीची जी ज्ञानपूर्ण इच्छा ज्ञानी साधकाला होते, त्या इच्छेनें ( त्या वरणविधीनें ) मात्र म्हणजे ती इच्छा तीव्र असून जर आतांच सांगितलेलीं साधनें केलीं तर मात्र परमात्मप्राप्ति होते. अन्य साधनानें होत नाहीं. कारण परमात्मा हा सर्व जीवांना स्वभावतःच प्राप्त झाला आहे. तो मिळवावयाचा नाहीं तर तो मिळाला आहे असें ज्ञान जीवानें करून घ्यावयाचें आहे. अर्थातच हें ज्ञान 'मीच ब्रह्म आहें' ह्या अखंड चिंतनानें प्राप्त होत असतें. असो, हा आत्मलाभ कोणत्या स्वरूपाचा असतो, तें सांगतात. अविद्येनें झांकून टाकलेलें जें आपलें परमोत्कृष्ट आत्मस्वरूप तें स्वस्वरूप परमात्मा ज्ञानीपुरुषाला प्रकट करून देतो. सूर्यादिप्रकाशामध्यें घटादिक विषय प्रकट होतो त्याप्रमाणें विद्याप्रकाश झाला म्हणजे नित्य प्राप्त असलेलें आत्म-स्वरूप प्रकट होतें. म्हणून अन्यसाधनांचा त्याग करून आत्मलाभाची प्रार्थना 'मी ब्रह्म आहें' हें अनुसंधान ठेवून करावी. हें एक मात्र आत्मप्राप्तीचें असाधारण साधन आहे. ॥ ३ ॥

**रंग०**—'प्रवचन'=मनन, 'मेधा' = निदिध्यास. केवळ श्रवण-मनन-निदिध्यासानें आत्मा प्राप्त होत नाहीं; तर हा परमात्मा ज्या उपासकाची निवड करितो त्या उपासकाला मात्र आत्म-प्राप्ति होते. सारांश, ज्याची परमेश्वरावर अत्यंत प्रीति असते त्याला मात्र परमेश्वरी साक्षात्कार होतो. उपासना हें परमेश्वरकृत प्रेमाचें द्वार आहे.

**माध्व०**—ज्ञानप्रसाराप्रमाणेंच अपरोक्षज्ञानाला विष्णुभक्तीची आवश्यकता आहे. अपरोक्षज्ञान होण्याला भगवत्प्रसन्नता अवश्य आहे. भक्ति आणि ज्ञान हीं भगवत्प्रसादाचीं द्वारें आहेत.

---

## मंत्र चवथा.

**नायमात्मा बलहीनेन लभ्यो न च प्रमादात्तपसो वाऽप्यलिङ्गात्। एतैरुपायैर्यतते यस्तु विद्वांस्तस्यैष आत्मा विशते ब्रह्मधाम ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—बलहीनेन अयं आत्मा न लभ्यः, न च प्रमादात् नापि अलिंगात् तपसः** ( हा आत्मा बलशून्य पुरुषाला मिळावयाचा नाहीं, तसेंच असावधपुरुषाला आणि लिंगशून्य तपस्व्याला मिळावयाचा नाहीं. ) **तु एतैः उपायैः यः विद्वान् यतते तस्य एषः आत्मा ब्रह्मधाम विशते** ( पण बलादि उपायांनीं जो विद्वान् आत्मप्राप्तीचा प्रयत्न करितो त्याचा हा आत्मा ब्रह्मलोकामध्यें प्रवेश करितो. ) ॥ ४ ॥

आत्मप्रार्थनासहायभूतान्येतानि च साधनानि बलाप्रमादतपांसि लिङ्गयुक्तानि संन्याससहितानि। यस्मादयमात्मा बलहीनेन बलप्रहीणेनाऽऽत्मनिष्ठाजनितवीर्यहीनेन न लभ्यो नापि लौकिकपुत्रपश्वादिविषयसङ्गनिमित्तप्रमादात्। तथा तपसो वाऽप्यलिङ्गाल्लिङ्गरहितात्। तपोऽत्र ज्ञानम्। लिङ्गं संन्यासः। संन्यासरहिताज्ज्ञानान्न लभ्यत इत्यर्थः। एतैरुपायैर्बलाप्रमादसंन्यासज्ञानैर्यतते तत्परः सन्प्रयतते यस्तु विद्वान्विवेक्यात्मवित्तस्य विदुष एष आत्मा विशते संप्रविशति ब्रह्मधाम ॥ ४ ॥

**सिद्धान्ती**—आत्म-प्रार्थना करण्यामध्यें साहाय्य करण्यासाठीं लागणारीं आत्मेच्छापूर्वक प्रवचनादिसाधनें बल, अप्रमाद, तप, व लिंगयुक्त संन्यास या चिह्नांनीं युक्त असलीं पाहिजेत, असें या मंत्रांत सांगितलें आहे. कारण, हा आत्मा बलशून्यपुरुषाला प्राप्त होत नाहीं. बल म्हणजे आत्मनिष्ठेनें उत्पन्न झालेलें अभंग सामर्थ्य होय. हें सामर्थ्य ज्याजवळ नाहीं त्याला आत्मा प्राप्त होत नाहीं. ( २ ) तसेंच व्यवहारांतील पुत्र, पशु आदि विषयांच्या संगतीनें उत्पन्न होणारा व इष्टमार्गापासून भ्रष्ट करणारा मोह ( चित्तचांचल्य ) असेल तर आत्मप्राप्ति व्हावयाची नाहीं. विषयसंगति झाली कीं, मूढता, काळजीचा भाव, इत्यादि गोष्टी प्राप्त व्हावयाच्या व जीव चुकीला पात्र व्हावयाचा. (३) तप म्हणजे ज्ञान व लिंग म्हणजे संन्यास. सन्यासरहित जें तप किंवा ज्ञान असतें, त्यांच्या साहाय्यानें ही आत्मप्राप्ति होत नाहीं. वैराग्ययुक्त ज्ञान नसणें हें मोक्षप्राप्ति होऊं देत नाहीं. असो, बल, मोहशून्यता आणि ज्ञान हीं

साधनें संन्यासपूर्वक संपादून जो तत्पर पुरुष आत्मप्राप्तीचा उद्योग करितो, तो विद्वान् पुरुष, 'मीच आत्मा आहें' असें ज्ञान असणारा पुरुष, ब्रह्मधामामध्यें प्रवेश करितो. ब्रह्मधाम म्हणजे ब्रह्मस्वरूप. हें स्वरूप त्याच्या आत्म्याला मिळतें. तो ब्रह्म होतो. ॥४॥

**रंगरामा०**—'बलहीन'=देश, काल, वैगुण्य इत्यादिकांनीं आलेली हीनता. 'तप'=तपःप्रधान संन्यासाश्रम. 'लिंग'=शिखायज्ञोपवीतादि आश्रमचिन्हें. चारी आश्रमांतील पुरुषांस ब्रह्मविद्येचा अधिकार आहे. पण आश्रमचिन्ह नसेल त्याला आत्मप्राप्ति होत नाहीं.

**माध्व०**—सात्त्विकत्व मिळवून देणारें, परमश्रद्धा उत्पन्न करणारें, फलेच्छा नाहींशी करणारें, विष्णुविषयक चिंतन करविणारें, तपाचें अनुष्ठान असतें. हीं तपाचीं लिंगें आहेत. ह्या लिंगव्यतिरिक्त झालेली तपश्चर्या ब्रह्मप्राप्तीला करण होत नाहीं.

---

## मंत्र पांचवा.

**संप्राप्यैनमृषयो ज्ञानतृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशान्ताः। ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानः सर्वमेवाऽऽविशन्ति ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—एनं संप्राप्य ज्ञानतृप्ताः, कृतात्मानः, वीतरागाः, प्रशांताः, धीराः, युक्तात्मानः ऋषयः, ते सर्वगं सर्वतः प्राप्य सर्वं एव आविशन्ति** (आत्मज्ञान झाल्यानंतर ज्ञानानें तृप्त झालेले, कृतार्थ झालेले, रागद्वेषशून्य, प्रशांत, विद्वान्, युक्तात्मे ऋषी सर्वव्यापी ब्रह्म सर्वतः प्राप्त करून घेऊन सर्वव्यापी जो परमात्मा त्याच्या स्वरूपामध्यें सर्वच्या सर्व प्रवेश करितात.) ॥ ५ ॥

कथं ब्रह्म संविशत इत्युच्यते। संप्राप्य समवगम्यैनमात्मानमृषयो दर्शनवन्तस्तेनैव ज्ञानेन तृप्ता न बाह्येन तृप्तिसाधनेन शरीरोपचयकारणेन। कृतात्मानः परमात्मस्वरूपेणैव निष्पन्नात्मानः सन्तः वीतरागा विगतरागादिदोषाः। प्रशान्ता उपरतेन्द्रियाः। त एवंभूताः सर्वगं सर्वव्यापिनमाकाशवत्सर्वतः सर्वत्र प्राप्य नोपाधिपरिच्छिन्नेनैकदेशेन। किं तर्हि तद्ब्रह्मैवाद्वयमात्मत्वेन प्रतिपद्य धीरा अत्यन्तविवेकिनो युक्तात्मानो नित्यसमाहितस्वभावाः सर्वमेव समस्तं शरीरपातकालेऽप्याविशन्ति भिन्ने घटे घटाकाशवदविद्याकृतोपाधिपरिच्छेदं जहति। एवं ब्रह्मविदो ब्रह्मधाम प्रविशन्ति ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—ब्रह्मामध्यें प्रवेश कसा होतो तें येथें सांगितलें आहे. आत्म्याचें साक्षात् ज्ञान झाल्यानंतर सर्वद्रष्टे ऋषी त्यांच ज्ञानानें तृप्त होतात. बाहेरची तृप्तिसाधनें किंवा शरीर पुष्ट करणारीं साधनें हीं त्यांस मुळींच अपेक्षित नसतात. त्यांचे आत्मे परमात्म स्वरूपानें पूर्ण झालेले असतात. ( परब्रह्म स्वरूपाशीं त्यांची एकात्मता झालेली असते ). कामक्रोधादि सर्व दोष नाहींसे होऊन ते प्रशांत म्हणजे इंद्रियनिवृत्त झालेले असतात. त्यांचीं सर्व इंद्रियें स्तब्ध व स्वाधीन झालीं असल्यामुळें त्यास अखंड शांति प्राप्त होते. अशा प्रकारच्या ज्ञानी पुरुषांस आकाशाप्रमाणें सर्वव्यापी परमात्म्याचा सर्वबाजूंनीं लाभ होतो. सर्व उपाधि नष्ट झाल्या असल्यामुळें एका मर्यादित बाजूनेंच त्यांस परमात्मलाभ होतो असें नाहीं, सर्वबाजूंनीं त्यास आत्मलाभ होतो. तात्पर्य अद्वय ब्रह्माशीं एकत्व पावून, अद्वयात्मक होऊन, सारांश, ब्रह्मरूप होऊन अत्यंत विवेकी आणि अभंग समाधिस्थितीचे ते स्थितप्रज्ञ विद्वान पुरुष शरीर–पाताच्या वेळीं ( मरणसमयीं ) सर्वच्या सर्व ब्रह्मामध्यें प्रवेश करितात. घट फुटला असतां त्यांतील आकाश सर्वथा विमुक्त होऊन महाकाशाशीं एकरूप होते. त्याप्रमाणें अविद्येनें निर्माण केलेल्या उपाधींचा व तज्जन्यमर्यादेचा त्याग करून ते ब्रह्मस्वरूपांत सामावून जातात. सारांश शरीरपात होतांक्षणीं ते हे आत्मरूप ऋषी ब्रह्मरूप होतात, हें सांगावयास नको. जीवन्मुक्त पुरुष ब्रह्मधामांत कसे शिरतात त्याचा हा वर्णन–प्रकार आहे. ॥ ५ ॥

**रंगरामानुज**—जीवदशेंत ही ब्रह्मानुभव होऊन समाधान होतें. ज्ञानीलोकांस सर्व वस्तु अंतर्बाह्य व्यापणाऱ्या देशाविशिष्टपरमात्म्याची प्राप्ति होऊन प्रत्येकास निरनिराळी सरूपता मुक्ति मिळते आणि सर्वज्ञत्व प्राप्त होऊन सर्ववस्तूंचा अनुभव येतो. ‘ ब्रह्मलोक ’=ब्रह्म हाच लोक. ‘ परांतकाले ’=शेवटच्या देहाचा पात होण्याचें वेळीं. ‘ परामृतात् ’=प्रसन्न झालेल्या ब्रह्मामुळें. व्यासाचार्यांचा ‘ परामृताः ’=असा एक पाठ आहे. त्याचा अर्थ शेवटचें शरीर पडण्याचें वेळीं श्रेष्ठ अमृत म्हणजे ब्रह्मज्ञानी लोकांस प्राप्त होतें. ब्रह्म प्राप्य आहे आणि तेंच प्रापक (ब्रह्म प्राप्त करून देणारें) आहे. ‘ विमुक्त ’=स्वरूपाचें तिरोधान करणारी ( स्वरूपाला लपविणारी ) अविद्या वासनांसह नाहींशी झालेलें.

**माध्व०**—‘सर्वतः’ हें पद मुक्त याच्याशीं अन्वित करावयाचें आहे आणि देहबंध, कर्मबंध इत्यादिकांपासून मुक्त झालेले आत्मे असा अर्थ करावयाचा आहे. ‘सर्वगं’=पृथिव्यादि सर्व तत्त्वांमध्यें प्रविष्ट झालेलें ब्रह्म (ब्रह्मस्थित वायु). सारांश, वैराग्यानें भक्ति तीव्र होऊन उपासना होते, ती विषय–वैराग्य उत्पन्न करिते, श्रवणमननादिकांनीं या भक्तांचें अंतःकरण भगवत्पर होतें आणि ज्ञानाची तृप्ति होतें. नंतर ब्रह्मदेवाची प्राप्ति होऊन त्याच्या उपदेशानें स्वरूपाचें ( जीवस्वरूपाचे ) अपरोक्ष ज्ञान होतें. हें सर्व व्याख्यान चिंतनीय आहे.

---

## मंत्र सहावा.

**वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः। ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थ--ते सर्वे वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थाः, संन्यासयोगात् शुद्धसत्त्वाः यतयः परान्तकाले परामृताः ब्रह्मलोकेषु परिमुच्यन्ति ( वेदांताच्या ज्ञानविज्ञानानें निश्चित अर्थाची प्राप्ति करून घेतलेले, संन्यासयोगानें चित्त शुद्ध झालेले, ते संन्याशी देहपाताचे वेळीं अमर होत्साते सर्वथा विमुक्त होऊन ब्रह्मलोकीं जातात. ) ॥ ६ ॥

किंच वेदान्तजनितविज्ञानं वेदान्तविज्ञानं तस्यार्थः परमात्मा विज्ञेयः सोऽर्थः सुनिश्चितो येषां ते वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः। ते च संन्यासयोगात्सर्वकर्मपरित्यागलक्षणयोगात्केवलब्रह्मनिष्ठास्वरूपाद्योगाद्यतयो यतनशीलाः शुद्धसत्त्वाः शुद्धं सत्त्वं येषां संन्यासयोगात्ते शुद्धसत्त्वाः। ते ब्रह्मलोकेषु। संसारिणां ये मरणकालास्ते परान्तास्तानपेक्ष्य मुमुक्षूणां संसारावसाने देहपरित्यागकालः परान्तकालस्तस्मिन्परान्तकाले साधकानां बहुत्वाद्ब्रह्मैव लोको ब्रह्मलोक एकोऽप्यनेकवद्दृश्यते प्राप्यते वा। अतो बहुवचनं ब्रह्मलोकेष्विति ब्रह्मणीत्यर्थः। परामृताः परममृतममरणधर्मकं ब्रह्माऽऽत्मभूतं येषां ते परामृता जीवन्त एव ब्रह्मभूताः परामृताः सन्तः परिमुच्यन्ति परि समन्तात्प्रदीपनिर्वाणवद्घटाकाशवच्च निवृत्तिमुपयान्ति। परिमुच्यन्ति परि समन्तान्मुच्यन्ते सर्वे न देशान्तरं गन्तव्यमपेक्षन्ते। "शकुनीनामिवाऽऽकाशे जले वारिचरस्य च। पदं यथा न दृश्येत तथा ज्ञानवतां गतिः"। "अनध्वगा अध्वसु पारयिष्णवः" इति श्रुतिस्मृतिभ्यो देशपरिच्छिन्ना हि गतिः संसारविषयैव। परिच्छिन्नसाधनसाध्यत्वात्। ब्रह्म तु समस्तत्वान्न देशपरिच्छेदेन गन्तव्यम्। यदि हि देशपरिच्छिन्नं ब्रह्म स्यान्मूर्तद्रव्यवदाद्यन्तवदन्याश्रितं सावयवमनित्यं कृतकं च स्यात्। न त्वेवंविधं ब्रह्म भवितुमर्हति। अतस्तत्प्राप्तिश्च नैव देशपरिच्छिन्ना भवितुं युक्ता।

**अपि चाविद्यादिसंसारबन्धापयनमेव मोक्षमिच्छन्ति ब्रह्मविदो न तु कार्यभूतम् ॥ ६ ॥**

**सिद्धान्ती**—आणखी; तत्त्वज्ञानाच्या योगानें उत्पन्न झालेलें जें विज्ञान तें वेदांतविज्ञान होय. त्या ज्ञानाचा ज्ञेयविषय परमात्मा आहे. वेदान्तविज्ञानानें ज्यांनीं परमात्म्याचें विज्ञान निश्चित केलें आहे तें वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थ होत. त्यांनीं संन्यासयोगाचा, म्हणजे सर्व कर्माचा सर्वथा त्याग हें आहे लक्षण ज्याचें त्या योगाचा आश्रय केला असल्यामुळें, सारांश, केवळ ब्रह्मनिष्ठेचें अनुष्ठान अखंड करून ज्ञानयोगाची सिद्धि केली असल्यामुळें त्यांनीं इंद्रियादिकांचें दमन करून आपलें अंतःकरण निर्मळ आणि निर्भेळ केलें असतें. ते ऋषी संसाराच्या अखेरीस—

**शिष्य**—परांतकाल म्हणजे मरणकाल असा अर्थ आहे.

**सिद्धान्ती**—होय. संसारी लोकांचा मरणकाल म्हणजे परांतकाल होय. पण मुमुक्षूंचा संसार संपला, विषयेच्छा संपून आत्मज्ञान झालें म्हणजेच त्यांचा देहाशीं संबंध सुटतो आणि त्यांनीं देहपरित्याग केला असें होतें. हाच त्याचा परांतकाल होय. तात्पर्य देहावसान–समयींच–जिवंतपणींच– हे साधकलोक ब्रह्मलोकामध्यें प्रवेश करितात. साधक अनेक आहेत म्हणून ब्रह्मलोक हा शब्द अनेक वचनांत झाला आहे. ब्रह्म हाच जो लोक तो ब्रह्मलोक होय. एक असून ही साधकांच्या अनेकत्वानें हा ब्रह्मलोक अनेकरूपांनीं असल्यासारखा दिसतो किंवा साधकांस प्राप्त होतो. ब्रह्मलोकांमध्यें म्हणजे ब्रह्मांत साधकांचा प्रवेश होतो. स्वभावतः ब्रह्म मरणधर्मशून्य आहे. म्हणून ते परामृत ( पराकाष्टेचे अमृत )–स्वरूपाचे होतात. तात्पर्य ते ब्रह्म होतात. केव्हां? जिवंत असतांनाच! असो; ते ब्रह्मरूप होतात आणि प्रदीपाचा निर्वाणसमय आला, घटाकाशाची घटोपाधि संपली म्हणजे दीप अथवा घटाकाश स्वरूपीं मिळून निवृत्त होतात, अदृश्य होतात, त्याप्रमाणें हे लोक जेथें असतील तेथेंच सर्वबाजूंनीं सर्वथा मुक्त होतात. यांना देशांतराला जावें लागत नाहीं. इतकेंच नव्हे तर देश काल, इत्यादि सर्व उपाधी यांच्या संबंधानें स्वरूपतः नष्ट होतात. ‘आकाशामध्यें संचार करणारे पक्षी उडत असतां आणि जलांत राहणारे मत्स्यमगरादि पोहत असतां त्यांचीं पावलें जशीं दिसत नाहींत, त्याप्रमाणें ज्ञानीलोकांची ही मुक्तिस्थितीमध्यें गति दिसत नाहीं.’ कारण, ब्रह्म सर्वत्र असल्यामुळें स्वभावतः ज्ञानीलोकांचें गमनागमन संपलेलें असतें. ‘मार्गांतून पार जाऊं इच्छिणारे ज्ञानीलोक कोणत्याच मार्गाचा स्वीकार करीत नाहींत’ इत्यादि श्रुति स्मृति ज्ञानीलोकांस गमनागमनाची उपाधि नसते असें सांगतात. संसारी लोकांचें गमनागमन ( यातायात ) देशकालांनीं परिच्छिन्न, मर्यादित झालेलें असतें. कारण त्यांचें परिच्छिन्न साध्य विषयपरिच्छिन्नसाधनानींच मिळावयाचे असतात. परंतु ब्रह्म हें सर्व आणि सर्वव्यापी आहे म्हणून त्याकडे जातांना देशकालादि मर्यादांचा अवलंब अनावश्यक असतो. खरेंच आहे, ब्रह्म हें देशपरिच्छिन्न आहे

असें समजलें तर तें मूर्तद्रव्यासारखें उत्पन्न व नष्ट होणारें, परतंत्र, सावयव, अनित्य आणि उत्पन्न झालेलें ( उत्पन्न केलेलें ) अशा स्वरूपाचें होईल. पण ब्रह्म मूर्त द्रव्य नाहीं; त्याला जन्म मरण नाहीं, तें स्वतंत्र, निष्कल, नित्य आणि स्वयंभु आहे म्हणून त्याला देशपरिच्छेद नाहीं. अर्थातच त्याची प्राप्तिही नियमितदेशीं होत नाहीं. ही प्राप्ति सर्वत्र होते. ब्रह्मवेत्ते मोक्षाची इच्छा करितात ते कांहीं नवीन वस्तु प्राप्त व्हावी अशा भावनेनें करीत नाहींत. तर अविद्येनें जें संसारादि बंधन प्राप्त झालें असतें त्या बंधनाचा निरास करणें हाच त्यांचा मोक्ष असतो. मोक्षही उत्पन्न होणारी वस्तु नाहीं. असो, हे लोक मुक्त होतात ते येथल्या येथेंच होय. ॥ ६ ॥

**माध्व०**—'परांतकाल'=पर म्हणजे ब्रह्मवर्षशत, त्याचा अंत म्हणते ब्रह्मदेवाचीं साडेबारा वर्षें. सारांश महर्लोकादिक सोडून देऊन व विरजानदींत स्नान करून परामृत ( नित्यमुक्त, लक्ष्मीकृत प्रकृतिबंधापासून मुक्त झालेले ). परानृत असाही एक पाठ आहे ' संन्यासयोग '=भगवदर्पण बुद्धीनें केलेलीं स्ववर्णाश्रमोचित कर्में. ' वेदांत '=सर्व वेदार्थनिर्णय. हा श्रवण, मनन व निदिध्यासानें होतो.

---

## मंत्र सातवा.

**गताः कलाः पञ्चदश प्रतिष्ठा देवाश्च सर्वे प्रति देवतासु । कर्माणि विज्ञानमयश्च आत्मा परेऽव्यये सर्व एकीभवन्ति ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ—पंचदश कलाः प्रतिष्ठाः गताः, च सर्वे देवाः देवतासु प्रति** ( पंधरा प्राणादि कला आपापल्या कारणस्थानाप्रत जातात; आणि सर्व इंद्रियें आपापल्या आधिदैविक कारणांत लीन होतात ) **कर्माणि विज्ञानमयः च आत्मा सर्वे परे अव्यये एकीभवन्ति** ( सर्व कर्में आणि विज्ञानमय आत्मा हीं सर्व अत्यंत श्रेष्ठ जें अव्यय ब्रह्म त्यामध्यें एकरूप होतात. ) ॥ ७ ॥

किंच मोक्षकाले या देहारम्भिकाः कलाः प्राणाद्यास्ताः स्वां स्वां प्रतिष्ठां गताः स्वं स्वं कारणं गता भवन्तीत्यर्थः । प्रतिष्ठा इति द्वितीयाबहुवचनम् । पञ्चदशसंख्याका या अन्त्यप्रश्नपरिपठिताः प्रसिद्धा देवाश्च देहाश्रयाश्चक्षुरादिकरणस्थाः सर्वे प्रति देवतास्वादित्यादिषु गता भवन्तीत्यर्थः । यानि च मुमुक्षुणा कृतानि कर्माण्यप्रवृत्तफलानि प्रवृत्तफलानामुपभोगेनैव क्षीयमाणत्वाद्विज्ञानमयश्चाऽऽत्माऽविद्याकृ-

तद्बुद्ध्याद्युपाधिमात्मत्वेन मत्वा जलादिषु सूर्यादिप्रतिबिम्बवदिह प्रविष्टो देहभेदेषु कर्मणां तत्फलार्थत्वात्सह तेनैव विज्ञानमयेनाऽऽत्मना । अतो विज्ञानमयो विज्ञानप्रायः । त एते कर्माणि विज्ञानमयश्चाऽऽत्मोपाध्यपनये सति परेऽव्ययेऽनन्तेऽक्षये ब्रह्मण्याकाशकल्पेऽजेऽजरेऽमृतेऽभयेऽपूर्वेऽनपरेऽनन्तरेऽबाह्येऽद्वये शिवे शान्ते सर्व एकीभवन्त्यविशेषतां गच्छन्त्येकत्वमापद्यन्ते जलाद्याधारापनय इव सूर्यादिप्रतिबिम्बाः सूर्ये घटाद्यपनय इवाऽऽकाशे घटाद्याकाशाः॥७॥

**सिद्धान्ती**—आणखी; मोक्षकाल प्राप्त झाला म्हणजे देहाला आरंभ करणाऱ्या ज्या प्राणश्रद्धादि पंधरा* कला आहेत. त्या आपापल्या कारणांमध्यें जाऊन लीन होतात. जसें प्राण मुख्यप्राणामध्यें जाऊन तेथें लीन होतो. मंत्रांतील प्रतिष्ठा हें पद द्वितीयांत असून अनेकवचनीं आहे. या पंधरा कला कोणत्या, त्या प्रश्नोपनिषदाच्या सहाव्या प्रश्नांत सांगितल्या आहेत व त्या प्रसिद्धही आहेत. मंत्रांतील 'देवाः' हें पद देहाच्या आश्रयानें राहणारीं नेत्रादिइंद्रियें आहेत त्यांच्या ठिकाणीं राहणाऱ्या प्रसिद्ध अधिष्ठात्री देवता होत. या सर्व देवता आपापल्या कारणस्वरूपांत म्हणजे आदित्यादिकांत जाऊन मिसळतात. तसेंच, मुमुक्षूनें केलेल्या कर्मांपैकीं जीं फलोन्मुख झालीं होतीं, त्यांचें फल भोगण्यासाठीं त्याला देह प्राप्त झाला आहे व त्यांचा क्षय उपभोगानें या जन्मांत झाला म्हणून त्यांचा विचार कर्तव्य नाहीं. पण जीं कर्में फलोन्मुख झालीं नाहींत, तीं कर्में आणि विज्ञानमय आत्मा हीं सर्व—

**शिष्य**—विज्ञानमय आत्मा म्हणजे ?

**सिद्धान्ती**—अविद्येनें मन, बुद्धि आदि उपाधि निर्माण केल्या म्हणजे त्या उपाधींनीं युक्त जो जीव हाच आपला आत्मा असें समजून अज्ञानी जीव व्यापार करीत असतात. आतां जलप्रवाहांमध्यें सूर्यादिकांचीं प्रतिबिंबें पडतात त्याप्रमाणें आत्मा हा अनेक देहांमध्यें पूर्वकर्मानुसार प्रवेश करितो आणि कर्माचें फल भोगण्यासाठीं विज्ञानमय कोशांत वास्तव्य करितो. हाच विज्ञानमय आत्मा होय. याला ज्ञान असतें पण तें अज्ञानमिश्रित असतें. असो; सर्व उपाधी नाहींशा झाल्यानंतर ज्ञानीपुरुषांचीं फलोन्मुख न झालेलीं सर्व कर्में आणि त्यांचे अज्ञानशून्य विज्ञानमय आत्मे हीं सर्वश्रेष्ठ, अव्यय, अनंत, अक्षय अशा आकाशतुल्य ब्रह्मामध्यें जाऊन त्या अज, अजर, अमृत, अभय, अपूर्व, अनपर ( अद्वितीय ), अनंतर ( एकरस ), अबाह्य ( सर्वव्यापी ), अद्वय, शिव ( सर्वमंगल ), आणि शांत अशा ब्रह्मस्वरूपांत एकरूप होतात. येथें सर्व भेदाभेद, सर्व विशेष मावळून जातात आणि सर्व एकमय होऊन जातें. जलादिकांचा आधार

* कला सोळा आहेत; पण येथें कर्मांचा उच्चार झाला आहे म्हणून १५ कलांचा मात्र निर्देश आहे.

झाली ( पाणी नाहींसें झालें म्हणजे ) सूर्यादिकांचीं प्रतिबिंबें सूर्यांत जाऊन मिळतात. किंवा घटादिकांचा स्फोट झाला म्हणजे घटाकाशादि आकाशांत जाऊन मिळतात व एकरूप होतात, त्याप्रमाणें मुक्तलोकांचीं कर्मैं आणि त्यांचे आत्मे उपाधीनाशानंतर ब्रह्मस्वरूपांत जाऊन मिळतात व एकरूप होतात. ॥ ७ ॥

**रंगरामानुज**—येथें पंधरा कलांचा उल्लेख आहे. प्रश्नोपनिषदांतील कर्मनामक कला वजा केली म्हणजे प्रश्नोपनिषदांतील सोळा कलांचा हिशोब लागतो. या सर्व कला आपापल्या आधिदैविक कारणांत जाऊन राहतात, लीन होत नाहींत. कल्पपर्यंत इंद्रियादि सर्व स्वस्वरूपांत असतात, असें श्रुतीचें सांगणें आहे. ‘ कर्माणि ’ = फलोन्मुख न झालेलीं कर्में. ब्रह्माचें यथास्वरूप ज्ञान होण्याच्या वेळीं या कर्मांचा क्षय परमेश्वरी संकल्पानें होतो. ‘ एकीभवन्ति ’ = नामरूपात्मक भेदांचा मात्र त्याग होतो.

**माध्व०**—“एकीभवन्ति ” एकविषयक बुद्धी होते, समान ऐश्वर्य प्राप्त होतें. या मुक्तीला सार्ष्टि व चतुर्भुजत्वादि सारूप्य मिळणें याला सरूपता मुक्ति म्हणतात. एकदेशस्थिति असणें याला सलोकतामुक्ति म्हणतात. आणि भगवंताजवळ नित्य राहणें याला समीपता मुक्ति म्हणतात. याप्रमाणें एकीभवन म्हणजे ब्रह्म होणें नव्हे. एक नसेल ते एक होणें असा एकीभवनाचा अर्थ आहे. जीव आणि ब्रह्म हे स्वभावतः प्रथम एक नसतील तर केव्हांही एक होणे शक्य नाहीं. तात्पर्य एकीभाव म्हणजे स्वरूपैक्य नव्हे. एकाठिकाणीं राहणें किंवा एक-विषयक-मति होणें हा अर्थ आहे. येथें अद्वैतमतवाद्यांचा अर्थ सर्वथा चुकला आहे !

---

## मंत्र आठवा.

**यथा नद्यः स्यन्दमानाः समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय । तथा विद्वान्नामरूपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ—यथा स्यंदमानाः नद्यः नामरूपे विहाय समुद्रे अस्तं गच्छन्ति** ( ज्याप्रमाणें प्रवाहशील नद्या आपापल्या नामरूपास सोडून देऊन समुद्रांत प्रवेश करितात आणि नदीस्वरूपानें नाहींशा होतात.) **तथा नामरूपात् विमुक्तः विद्वान् दिव्यं परात्परं पुरुषं उपैति** ( त्याप्रमाणें नामरूपापासून विमुक्त झालेला ज्ञानी साधक दिव्य आणि परेहून पर–श्रेष्ठ असणाऱ्या श्रेष्ठ-पुरुषाप्रत जाऊन एकरूप होतात.) ॥८॥

किंच यथा नद्यो गङ्गाद्याः स्यन्दमाना गच्छन्त्यः समुद्रे समुद्रं प्राप्यास्तमदर्शनमविशेषात्मभावं गच्छन्ति प्राप्नुवन्ति । नाम च रूपं च नामरूपे विहाय हित्वा तथाऽविद्याकृतनामरूपाद्विमुक्तः सन्विद्वान्परादक्षरात्पूर्वोक्तात्परं दिव्यं पुरुषं यथोक्तलक्षणमुपैत्युपगच्छति ॥ ८ ॥

**सिद्धान्ती**—आणखी; ज्याप्रमाणें प्रवाहवती गंगादिनद्या समुद्राजवळ गेल्या म्हणजे आपापलीं नामरूपें टाकून देऊन आंत शिरतात, अस्तंगत होतात, भेदशून्य होतात, समुद्राशीं एकरूप होतात, त्यांचें विशेष स्वरूप नाहींसें होतें, त्याप्रमाणें अज्ञानानें उत्पन्न केलेल्या नामरूपांपासून विमुक्त झालेला विद्वान् मागें वर्णिलेल्या अक्षराच्याही पलीकडे असणारा जो दिव्य पुरुष, परमात्मा, त्याप्रत जाऊन त्याच्याशीं तादात्म्य पावतो. परमात्म्याचें लक्षण मागें सांगितलेंच आहे. ॥ ८ ॥

**रंगरामानुज**—या मंत्राचें कठवल्लींत विस्तारानें स्पष्टीकरण आलें आहे. तात्पर्य हें आहे कीं, मुक्त जीव परमेश्वरसदृश होतो, परमेश्वर होत नाहीं. या प्रवचनाचा विस्तार कठोपनिषदांत पहावा. जीवानें ब्रह्म होणें यांच्या मतें अशक्य आहे.

**माध्व०**—नद्या, समुद्रांत जाऊन मिसळतात परंतु त्या एकरूप होत नाहींत. कारण वायु हा नद्यांचें मात्र उदक घेऊन मेघ उत्पन्न करितो, हें आपल्यास स्पष्ट दिसतें. त्याचप्रमाणेंच जीव मुक्त झाले तरी त्यांचीं नामरूपें आपल्यास समजत नाहींत हें खरें, तथापि त्यांचीं नामरूपें नाहींशीं होत नाहींत. मंत्रांतील ‘विमुक्त’ याचा अर्थ अनुक्त असा आहे. तसेंच ‘नामरूपे विहाय’ या पदांत नामरूपे या पदापुढें अविग्रह असून नामरूपे अविहाय असा पाठ ठेविला पाहिजे, असा श्रुतीचा अभिप्राय आहे.

---

## मंत्र नववा.

**स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति । तरति शोकं तरति पाप्मानं गुहाग्रन्थिभ्यो विमुक्तोऽमृतो भवति ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ**—**यः ह वै तत् परमं ब्रह्म वेद सः ब्रह्म एव भवति** ( जो कोणी तें अतिश्रेष्ठ परब्रह्माचें ज्ञान करून घेतो तो ब्रह्मच होतो. ) **अस्य कुले अब्रह्मवित् न भवति** ( याच्या कुलांत ब्रह्म न जाणणारा पुरुष उत्पन्न होत नाहीं. ) **शोकं तरति, पाप्मानं तरति, गुहाग्रंथिभ्यः विमुक्तः अमृतः भवति** ( याचा शोक म्हणजे मनःसंताप नाहींसा

होतो, पापबुद्धि संपते आणि हृदयग्रंथींपासून हा विमुक्त होतो, अर्थातच अमर होतो.) ॥ ९ ॥

ननु श्रेयस्यनेके विघ्नाः प्रसिद्धा अतः क्लेशानामन्यतमेनान्येन वा देवादिना च विघ्नितो ब्रह्मविदप्यन्यां गतिं मृतो गच्छति न ब्रह्मैव। न। विद्ययैव सर्वप्रतिबन्धस्यापनीतत्वात् अविद्याप्रतिबन्धमात्रो हि मोक्षो नान्यः प्रतिबन्धः। नित्यत्वादात्मभूतत्वाच्च। तस्मात्स यः कश्चिद्ध वै लोके तत्परमं ब्रह्म वेद साक्षादहमेवास्मीति स नान्यां गतिं गच्छति। देवैरपि तस्य ब्रह्मप्राप्तिं प्रति विघ्नो न शक्यते कर्तुम्। आत्मा ह्येषां स भवति। तस्माद्ब्रह्मविद्वान्ब्रह्मैव भवति किंच नास्य विदुषोऽब्रह्मवित्कुले भवति। किंच तरति शोकमनेकेष्टवैकल्यानिमित्तं मानसं संतापं जीवन्नेवातिक्रान्तो भवति। तरति पाप्मानं धर्माधर्माख्यं गुहाग्रन्थिभ्यो हृदयाविद्याग्रंथिभ्यो विमुक्तः सन्नमृतो भवतीत्युक्तमेव भिद्यते हृदयग्रन्थिरित्यादि ॥ ९ ॥

**शिष्य**—भगवन्! कल्याणाच्या मार्गांत अनेक विघ्नें असतात, हें प्रसिद्ध आहे. म्हणून अनेक क्लेशांपैकीं एक किंवा दुसरा क्लेश मोक्षमार्गाच्या आड येऊन उभा राहणार, निदान कोणा देवादिकांकडून तरी ब्रह्मवेत्त्यांस विघ्नें प्राप्त होणार, तेव्हां ब्रह्मवेत्ता जरी असला तरी त्याला ब्रह्मप्राप्ति न होतां कोणत्यातरी अन्य गतीला तो मेल्यावर गेला पाहिजे, असें झालें?

**सिद्धान्ती**—नाहीं. सर्वविघ्नांचा नाश करणारी ब्रह्मविद्या त्याचें साहाय्य करून विघ्नांचा नाश करीत असते. मोक्षाला प्रतिबंध होतो तो अविद्येमुळें मात्र होतो. अविद्या हाच मोठा अहितकारी प्रतिबंध आहे. दुसरा प्रतिबंध नाहीं. तेव्हां अविद्याप्रतिबंध ब्रह्मविद्येनें नाहींसा झाला म्हणजे ब्रह्मप्राप्तीला दुसरा बंध येणें शक्य नाहीं, म्हणून अविद्या नाहींशी झाली म्हणजे नित्य असणारा मोक्ष आत्मवेत्त्याला मिळतो. कारण, मोक्ष म्हणजेच आत्मतत्त्व आहे. असो; आत्मवेत्ता मोक्षरूपच असतो. मग त्याला विघ्न कसलें? हें स्पष्ट करण्यासाठीं श्रुति म्हणते कीं, जो कोणी मुमुक्षु या लोकीं त्या अतिश्रेष्ठ ब्रह्माचें ज्ञान करून घेतो 'मीच साक्षात् ब्रह्म आहें' असा ज्याचा निश्चय होतो.' त्याला दुसरी तिसरी गति मिळणें शक्य नाहीं. प्रत्यक्ष देवांना सुद्धां त्याच्या ब्रह्मप्राप्तीमध्यें विघ्न आणितां येत नाहीं. कारण, त्या देवांचाही तो आत्मा होऊन बसतो. अर्थातच ब्रह्म जाणणारा विद्वान् ब्रह्म होतो. तसेंच या विद्वानाच्या कुलांत कोणीही अब्रह्मज्ञानी पुरुष उत्पन्न होत नाहीं. आणखी; अनेक इष्टानिष्ट गोष्टींमुळें होणारा मानसिक संताप त्याला होत नाहीं. इतकेंच नव्हे तर तो जीवंत असतांनाही शोकमोहांच्या पलीकडे जाऊन राहतो. त्याचें सर्व धर्माधर्ममूलक कर्म किंवा पुण्यपापरूप फल संपतें. तो धर्मा-

धर्माच्या कक्षेंतून बाहेर पडतो आणि हृदयांत अविद्येनें उत्पन्न केलेल्या ग्रंथी असतात त्या सर्व तोडून टाकून त्यांच्यापासून तो मुक्त होतो, तो अमर होतो, इत्यादि मागील एका मंत्रांत ( मुण्डक २।२।८ ) विस्तारानें सांगितलें आहे. ॥ ९ ॥

**रंगरामानुज**—' ब्रह्मैव भवति '=ब्रह्मरूप होतो.

**माध्व०**—ज्याला ब्रह्म ज्ञान होतें, तो जीव स्वतःचें स्वरूप असेल तें पूर्ण करून घेतो. 'ब्रह्म भवति'=पूर्ण होतो, तो परमात्मस्वरूपी होत नाहीं. कारण, तो परतंत्र आहे व त्याचें स्वरूप ब्रह्माहून निराळें आहे, हें याच उपनिषदांत अनेक वेळ सांगितलें आहे आणि भगवान् बादरायणांचाही अभिप्राय असाच आहे. शिवाय, न्याय असा आहे कीं, बाधक वस्तु असेल तर श्रुतीच्याही अर्थाचा संकोच करावा. जीव आणि ब्रह्म यांमध्यें अत्यंत भेद आहे हें श्रुतीला, स्मृतीला, इतिहासाला व पुराणांना मान्य आहे; म्हणून येथील श्रुतीच्या अर्थाचा संकोच करून ब्रह्म भवति म्हणजे जीव आपलें मूळरूप पावतो, असें समजावें. हें स्वरूप ब्रह्मस्वरूपाहून निराळें आहे.

---

## मंत्र दहावा.

**तदेतदृचाऽभ्युक्तम्—क्रियावन्तः श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठाः स्वयं जुह्वत एकर्षिं श्रद्धयन्तः। तेषामेवैतां ब्रह्मविद्यां वदेत शिरोव्रतं विधिवद्यैस्तु चीर्णम्॥१०॥**

**अन्वय व अर्थ—तत् एतत् ऋचा अभ्युक्तं** (ऋग्वेदांतील एका मंत्रांत हें सर्व असें म्हटलें आहे.) **क्रियावंतः, श्रोत्रियाः, ब्रह्मनिष्ठाः, एकर्षिं स्वयं जुह्वतः, श्रद्धयंतः,** ( क्रियावान् , वेदवेत्ते, ब्रह्मनिष्ठ, श्रद्धावान् , स्वतः एकर्षि नामक अग्नीला हविर्भाग देणारे श्रद्धावंत जे कोणी असतील ) **यैः विधिवत् शिरोव्रतं चीर्णं तेषां एव एतां ब्रह्मविद्यां वदेत** ( व ज्यांनीं विधिपूर्वक शिरोव्रताचें—मस्तकावर अग्नि धारण करण्याचें-व्रत सिद्धीस नेलें आहे, त्यांना मात्र ही ब्रह्मविद्या सांगावी.)॥१०॥

अथेदानीं ब्रह्मविद्यासंप्रदानविध्युपप्रदर्शनेनोपसंहारः क्रियते । तदेतद्विद्यासंप्रदानविधानमृचा मन्त्रेणाभ्युक्तमभिप्रकाशितम् । क्रियावन्तो यथोक्तकर्मानुष्ठानयुक्ताः । श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठा अपरस्मिन्ब्रह्मण्यभियुक्ताः परब्रह्मबुभुत्सवः स्वयमेकर्षिमेकर्षिनामानमग्निं जुह्वते जुह्वति श्रद्धयन्तः श्रद्दधानाः सन्तो ये तेषामेव संस्कृतात्मनां

पात्रभूतानामेतां ब्रह्मविद्यां वदेत ब्रूयाच्छिरोव्रतं शिरस्यग्निधारण-लक्षणम्। यथाऽऽथर्वणानां वेदव्रतं प्रसिद्धम्। यैस्तु यैश्च तच्चीर्णं विधिवद्यथाविधानं तेषामेव च ॥ १० ॥

**सिद्धान्ती**—आतां यानंतर ब्रह्मविद्येचें संप्रदान कसें करावें याचा विधि सहज सांगून उपनिषदाचा उपसंहार केला आहे. ब्रह्म-विद्येचें संप्रदान कसें करावें याचा विधि एका ऋग्मंत्रानें स्पष्ट प्रकाशित केला आहे, तो असा. जे कोणी वेदविहित कर्माचें अनुष्ठान अखंड करितात, ज्यांनीं वेदाचें साग्र व पोक्त अध्ययन केलें आहे; ज्यांची अपरब्रह्माचे ठिकाणीं उत्कृष्ट निष्ठा असून ज्यांना परब्रह्म जाणण्याची इच्छा आहे, जे स्वतः एकर्षि-नामक अग्नीला हविर्भाग देतात आणि ज्यांची आस्तिक्य बुद्धि प्रखर आहे, त्या अंतःकरण संस्कृत झालेल्या व ब्रह्मविद्येचा उपदेश ग्रहण करण्याची योग्यता संपादन केलेल्या श्रेष्ठ लोकांपैकीं ज्यांनीं मस्तकावर अग्निधारण करण्याचें व्रत यथासांग संपादिलें आहे, त्यांना मात्र ब्रह्मविद्येचा उपदेश करावा. आथर्वणांना प्रसिद्ध वेदव्रत सांगितलें आहे, तें हेंच प्रस्तुत मंत्रातील शिरोव्रत होय. ॥ १० ॥

**रंगा०**—एका ऋत्विजानें मात्र साध्य होणाऱ्या अग्निहोत्ररूपी उपासनेची देवता जो अग्नि त्याला एकर्षि म्हणतात. एकर्षि म्हणजे परमात्मा असाही अर्थ होईल. शिरोव्रतासंबंधानें श्रीमद्रामानुजाचार्य शारीरक (३।३।३) या सूत्रावर व्याख्यान करतांना म्हणतात कीं, प्रत्येकशाखेनें निरनिराळी उपासना सांगितली आहे. तथापि प्रत्येक उपासनेचें तात्पर्य एकच असून ब्रह्मप्राप्तिरूप फल ही एकच आहे. मुख्य गोष्ट अशी सांगावयाची आहे कीं, आपापल्या शाखेचें अध्ययन सांगोपांग झालें असलें म्हणजे उपनिषद्रूपी स्वाध्यायाला संस्कृतत्व येतें. उपनिषदाच्या अध्ययनाचें विशेष अंग अग्निची उपासना हें आहे. विद्येचें अंग नाहीं. वेदविहित उपासना अवश्य आहे व ती प्रत्येक शाखेला निरनिराळी सांगितली आहे; तरी सर्वांचें तात्पर्य उपासनेच्या संस्कृतीमध्यें मात्र आहे. भिन्न उपासना स्वरूपतः एकरूप व उपास्यही एकरूपच आहे. म्हणून प्रत्येक मुमुक्षूनें शिरोव्रतरूपीच उपासना केली पाहिजे असे नाहीं. स्वशाखेंत विहित केलेली उपासना सिद्ध झाली म्हणजे तत्कार्य होतें; हा फलितार्थ आहे. मात्र हें लक्षांत ठेवावयाचें कीं, मुण्डकोपनिषदाचें **अध्ययन** करणारानें शिरोव्रताचें अध्ययन केलेलें असलें पाहिजे.

**माध्व०**—यांचा 'एकऋषीन्' असा पाठ आहे एक-ऋषि = ब्रह्मविद्यासंप्रदाय-प्रवर्तक ऋषी होत.

---

## मंत्र अकरावा.

**तदेतत्सत्यमृषिरङ्गिराः पुरोवाच नैतदचीर्णव्रतोऽधीते । नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ॥ ११ ॥**

इति तृतीयमुण्डके द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

**अन्वय व अर्थ—तत् एतत् सत्यं अंगिराः ऋषिः पुरा उवाच** ( याप्रमाणें पूर्वीं अंगिरा ऋषीनें ब्रह्मरूपी सत्य प्रकट केलें ) **अचीर्णव्रतः एतत् न अधीते** ( जो व्रतस्थ राहात नाहीं त्याला हें सत्य अधीत करितां येणार नाहीं. ) **परमऋषिभ्यः नमः, परमऋषिभ्यः नमः** ( ह्या श्रेष्ठ ऋषींस नमस्कार असो, ह्या श्रेष्ठ ऋषींस नमस्कार असो. ) ॥ ११ ॥

तदेतदक्षरं पुरुषं सत्यमृषिरङ्गिरानाम पुरा पूर्वं शौनकाय विधिवदुपसन्नाय पृष्टवत उवाच । तद्वदन्योऽपि तथैव श्रेयोर्थिने मुमुक्षवे मोक्षार्थं विधिवदुपसन्नाय ब्रूयादित्यर्थः । नैतद्ग्रन्थरूपचीर्णव्रतोऽचरितव्रतोऽप्यधीते न पठति । चीर्णव्रतस्य हि विद्या फलाय संस्कृता भवतीति । समाप्ता ब्रह्मविद्या सा येभ्यो ब्रह्मादिभ्यः पारम्पर्यक्रमेण संप्राप्ता तेभ्यो नमः परमऋषिभ्यः । परमं ब्रह्म साक्षाद्दृष्टवन्तो ये ब्रह्मादयोऽवगतवन्तश्च ते परमर्षयस्तेभ्यो भूयोऽपि नमः । द्विर्वचनमत्यादरार्थं मुण्डकसमाप्त्यर्थं च ॥ ११ ॥

इति तृतीयमुण्डकोपनिषद्भाष्ये द्वितीयः खण्ड ॥ २ ॥

इति श्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यस्य परमहंसपरिव्राजकाचार्यस्य श्रीमच्छंकरभगवतः कृतावाथर्वणमुण्डकोपनिषद्भाष्यं समाप्तम् ॥

**सिद्धान्ती**—याप्रमाणें तें हें अक्षररूपी ( पुरुषोत्तमरूपी ) सत्य पूर्वीं अंगिराऋषीनें शौनकाला प्रथमतः सांगितलें. शौनक हा शिष्यांस योग्य अशा शास्त्रपद्धतीनें येऊन या ऋषीस प्रश्न विचारता झाला होता आणि दयाघन ऋषींनीं शौनकांस हें ब्रह्मतत्त्व प्रकट केलें. शौनकाप्रमाणें दुसरा कोणीही श्रेयोर्थी मुमुक्षु विधिवत् प्राप्त झाला असतां त्याला ब्रह्मवेत्त्या'व तत्त्वदर्शी आचार्यानें हें सत्य ( ब्रह्मतत्त्व ) सांगणारें उपनिषद् कृपाळूपणें सांगावें, हा तात्पर्यार्थ आहे. ज्यानें विहितव्रताचें आचरण केलें

नाहीं, तो या ग्रंथाचे किंवा ग्रंथांत सांगितलेल्या ब्रह्मतत्त्वाचें अध्ययन सुद्धां करणार नाहीं आणि केलें तरी त्यांस तें समजणार नाहीं; कारण, व्रतनिष्ठ पुरुषानें अधीत केलेली विद्या मात्र फलप्रद होते, हें समजून घ्यावें.

येथें ब्रह्मविद्येचा उपदेश संपला. ब्रह्मादिक ज्या आचार्यांपासून संप्रदायपरंपरेनें ही विद्या आजपर्यंत चालत आली त्या श्रेष्ठ ऋषींस आम्ही नमस्कार करितों. ज्या श्रेष्ठपुरुषांनीं परब्रह्माचें साक्षात् दर्शन घेतलें म्हणजे ज्या ब्रह्मादिकांना संपूर्ण ब्रह्मज्ञान-विज्ञान झालें आणि म्हणून ज्यांना परम ऋषी असें म्हणतात, त्यांना पुनः नमस्कार करितों. परम म्हणजे ब्रह्म ज्यांनीं साक्षात् पाहिलें आहे, ते परम ऋषी होत. त्यांना नमस्कार असो. येथें दोनदां नमस्कार-वचन आहे ते अत्यंत आदर दर्शविण्यासाठीं आणि मुण्डकोपनिषत् समाप्त झालें, हें दाखविण्यासाठीं अवतीर्ण झालें आहे. ॥ ११ ॥

**माध्व०**—या प्रमाणें अंगिरा ऋषि शौनकाला जगत्-कर्तृत्वादि गुणविशिष्ट सत्य-ब्रह्माचें ( श्री भगवान् विष्णूचें ) व्याख्यान करिता झाला.

**तृतीय मुण्डकाचें द्वितीय खंड समाप्त.**

**मुंडकोपनिषत्समाप्त.**

**श्रीमच्छंकराचार्यकृत आथर्वण मुण्डकोपनिषद्भाष्याचें भाषांतर समाप्त झालें.**

# मुण्डकोपनिषत्.

## संपादकाचें विवरण.

ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः ।
भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवाँसस्तनूभिः ।
व्यशेम देवहितं यदायुः ॥
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।

### मंत्र पहिला.

**ॐ ब्रह्मा देवानां प्रथमः संबभूव विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता । स ब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठामथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—विश्वस्य कर्ता, भुवनस्य गोप्ता, ब्रह्मा देवानां प्रथमः संबभूव ( सर्व अनंत ब्रह्मांडांचा कर्ता व त्यांचा पालक ब्रह्मदेव हा सर्व देवांच्या आधीं उत्पन्न झाला. ) **सः जेष्ठपुत्राय अथर्वाय सर्वविद्याप्रतिष्ठाम् ब्रह्मविद्याम् प्राह** ( आपला ज्येष्ठ पुत्र जो अथर्वा त्याला ब्रह्मदेवानें ब्रह्मविद्येचा स्पष्ट उपदेश केला. ही ब्रह्मविद्या इतर सर्वविद्यांची प्रतिष्ठा आहे. ) ॥ १ ॥

मंत्राचा अर्थ स्पष्ट आहे. सृष्टीची उत्पत्ति आणि स्थिति चालविणें ज्या देवाचें काम आहे, तो ब्रह्मदेव सृष्टीमध्यें अंतःपाती असणाऱ्या इतर सर्व देवांच्या आधीं व सृष्टीपूर्वीं उत्पन्न झाला असला पाहिजे. आणि सर्वांहून ज्येष्ठ म्हणून त्या सर्व इतर देवांच्याहून श्रेष्ठ आणि स्वतःच्या ज्ञानानें आणि कर्मानेंही श्रेष्ठ असा असला पाहिजे, हें उघड आहे. ज्या अलौकिक प्रेरणेनें ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली व त्याला विश्वकर्तृत्वाचें

आणि विश्वपालनाचें कर्तृत्वज्ञान, कर्तृत्वसामर्थ्य आणि कर्तृत्वाची इच्छा प्राप्त झाली, त्याच प्रेरणेनें ब्रह्मदेवाला ब्रह्मविद्येचेंही ज्ञानविज्ञान झालें असलें पाहिजे, हेंही उघड आहे. सारांश, ब्रह्मविद्या ही अपौरुषेय असली पाहिजे हें स्पष्ट आहे. ब्रह्म-स्वरूप सर्वज्ञानकर्मेंद्रियांस व मनोबुद्धींस अगोचर आहे. हें पुढें याच उपनिषदांत सांगितलें आहे. तेव्हां ब्रह्म-विद्येचें ज्ञानविज्ञान ब्रह्मदेवाला झालें असेल, तें केवळ ब्रह्म-प्रेरणेनें व तत्प्रसादानें मात्र झालें असलें पाहिजे. ब्रह्म प्रेरणेनें मात्र ज्या ज्ञान-विज्ञानाची प्रवृत्ति होते, ती ब्रह्म-विद्या होय. ही विद्या सर्वश्रेष्ठ आहे आणि इतर सर्व विद्यांचें आश्रय-स्थान असून ( माहेरघर असून ) त्या सर्वांची ती विद्या नियामक असली पाहिजे हेंही स्पष्ट आहे. सारांश, इतर सर्व विद्यांस अस्तित्व देऊन त्यांचें नियमन करणारी जी विद्या ती ब्रह्म-विद्या होय. या विद्येचा उपदेश ब्रह्मदेवानें आपला ज्येष्ठ पुत्र जो अथर्वा याला केला हेंही योग्य तेंच झालें. सामान्यतः ज्येष्ठ पुत्रावर पित्याचें निरतिशय प्रेम असतें, हा सर्वत्र अनुभव आहे आणि पित्याला जें ज्ञान-विज्ञान प्राप्त झालेलें असतें तें त्या पुत्राला प्रथमतः मिळण्याचा विशेष संभव असतो, तेव्हां हा येथील ब्रह्मोपदेश व्यवहारस्थितीस सर्वथा योग्यच आहे. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**अथर्वणे यां प्रवदेत ब्रह्माऽथर्वा तां पुरोवाचाङ्गिरे ब्रह्मविद्याम् । स भारद्वाजाय सत्यवहाय प्राह भारद्वाजोऽङ्गिरसे परावराम् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—यां अथर्वणे ब्रह्मा प्रवदेत, तां ब्रह्मविद्यां अथर्वा पुरा अङ्गिरे प्रोवाच** ( जी ब्रह्मविद्या ब्रह्मदेवानें अथर्वणाला सांगितली, ती अथर्वणानें अंगिरा नामक पुत्राला किंवा शिष्याला सांगितली ) **भारद्वाजाय सत्यवहाय सः परावराम् प्राह, भारद्वाजः अङ्गिरसे** ( अंगिरानें भारद्वाजकुलोत्पन्न सत्यवहाला ही परावर विद्या उपदेशिली आणि भारद्वाजानें अंगिरसाला सांगितली. ) ॥ २ ॥

या मंत्रांत शुद्ध संप्रदाय-परंपरा सांगितली आहे. ब्रह्म-विद्या काय किंवा इतर कोणतीही विद्या काय, संप्रदायपद्धतीनें पुत्रपरंपरेला किंवा शिष्यपरंपरेला प्राप्त झाली असतां तिचें शुद्ध स्वरूप कलुषित होण्याचा संभव फार कमी असतो. पिता अथवा गुरु यांचें अध्ययन पूर्ण असलें पाहिजे व त्याचप्रमाणें पुत्र किंवा शिष्य हे एकनिष्ठतेनें श्रवण मनन करणारे आणि श्रद्धेनें विद्या ग्रहण करणारे असले पाहिजेत. अध्ययनाची व अध्यापनाची परंपरा जितकी जास्त शुद्ध राहील तितक्या जास्त स्वच्छतेनें

कोणत्याही विद्येचा दानप्रतिग्रह होत असतो, हें सांगावयास नको. असो, मंत्रांत ब्रह्म-विद्येला ‘ परावरा ’ हें विशेषण उपयोजिलें आहे, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**शौनको ह वै महाशालोऽङ्गिरसं विधिवदुपसन्नः पप्रच्छ । कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ—महाशालः शौनकः वै अङ्गिरसं विधिवत् उपसन्नः पप्रच्छ ह** ( महाशाल—आपला गृहस्थाश्रम उत्तमरीतीनें चालविणारा—शुनकपुत्र शौनक पूर्वोक्त अंगिरसनामक आचार्याकडे शास्त्रशुद्धपद्धतीनें गेला आणि त्यांस शरण जाऊन पुढील प्रश्न करिता झाला. ) **भगवः ! कस्मिन् नु विज्ञाते इदं सर्वं विज्ञातं भवति इति** ( हे भगवन्, कोणत्या वस्तूचें विज्ञान झालें असतां हें सर्व विज्ञात होतें ! शौनकानें हा प्रश्न अंगिरसाला केला आहे. ) ॥ ३ ॥

या मंत्रांत मुंडकोपनिषदाची उत्पत्ति मानवी जगांत कशी व केव्हां झाली, ब्रह्मविद्या सांगण्याचा प्रसंग केव्हां व कोठें उत्पन्न झाला, हें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें येथें सहज ओघानें असें सुचविलें आहे कीं, ब्रह्मविद्येचें अध्ययन कोणत्याही वर्णांतील कोणत्याही आश्रमीयाला करितां येतें. मात्र ब्रह्मविद्या अध्ययन करूं इच्छिणारा विद्यार्थी सदाचरणी असला पाहिजे आणि आचार्याकडे शिक्षणाप्रीत्यर्थ जातांना श्रुत्युक्त नियमांचें यथाशास्त्र अनुपालन करणाराही असला पाहिजे. सारांश, तो अधिकारसंपन्न असला पाहिजे. असो, येथें शौनकानें जो प्रश्न विचारला आहे तो सर्वप्रकारें संस्मरणीय आहे. ब्रह्मविद्या किंवा तत्त्वज्ञान म्हणजे काय? याचें स्पष्ट स्वरूप या शौनकप्रश्नांत अवतीर्ण झालें आहे. कोणत्या एका वस्तूचें ज्ञान-विज्ञान झालें असतां या दृश्य विश्वाचा, त्यांतील सामर्थ्यांचा म्हणजे ज्ञानाचा व जीवानें या विश्वाशीं कोणत्या तऱ्हेनें वागलें असतां इष्टतम पुरुषार्थाची सिद्धि होईल, इत्यादि आचरणाचा उलगडा होतो. असा या प्रश्नाचा अर्थ आहे. या प्रश्नावरून दुसरी अशी एक गोष्ट अनुमानितां येते कीं, शौनकाला अंगिरस आचार्याकडे येण्यापूर्वींच नित्यानित्यविवेक प्राप्त झाला होता. त्याला या जगाचा जो शास्त्रशुद्ध अनुभव आला होता, त्यावरून त्याला असें स्पष्ट कळून चुकलें होतें कीं, सर्व ज्ञानांस आणि सर्वकर्मांस अंतर्भूत करून त्यांस अस्तित्व देणारी आणि सर्वांस नियमित करून त्या सर्वांची व्यवस्था लावणारी कांहीं एक सर्व-विलक्षण वस्तु अस्तित्वांत

असली पाहिजे. ह्या वस्तूचें ज्ञान–विज्ञान झालें असतां त्याच्या जोरावर इतर सर्व चवदा विद्या व चौसष्ट कला यांचें यथार्थ स्वरूप समजावयास पाहिजे, असा त्याचा आस्तिक्य-बुद्धीनें ग्रह झाला होता असें दिसतें आणि आणखी एक गोष्ट श्रीमच्छंकराचार्यांनीं सांगितली आहे, तीही लक्षांत ठेवण्यासारखी आहे. शौनककालापर्यंत शिष्यांनीं गुरुजीकडे कसें जावें हें निश्चितपणानें ठरलें होतें, निदान ठरलेलें असल्यास इतर शिष्य ब्रह्मविद्येच्या अध्ययनाचे नियम स्पष्टरीतीनें पाळीत होते, असें या उपनिषदावरून तरी स्पष्ट दिसत नाहीं. तेव्हां असें एक अनुमान निघण्याचा संभव आहे कीं, शौनकाच्या कालापर्यंत हे नियम ठरले तरी नव्हतें, किंवा ठरले असल्यास त्यांची अम्मलबजावणी यथास्थित रीतीनें होत नव्हती; किंवा निदान ती अम्मलबजावणी होत असली तरी तिचा स्पष्ट उच्चार करण्याचें कारण यावेळेपर्यंत घडलें नव्हतें. असो; तात्पर्य हें आहे कीं, शौन-कानें आत्मकल्याणार्थ अनुपाळिलेले नियम जगत्कल्याणासाठीं प्रकट करण्याची यावेळीं आवश्यकता स्पष्ट झाली आणि श्रुतीनें ती नमूद करून ठेविली. पहिल्या मुंडकाच्या दुसऱ्या खंडांतील शेवटच्या दोन मंत्रांत मुमुक्षु–शिष्यानें कोणते नियम अवश्य पाळिले पाहिजेत, याचा स्पष्ट उच्चार झाला आहे. प्रत्येकानें हे नियम अवश्य पाळिले पाहिजेत, असा प्रस्तुत मंत्राचा आणि आतांच सांगितलेल्या दोन मंत्रांचा अभिप्राय आहे, हें मुख्य रहस्य होय. ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**तस्मै स होवाच । द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद्ब्रह्मविदो वदन्ति परा चैवापरा च ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—तस्मै सः उवाच ह** ( शौनकाला अंगिरस आचा-र्यांनीं हें उत्तर दिलें ) **द्वे विद्ये वेदितव्ये इति** ( कीं दोन प्रकारच्या विद्या जाणून घ्यावयाच्या आहेत. ) **परा च एव अपरा च इति ह यत् ब्रह्मविदः वदन्ति स्म** ( परविद्या आणि अपरविद्या अशीं ज्यांना ब्रह्मवेत्ते नांवें देतात. त्या ह्या दोन विद्या होत. ) ॥ ४ ॥

या मंत्रांत दोन विद्या समजून व संपादून घेतल्या पाहिजेत, असें मंत्रद्रष्ट्या आचार्यांनीं सांगितलें आहे. या दोन विद्या म्हणजे एक परविद्या आणि दुसरी अपरविद्या, या होत. यांचीं लक्षणें काय? स्वरूप कसें, इत्यादिकांचा विस्तार पुढें व्हावयाचा आहे. येथें मला 'वेदितव्य' या पदाचा अर्थ स्पष्ट करण्याची आवश्यकता वाटते. सर्व विश्वाचा उलगडा कोणत्या वस्तूच्या ज्ञानानें होईल असा प्रश्न आहे आणि त्याला उत्तर हें मिळालें आहे कीं, हा उलगडा होण्यासाठीं दोन प्रकारच्या विद्यांचें अध्ययन करून

त्या दोन्हीही विद्या यथार्थस्वरूपानें समजून घेतल्या पाहिजेत. परविद्येचें ज्ञान ज्या पुरुषार्थसिद्धीसाठीं अवश्य आहे, त्याच पुरुषार्थाच्या सिद्धीसाठीं अपरविद्येचें ज्ञानही अत्यंत अवश्य आहे. अपरविद्येचे विषय, त्यांचें ज्ञान व त्यांसाठीं करावें लागणारें कर्म यांचा त्याग, मोक्षार्थ-पुरुषार्थ-सिद्धीसाठीं अवश्य आहे व असला पाहिजे, ही गोष्ट मलाही संमत आहे. तथापि ज्या वस्तूचा त्याग करावयाचा त्या वस्तूचें पूर्ण ज्ञान-विज्ञान आपल्यास झालें असलें पाहिजे, हें निर्विवाद आहे. शिवाय परावस्तचा विषय जें ब्रह्म ह्याचें पूर्ण ज्ञान झालें असलें तरी तें ज्ञान किंवा ती ज्ञानवस्तु ही अपरविद्येचा विषय जें व्यवहारज्ञान आणि व्यवहारसिद्धीसाठीं अवश्य करावें लागणारें जें कर्म त्या ज्ञानाचा व कर्माचा, या सर्वांचा अंतर्भाव कसा करते हें आपल्यास पूर्णपणें समजेल तर एक वस्तु विज्ञात झाली असतां हें सर्व विज्ञात होतें, हें जें तत्त्वज्ञानाचें किंवा ब्रह्मविद्येचें लक्षण आहे, त्याची पूर्ण सार्थकता होईल. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिष-मिति । अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—तत्र अपरा** ( अपरविद्येचे पुढील विषय आहेत. ) **ऋग्वेदः, यजुर्वेदः, सामवेदः, अथर्ववेदः, शिक्षा, कल्पः, व्याकरणं, निरुक्तं, छंदः, ज्योतिषं इति** ( ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष हे अपराविद्येचे विषय होत ) **अथ परा** ( नंतर परविद्येचें लक्षण सांगितलें आहे. ) **यया तत् अक्षरं अधिगम्यते** ( ज्या विद्येनें त्या अविनाशी वस्तूचें ज्ञान होतें व तिची प्राप्ति ही ज्या विद्येच्या साहाय्यानें होते तिला परविद्या असें म्हणावें. ) ॥ ५ ॥

या मंत्रांत अपर आणि परविद्येचे विषय सांगून त्यांचीं लक्षणेंही समजतील, असें त्यांचें वर्णन केलें आहे. अपरविद्येंत ऋग्वेदप्रमुख चारी वेद आणि शिक्षा-कल्पादि सहा अंगें, यांचा अंतर्भाव होतो. ऋग्वेदादिवेदांत सर्व प्रकारचे ऐहिक व स्वर्गीय ज्ञानांचीं व इहलोकसंबंधी व स्वर्गसंबंधी कल्याण करून घेण्यास साधनीभूत असणाऱ्या नीतीचीं आणि धर्माचीं तत्त्वें सांगितलेलीं असतात. शिक्षा-कल्पादि जीं सहा उपांगें आहेत, तीं वेद म्हणण्याच्या कामीं, त्याचा अर्थ करण्याच्या कामीं, यज्ञ कर-

ण्याच्या कामीं, इत्यादि वैदिक कर्मांस उपयोगी पडणारीं आहेत. तात्पर्य, विश्वाच्या संबंधानें आपण कसें वागावें? कसें वागलें असतां जीवाचें ऐहिय व स्वर्गीक दृष्टीनें कल्याण होईल, असा विचार वेद आणि ब्राह्मण यांत केलेला असावयाचा. तात्पर्य ज दिसत–भासत आहे, जें अपूर्व पण पुढें दृश्य व्हावयाचें आहे व जें विषयसुख देणारें आहे, त्याचा विचार ऋग्वेदादि अपरविद्येच्या विषयांत केला आहे. आणि परविद्येचा विषय अक्षर हा आहे. अक्षर या पदाचे अनेक अर्थ आहेत; त्यांत व्याकृत जगत्, अव्याकृत मूल–प्रकृति, हिरण्यगर्भ आणि या सर्वांचा आत्मा असून त्यांस नियमित करणारा नित्य, अविकारी, सर्वव्यापी परमात्मा हे चार अर्थ या उपनिषदांतच प्राप्त झाले आहेत. या मंत्रांत मात्र शेवटीं सांगितलेला अर्थ इष्ट आहे. येथें अक्षर म्हणजे ब्रह्म होय. या ब्रह्माचें ज्ञान–विज्ञान करून देऊन म्हणजे सर्वत्र ब्रह्म आहे असा निश्चय करवून त्याची प्राप्ति होण्याचे श्रवण–मननादि उपाय सांगणें हें परविद्येचें काम आहे ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुःश्रोत्रं तदपाणिपादम् । नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययं यद्भूतयोनिं परिपश्यन्ति धीराः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थ—यत् अद्रेश्यं, आग्रह्यं, अगोत्रं, अवर्णं, अचक्षुःश्रोत्रं, अपाणिपादं, तत् नित्यं, विभुं, सर्वगतं, सुसूक्ष्मं** ( जें कर्ण–नेत्रादि इंद्रियांस पाहतां ऐकतां येत नाहीं; ज्याचें ग्रहण हस्तपादादिकांनीं करितां येत नाहीं; ज्याच्या उत्पत्तीला कारण असत नाहीं; जें स्वतः कोणत्याहीं दृष्टीनें कारण होत नाहीं, ज्याला नेत्रकर्णादि इंद्रियें नाहींत, हस्तपादादि अवयव नाहींत, जें स्वभावतः नित्य, सर्वगामी, सर्वव्यापी, सर्वसूक्ष्म आहे ) **यत् धीराः भूतयोनिं परिपश्यंति तत् अव्ययं** ( विद्वान्, बुद्धिवान्, आणि विवेकी लोक ज्याला भूतयोनि असें तात्त्विक दृष्टीनेंपाहतात तें अव्यय आहे. ) ॥ ६ ॥

या मंत्रांत ब्रह्मस्वरूपाचीं लक्षणें सांगून त्याचें वर्णन केलें आहे. हें ब्रह्म अद्रेश्य म्हणजे परिच्छिन्नजीवांच्या इंद्रियांचा विषय होणारें नाहीं, हें पाहतां–ऐकतां येण्यासारखें नाहीं. तसेंच इंद्रियांच्या साहाय्यानें प्राप्त होणाऱ्या ज्ञानावर संस्कार करून ज्ञानविषयास

नामरूप देणाऱ्या मनोबुद्धीलाही हें ब्रह्म अगोचर आहे. सारांश, परिच्छिन्न इंद्रियांचा व परिच्छिन्न मनोबुद्धींचा ज्ञानविषय होण्यासारखें हें नाहीं. विश्वाचें ज्ञान आपल्यास होतें, विश्व ज्ञेयवस्तु असते, त्याप्रमाणें हें ज्ञेयवस्तु नाहीं. याप्रमाणेंच अवयवांनीं ग्रहण करण्यासारखी किंवा मनोबुद्धींनीं ग्रहण करण्यास येणाऱ्या सुख-दुःखासारखी ही वस्तु नाहीं. ब्रह्मवस्तु ज्ञेय नाहीं व ग्राह्यही नाहीं. म्हणून, इंद्रियावयवांचे विकार ब्रह्मावर होत नाहींत; तें नित्य आहे व सर्वांचें नियामक आहे. ब्रह्म अगोत्र आहे म्हणजे कारणशून्य आहे, तें अवर्ण आहे म्हणजेही तें कार्यशून्य आहे. तें कार्य-कारणशून्य आहे, तें विकार्य नाहीं किंवा विकारीही नाहीं, म्हणून तें सर्वव्यापी असतें. गोत्र म्हणजे आपण ज्या ऋषि-वंशांत उत्पन्न झालों त्याचा मूळपुरुष होय. ब्रह्म केव्हांच उत्पन्न झालें नाहीं, म्हणून त्याला गोत्र नाहीं. याचप्रमाणें तें अवर्ण आहे, म्हणजे त्याला जाति नाहीं. व्यवहारांत आपण म्हणतों त्याप्रमाणें त्याला 'जात-गोत' कांहीं नाहीं; म्हणून तें अनादि आणि अनंत असें आहे. त्याला चक्षुःश्रोत्रादि इंद्रियें नाहींत किंवा हस्तपादादि अवयव नाहींत. दुसरा पदार्थ पहावयाचा असल्यास किंवा मिळवावयाचा असल्यास इंद्रियांची व अवयवांची आवश्यकता असते. ब्रह्माला इंद्रियावयव नाहींत, असें श्रुतीनें सांगितलें आहे. त्यावरून एक स्पष्ट असा ध्वनि निघतो कीं, ब्रह्माशिवाय परमार्थतः दुसरी वस्तुच नाहीं, हें तत्त्व सांगण्याचा श्रुतीचा अभिप्राय आहे. यावरून तें अत्यंत सूक्ष्म असलें पाहिजे, असें झालें. अत्यंत सूक्ष्मवस्तु इंद्रियशून्य व अवयवशून्य असते, हें प्रसिद्ध आहे. आकाशाला अवयव नाहींत हें कोणास ठाऊक नाहीं ? तसेंच तें अव्ययही आहे; कारण अत्यंत सूक्ष्मवस्तूला विकार करणारी दुसरी वस्तूच नसते. यामुळें ब्रह्मासारखी सूक्ष्म वस्तु अव्यय अथवा विकारशून्य असते. तात्पर्य ब्रह्म ही वस्तु नित्य, अनाद्यनंत, कार्य-कारणशून्य, सर्वव्यापी, एक आणि अव्यय अशी आहे. इच्यापासूनच सर्व भूतें उत्पन्न होतात म्हणजे आपल्यास दृश्यमान होणारें चराचर विश्व व त्यांतील सुख-दुःखें हीं सर्व ब्रह्माच्या अधिष्ठानावर दृश्य-भास्य होतात. सर्व विश्वाचें अधिष्ठान ब्रह्म आहे, आणि तें एक असून नित्य, एकरस, सर्वत्र घनदाट पसरलेलें, सर्व-स्वामी आणि विकारशून्य आहे, असें विद्वान् आणि विवेकी पुरुषांस समजतें. विवेकी पुरुषांस उपयोगी पडणारें हें ब्रह्मलक्षण आणि ब्रह्मवर्णन आहे. या ब्रह्माचें ज्ञान पराविद्येनें मात्र होतें, असें मागच्या मंत्रांत सांगितलेंच आहे. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च यथा पृथिव्यामो-षधयः संभवन्ति । यथा सतः पुरुषात्केशलोमानि तथाऽक्षरात्संभवतीह विश्वम् ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ—यथा ऊर्णनाभिः सृजते गृह्णते च, यथा पृथिव्यां ओषधयः संभवन्ति, यथा सतः पुरुषात् केशलोमानि, तथा अक्षरात् विश्वं इह संभवति** ( ऊर्णनाभि म्हणजे कोळी जाळें निर्माणकरून त्याचा लय करितो, पृथ्वीमधून वृक्ष वनस्पती आदि स्थावरजंगम पदार्थ उत्पन्न होतात व तेथेंच लयाला जातात. आणि जिवंतपुरुषापासून केश, लोम, इत्यादि उत्पन्न होऊन नाहींशीं होतात, त्याप्रमाणेंच अक्षर जें परब्रह्म त्यापासून हें सर्व चराचर, मूर्तामूर्त, विश्व म्हणजे ब्रह्मांड उत्पन्न होतें आणि तेथेंच तें लयास ही जातें. ) ॥ ७ ॥

ब्रह्म-वस्तु एक आणि अव्यय आहे, तर सृष्टि कशी उत्पन्न झाली, सृष्टीचा कर्ता कोण, सारांश, सृष्टीची उपादान आणि निमित्त कारणें कोणतीं, अशी शंका येईल. तिचें उत्तर तीन दृष्टांत घेऊन या मंत्रांत दिलें आहे. कोणत्याही अन्य उपादान कारणाची अपेक्षा न करतां कोळी आपल्या शरीरांतून तंतु बाहेर काढून त्यांचें जाळें निर्माण करितो आणि इष्ट कार्य झालें म्हणजे ते आपल्या शरीरामध्यें ओढून घेतो, हें उदाहरण असें दर्शवितें कीं, अन्य उपादानकारण नसतांही कोळ्यांस एक लहानशी सृष्टि उत्पन्न करितां येऊन तिचा उपसंहारही करितां येतो. पृथ्वीच्या दृष्टांतांत निमित्तकारणाचा अभाव आहे. आणि तिसऱ्या दृष्टांतांत जीवासारख्या ज्ञानी पुरुषापासून केश-लोमादिकासारखे नित्य वाढणारे परंतु अज्ञानी असणारे पदार्थ उत्पन्न होतात व त्यांचें उपादानकारण व निमित्त-कारण तोच असतो असें सामान्य व्यवहारांत दिसतें. तात्पर्य निमित्त व उपादान कारणें नसतांही एका पदार्थाला दुसरे स्वविलक्षण पदार्थ निर्माण करितां येतात व त्यांचा लयही करितां येतो, असें सामान्य व्यवहारांत दिसतें. सर्वांस अनुभवही असाच आहे. तेव्हां एक आणि अव्यय ब्रह्माला अनेकरूपी व कमी-अधिक होणारी सृष्टि निर्माण करितां येणें अशक्य नाहीं, हें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. वरील दृष्टांत हे केवळ दृष्टांतापुरतेच घ्यावयाचे आहेत. केवळ समजूत पडावी यासाठीं या दृष्टांतांची उपयोजना केलेली आहे. आपल्यास बोध घ्यावयाचा आहे, तो इतकाच कीं परमार्थ-दृष्टीनें एक असणारी वस्तु व्यवहारांत अनेक आणि स्वरूप-विलक्षण झाली आहे असें दिसतें. सृष्टि अनेकरूपी आहे आणि क्षय- वृद्धि पावणारी आहे; तेव्हां तिच्या उत्पत्ति-लयाला कांहींतरी एक आणि अव्यय असें कारण असलें पाहिजे, असें शास्त्रशुद्ध व्यावहारिक दृष्टीला वाटत असतें आणि व्यवहारांत हें वाटणें नीट आहे म्हणून व्यावहा-रिक दृष्टीची व्यावहारिक समजूत पडावी एतदर्थ मात्र हे व्यावहारिक दृष्टांत उपयोगी पडतात आणि एक वस्तु अनेकरूपी कशी होते, अव्ययवस्तूपासून विकारी पदार्थ कसे

उत्पन्न होतात, हें व्यावहारिक रीतीनें दाखविण्यासाठीं मात्र मंत्रांतील दृष्टांतांचा उपयोग होतो. या प्रश्नाची विशेष चर्चा मी उपसंहारांत करणार आहें. ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**तपसा चीयते ब्रह्म ततोऽन्नमभिजायते । अन्ना-
त्प्राणो मनः सत्यं लोकाः कर्मसु चामृतम् ॥ ८ ॥**

अन्वय व अर्थ—ब्रह्म तपसा चीयते ( ज्ञानरूपी तपानें ब्रह्म संपन्न होतें. ) ततः अन्नं अभिजायते ( त्यापासून अन्न—अव्यक्त मूळ प्रकृति—उत्पन्न होते. ) अन्नात् प्राणः, मनः, सत्य, लोकाः, कर्मसु अमृतम् च ( अन्नापासून प्राण, त्यापासून मन, सत्य, पंचमहाभूतें—सप्तभुवनें, कर्म आणि उपभोगाशिवाय विनाश न पावणारी कर्मफलें उत्पन्न होतात. ) ॥ ८ ॥

या मंत्रांत परब्रह्मापासून सृष्ट्युत्पत्तीचा क्रम कसा असतो तें सांगितलें आहे. प्रथमतः—सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी,—परब्रह्म ज्ञानधारकाच्या रूपानें आविर्भूत होऊन सृष्टि उत्पन्न करण्याचा संकल्प ज्ञानरूपानें सिद्ध करितें. या संकल्पापासून अन्न म्हणजे मूल—प्रकृति ( चराचर सृष्टीचें उपादान—कारण ) उत्पन्न होते. मूल प्रकृतीपासून प्राण ( चेतनशक्ति ) प्रकट होतो. पुढें प्राणापासून संकल्प—विकल्प—निश्चयादि स्वरूपाचें मन, त्यापासून आकाश, वायु, आदि पंचमहाभूतें, त्यापासून भूर्भुवादि अनेक लोक, त्यांमध्यें कर्म आणि कर्मापासून उत्पन्न होणारें अमृत ( कर्मफल ) असा या विविधसृष्टीच्या उत्पत्तीचा क्रम आहे. ध्यानांत ठेवावयाचें हें आहे कीं, केवल ज्ञानरूपी ब्रह्म ज्ञानी होऊन नंतर सृष्टीच्या उत्पत्तीचा संकल्प पूर्वसृष्टींतील कर्मसंचयानुसार सिद्ध करितें. हा संकल्प ज्ञानी हिरण्यगर्भ करितो आणि तो सिद्ध करण्यासाठीं अनादि जी मूलप्रकृति तिला आविर्भूत करितो. इच्यापासूनच चराचर सृष्टि उत्पन्न होते. प्रथमतः प्राण, नंतर मन, या क्रमानें कर्मफलापर्यंतची सृष्टि ही हिरण्यगर्भ आणि मूल प्रकृति यांच्या द्वारासिद्ध होते. ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**यः सर्वज्ञः सर्वविद्यस्य ज्ञानमयं तपः । तस्मादेत-
द्ब्रह्म नाम रूपमन्नं च जायते ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ—यः सर्वज्ञः, सर्ववित्, यस्य ज्ञानमयं तपः** (जो सर्वज्ञ आहे, ज्याला सर्वांचें विशेष ज्ञान आहे, ज्याची तपश्चर्या ज्ञानरूप असते, ) **तस्मात् एतत् ब्रह्म, नाम, रूपं, अन्नं च जायते** (त्यापासून हें दृश्य ब्रह्म, नाम, रूप आणि अन्न यांची उत्पत्ति मागच्या मंत्रांत सांगितलेल्या क्रमाप्रमाणें होते. ) ॥ ९ ॥

या मंत्रांत उत्पत्तीच्या क्रमाचा उपसंहार केला आहे. उत्पत्तीचा विस्तार पुढें दुसऱ्या मुंडकाच्या पहिल्या खंडांत सांगावयाचा आहे. येथें केवळ इतकेंच सांगितलें आहे कीं, मायेचा सत्त्व नामक विकार स्वीकृत करून ब्रह्म सगुण होतें. हें झाल्या-नंतर त्याला पुढें जी काय सृष्टि करावयाची आहे, त्याचें सामान्य ज्ञान आणि सृष्टी-तील प्रत्येक पदार्थांचें विशेषज्ञान संकल्परूपानें आविर्भूत होतें. आपल्या सत्त्वगुणात्मक ज्ञानाच्या सामर्थ्यानें हें सगुण ब्रह्म पुढें होणाऱ्या सृष्टीचा सर्व–सामान्य आणि विशेष नकाशा आपल्या संकल्पामध्यें अवतीर्ण करितें. आणि नंतर तेंच सगुण ब्रह्म विराट्-स्वरूप धारण करून नामरूप आणि अन्न असें दोन प्रकारानें सिद्ध होतें. अन्न म्हणजे सृष्टीचें मूल अथवा अव्यक्त आणि अव्याकृत स्वरूप होय. यालाच मूल प्रकृति असें म्हणतात. मंत्रोक्त नामरूप या पदांनीं मूल प्रकृतीचें सामान्य आणि विशेष ज्ञान हें समजावयाचें आहे. विराट्स्वरूपी ब्रह्म हा सगुणब्रह्माचा पहिला परिणाम आहे. ब्रह्मानें सगुणस्वरूपाचा स्वीकार करून संकल्प आणि संकल्पविषय सिद्ध केल्याबरोबर त्याचा पहिला परिणाम (सृष्टि आणि सृष्टिज्ञान) व्यक्त आणि व्याकृतस्वरूपामध्यें होतो. परमार्थतः एकच ब्रह्म सामान्य–निर्गुण–व विशेषस्वरूपांनीं विद्यमान असतें;पण व्यवहारतः सगुणस्वरूपानें (ज्ञानस्वरूपानें) आणि नंतर विराट्स्वरूपानें म्हणजे ज्ञाता आणि ज्ञेय या स्वरूपानें अवतीर्ण होतेंसें दिसतें. हा सृष्टीचा सूत्ररूप उत्पत्तिप्रकार या मंत्रांत सांगितला आहे. अशाच अर्थाचें वर्णन प्रश्न, ऐतरेय, छान्दोग्य, बृहदारण्यक इत्यादि उपनिषदांत अवतीर्ण झालें आहे. सारांश, वस्तुतः निर्गुण ब्रह्म एक–रस–स्वरूपाचें आहे. विचारानें याच स्वरूपाचा निश्चय व्हावयाचा आहे. पण व्यवहारांत निमग्न असलेल्या जीवांस ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान; कर्ता, कर्म व कार्य; भोक्ता, भोग्यवस्तु आणि भोग, इत्यादि प्रकारांनीं ही सृष्टि दिसत असते. व्यावहारिक शास्त्रदृष्टीनें या पूर्वोक्त त्रयीला कधीं ज्ञाता आणि ज्ञेय, कधीं ज्ञाता आणि ज्ञान आणि कधीं ज्ञान आणि ज्ञेय या द्वयीचा मात्र विचार करितां येतो; व शेवटीं या द्वयीचा विचार करितां करितां ती एकस्वरूपामध्यें म्हणजे ज्ञानस्वरूपामध्यें लीन होते. हें ज्ञान अपौरुषेय उपनिषदांच्या अध्ययनानें, गुरूच्या उपदेशानें आणि जीवाच्या श्रवण–मननादि साधनांनीं 'एकच ब्रह्मज्ञान—स्वरूपांत मात्र विद्यमान आहे' असा निश्चय होऊन 'ज्ञान–स्वरूप मी आहें.' असा साक्षात्कार होतो. याप्रमाणें

अविद्यामूलक संसाराची उन्नति व्यावहारिक ज्ञान आणि व्यावहारिक कर्म विहित करणाऱ्या ज्ञानशास्त्रांत व धर्मशास्त्रांत होते आणि पुनः या उभयतांची उन्नति वेदांतशास्त्रांत होते. हें शेवटचें शास्त्र जीवांस ज्ञानस्वरूप करून अखंड आणि अभंग शांति देतें. हा विचाराच्या दृष्टीनें सत्याचा भाग आहे. जीवांस पुरुषार्थाचा मार्ग दाखविण्याचा हा क्रम आहे. ब्रह्म सत्य आहे, हें जीवांस अनुभवदर्शनें सिद्ध करून ध्यावयाचें आहे आणि हें सिद्ध करण्यासाठीं सृष्टीचा व ज्ञानाचा उत्पत्तिस्थितिलयक्रम श्रुतीस येथें व अन्यत्र सांगावा लागला आहे. ॥ ९ ॥

**प्रथम खण्ड समाप्त.**

---

***यस्मात्परं नापरमस्ति किंचित्।**
**यस्मान्नाणीयो न ज्यायोऽस्ति कश्चित् ॥**
**वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकः।**
**तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम् ॥ ७ ॥**

---

# प्रथम—मुंडक।

## खंड दुसरें.

### मंत्र पहिला.

**तदेतत्सत्यं मन्त्रेषु कर्माणि कवयो यान्यपश्यंस्तानि त्रेतायां बहुधा संततानि। तान्याचरथ नियतं सत्यकामा एष वः पन्थाः सुकृतस्य लोके ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ**—तत् एतत् सत्यं ( तें हें सत्य आहे. ब्रह्म मात्र सत्य आहे. जीवानें आपलें आत्यंतिक कल्याण करण्यासाठीं हें सत्य

---

* हा मंत्र रंगरामानुजानीं दिला आहे. पण हा क्षेपक असावा असें वाटतें. अर्थ मागें दिलाच आहे.

समजून घेतलें पाहिजे. ) **मंत्रेषु यानि कर्माणि कवयः अपश्यन् तानि त्रेतायां बहुधा संततानि** ( वेदमंत्रांमध्यें बुद्धिवान् पुरुषांनीं जीं कर्मे पाहिलीं तीं त्रेतायुगामध्यें–किंवा तीन स्वरूपांनीं–अनेक प्रकारचीं झालीं) **सत्यकामाः तानि नियतं आचरथ** ( सत्य वस्तु प्राप्त करून घेण्याची इच्छा धारण करणारे जीव हो, या कर्मांचें योग्य तऱ्हेनें अनुपालन करा.) **सुकृतस्य लोके एषः वः पन्थाः** ( सुकृताच्या लोकाला नेणारा हाच मार्ग तुमच्यासाठीं निर्माण झाला आहे. ) ॥ १ ॥

या मंत्राचा अर्थ उघड आहे. वेदमंत्रांमध्यें जीं जीं म्हणून विहित कर्मे बुद्धिवान् पुरुषांस ज्ञानगोचर झालीं, त्यांचा विस्तार पुढें तीन रूपांनीं अनेकप्रकारचा झाला. हे तीन प्रकार म्हणजे हौत्र, याजुष आणि औद्गात्र होत. मंत्रोक्त देवांस आहुति घेण्यासाठीं आवाहन करणें, त्यांस आहुति देणें आणि आहुति देत असतां गायन करणें, असें तीन प्रकारचें कर्म पुढें आविर्भूत झालें. आणि नंतर याच तीन कर्मांचा मोठा थोरला शाखावृक्ष सिद्ध झाला. येथें श्रुतीला सांगावयाचें आहे कीं, ज्या कोणाला व्यवहारतः कृतार्थ व्हावें अशी इच्छा असेल, त्यानें पूर्वीच्या ज्ञानवान् ऋषींस जीं कर्म ज्या मूल स्वरूपानें आविर्भूत झालीं, त्या कर्मांचें त्याच स्वरूपानें अनुष्ठान केलें पाहिजे. तात्पर्य, पूर्वीच्या ऋषींनीं जसें कर्म केलें तसें कर्म प्रत्येक ज्ञानी पुरुषानें केलें तर त्याचें ऐहिक आणि पारमार्थिक कल्याण होईल. हीं कर्मे व्यवहारतः सत्य आहेतच. पण ज्याला ब्रह्मज्ञान संपादन करून ब्रह्म व्हावयाचें आहे त्यानें या 'सत्यरूपी' कर्मांचें निष्काम अनुष्ठान केलें तर हीं कर्मे चित्तशुद्धीच्या कामीं उपयोगी पडतील व याप्रमाणें त्यांस सत्यत्व येईल ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**यदा लेलायते ह्यर्चिः समिद्धे हव्यवाहने ।**
**तदाऽऽज्यभागावन्तरेणाऽऽहुतीः प्रतिपादयेत् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—हि यदा समिद्धे हव्यवाहने अर्चिः लेलायते** ( होमकुंडांतील अग्नि प्रज्वलित झाला असतां जेव्हां जेव्हां त्याची ज्वाला होमकुंडामध्यें क्रीडाकरिते, ) **तदा आज्यभागौ अन्तरेण आहुतीः प्रतिपादयेत** ( त्यावेळी दक्षिणोत्तरभागीं व पार्श्वभागीं ज्या आज्यभागांचें यजन होतें, त्या भागांतील स्थानावकाशामध्यें आहुतींचा प्रक्षेप करावा. ) ॥ २ ॥

येथें अग्निहोत्राच्या आहुति केव्हां व कोठें द्याव्या, हें सांगितलें आहे. होमकुंडांतील अग्नि प्रज्वलित होऊन तो अमळसा शांत झाला, कुंडामध्येंच क्रीडा करूं लागला, बालकासारख्या आपल्या काली आदि जिह्वा बाहेर काढून त्या चाटित आहे, असा जेव्हां समय येतो, तेव्हां दर्शपौर्णमास इष्टींच्या आहुतिस्थानांमध्यें जो स्थलावकाश असतो, त्या अवकाशांत अग्निहोत्राच्या आहुति ज्या स्थानीं द्यावयाच्या असतात, त्या स्थानीं दररोज दोन आहुति देवतांच्या उद्देशानें द्याव्या. सारांश, यथाविधि कर्म करावें म्हणजे तें सुकृत होतें. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**यस्याग्निहोत्रमदर्शमपौर्णमासमचातुर्मास्यमनाग्रयणमतिथिवर्जितं च । अहुतमवैश्वदेवमविधिना हुतमासप्तमांस्तस्य लोकान्हिनस्ति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ—यस्य अग्निहोत्रं अदर्शं, अपौर्णमासं, अचातुर्मास्यं, अनाग्रयणं, अतिथिवर्जितं, अहुतं, अवैश्वदेवं, अविधिना हुतं च** ( ज्या अग्निहोत्र्याचें अग्निहोत्र, दर्शपौर्णमास, चातुर्मास्य, अग्रयण, इत्यादि कर्मांनीं वर्जित झालें आहे, ज्याचें अग्निहोत्र अतिथींचा सत्कार करणारें नाहीं, जो अग्निहोत्री वैश्वदेव करीत नाहीं आणि ज्याचें हवन अविधिपूर्वक होतें ) **तस्य आसप्तमान् लोकान् हिनस्ति** ( तें अग्निहोत्र, त्या अग्निहोत्र्याचे सप्तलोकापर्यंतच्या सर्व भूर्भुवादि लोकांचा नाश करितें. ) ॥ ३ ॥

या मंत्रांत अग्नीचें यजन करून अग्निहोत्र धारण करणाऱ्या पुरुषानें अग्निहोत्रास अवश्य असणारीं कर्में केलीं नाहींत तर त्याचा सर्वस्वी घात होतो, असें सांगितलें आहे. दर्शपौर्णमास, चातुर्मास्य, अग्रयण इत्यादि अनेक प्रकारच्या इष्टि आहेत. प्रत्येक आमावास्येला पूर्णिमेला, प्रत्येक चातुर्मासाला आणि शरत्कालीं विशेष कर्म करून अग्नीचें यजन करावें लागतें. हें कर्म अवश्य आहे. याचप्रमाणें आपल्या घरीं यदृच्छेनें अतिथि प्राप्त झाला असतां त्याचा आदरसत्कार करणें व त्याला अन्नपानादिकांनीं तृप्त करणें हेंही अवश्य कर्म आहे. अग्निहोत्र ठेवून नित्य आहुति देणें, वैश्वदेव करणें आणि सर्व कर्में विधिपूर्वक करणें याही गोष्टी अनिर्वाह पक्षाच्या आहेत. वर सांगितलेलीं कर्में अग्निहोत्र्यानें केलीं नाहींत तर त्याचा सर्वस्वी घात होतो. त्याला येथें किंवा इतरत्र कोठेंही जीवनसुख मिळत नाहीं, असें श्रुतीचें सांगणें आहे. प्रत्येक गृहस्थानें

गृह्याग्नीचें अनुष्ठान करावयाचें असतें. त्याप्रमाणेंच प्रत्येक अग्निहोत्र्यानें वर सांगितलेलीं सर्व कर्मे विधिपूर्वक केलींच पाहिजेत. हीं केलीं असतां भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक, सत्यलोक, या सप्तलोकांचें सुख कर्मकर्त्यास प्राप्त होतें. अर्थातच हीं कर्मे न करणारास किंवा अविधि-पूर्वक कर्मे करणारास हें लोकोत्तर सुख मिळत नाहींच, पण उलट दुःखमात्र त्यांच्या पदरीं पडतें. तात्पर्य हें आहे कीं, अग्निहोत्र असो किंवा दुसरें कोणतेंही वैदिक कर्म असो, तें कर्म विधिपूर्वक केलें पाहिजे. याप्रमाणें कर्म केलें तर पुण्यलोकांची प्राप्ति होते. यथासांग कर्म करण्याच्या आड हीं असलीं अनेक विघ्नें येतात, तेव्हां फार सावधपणानें प्रत्येक जीवानें आपलें नियतकर्म करावें हा वेदमान्य मार्ग आहे. यानें कल्याण होणार आहे, हें प्रत्येक वेदनिष्ठ कल्याणेच्छूनें लक्षांत ठेवावें. ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**काली कराली च मनोजवा च सुलोहिता या च सुधूम्रवर्णा । स्फुलिङ्गिनी विश्वरुची च देवी लेलायमाना इति सप्त जिह्वाः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—काली, कराली च, मनोजवा च, सुलोहिता, या च सुधूम्रवर्णा, स्फुलिङ्गिनी, च, लेलायमाना विश्वरुची देवी, इति सप्त जिव्हाः** ( काली, कराली, मनोजवा, सुलोहिता, सुधूम्रवर्णा, स्फुलिंगिनी आणि स्पंदन करणारी विश्वरुची देवी या अग्नीच्या सात जिव्हा आहेत. ) ॥ ४ ॥

येथें अग्नीच्या प्रकाशनाचीं सात निरनिराळीं स्वरूपें सांगितलीं आहेत. कुंडामध्यें अग्नि घालून व कुंडस्थ अग्नीस गोमयाचे गोळे समर्पण केल्यानंतर अग्नीचीं जीं अनेक स्वरूपें दृष्टीस पडतात त्यांचें हें निदर्शन आहे. प्रथम कृष्ण वर्ण, नंतर तांबडसर वर्ण, पुढें धूमासह प्रकट होणारा अग्नि, नंतर ठिणग्यांच्या रूपानें प्रकट होणारा आणि शेवटीं चंचल व दिव्य असणारी सुंदर ज्वाला, अशा प्रकारचीं हीं अग्नीचीं स्वरूपें आहेत. अग्नि प्रकट होतो तो याच स्वरूपांनीं होत जातो. यांवरच रूपक करून वेदानें अग्नीच्या या सप्त जिह्वा आहेत असें म्हटलें आहे. सप्त लोकांस पोंचविणाऱ्या या अग्नीच्या सप्त जिह्वा होत. या प्रत्येक जिह्वेस आहुतिप्रदान करणें हा धर्म आहे. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**एतेषु यश्चरते भ्राजमानेषु यथाकालं चाऽऽहुतयो ह्याददायन्। तं नयन्त्येताः सूर्यस्य रश्मयो यत्र देवानां पतिरेकोऽधिवासः ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थ—**यथाकालं आहुतयः आददायन् च यः एतेषु भ्राजमानेषु चरते** ( श्रुतीनें ज्या ज्या कालीं ज्या ज्या आहुती द्याव्या असें सांगितलें आहे, त्या त्या कालीं त्या त्या आहुती अग्नीला देऊन जो अग्निहोत्री या तेजस्वी असणाऱ्या अग्निस्वरूपांची यथासांग सेवा करितो. ) **यत्र देवानां एकः पतिः अधिवासः एताः सूर्यस्य रश्मयः तं नयन्ति** ( देवांचा अद्वितीय स्वामी जो इंद्र त्याचें जेथें वास्तव्य आहे, तेथें ह्या सप्तजिव्हात्मक सूर्यरश्मि—सूर्यकिरण—त्या अग्निहोत्र्याला घेऊन जातात. ) ॥ ५ ॥

ह्याही मंत्राचा अर्थ स्पष्ट आहे. अग्निसेवा विधिपूर्वक करणाऱ्याला कोणत्या फलाची प्राप्ति होते, हें येथें सांगितलें आहे. अग्नीच्या सात जिव्हा आहेत म्हणून वर सांगितलें त्यांनाच येथें सूर्यकिरणस्वरूप प्राप्त होतें असें म्हटलें आहे. 'स्वर्गकामो यजेत' 'ज्या पुरुषाला स्वर्ग हवा असेल त्यानें यज्ञ करावा' असें श्रुतीचें सांगणें आहे. यज्ञानें स्वर्ग मिळतो तेव्हां अर्थात् तेथें नित्य वास्तव्य करणारा, देवांचा स्वामी जो इंद्र त्याच्या संगतीचा लाभ होऊन स्वर्गस्थ अग्निहोत्र्यास सुख मिळतें. ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**एह्येहीति तमाहुतयः सुवर्चसः सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं वहन्ति। प्रियां वाचमभिवदन्त्योऽर्चयन्त्य एष वः पुण्यः सुकृतो ब्रह्मलोकः ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थ—**सुवर्चसः आहुतयः 'एहि एहि' इति, प्रियां वाचं अभिवदन्त्यः सूर्यस्य रश्मिभिः तं यजमानं वहन्ति एषः वः पुण्यः, सुकृतः, ब्रह्मलोकः, अर्चयन्त्यः** ( या तेजस्वी सूर्याच्या किरणांनीं सुशोभित झालेल्या आहुति त्या यजमानास 'यावें यावें'

असें आवाहान करून त्या यजमानाला घेऊन जातात व 'आपल्याला हा पुण्यकारक ब्रह्मलोक ( स्वर्गलोक ) आपल्या पुण्याईनें प्राप्त झाला आहे' अशा प्रकारचें सुखदायक स्तवन करून त्या यजमानाची पूजा करितात. ) ॥ ६ ॥

या मंत्रांत यजमानाचें स्वर्गलोकीं गमन कसें होतें, हें सांगितलें आहे. वेदानें सांगितलेलें यजन-याजनादि पुण्यकर्म केलें असतां इंद्रलोकाची प्राप्ति आहुति-द्वारानें होते. सर्व आहुति यजमानाची स्तुति करितात, त्याला प्रत्यक्ष स्वर्गलोक दाखवून तेथें नेतात आणि त्याची पूजा करितात, इत्यादि प्रकार येथें वर्णन केला आहे. येथें ब्रह्मलोक याचा अर्थ इंद्रलोक असाच केला पाहिजे. कारण, 'यज्ञानें स्वर्गलोक प्राप्त होतो' असें वेद म्हणतात. प्रकरणही स्वर्गाचें आहे आणि सत्कर्म केलें असतां त्या कर्माचें फल भोगण्यासाठीं स्वर्गलोकासारख्या श्रेष्ठ लोकाची प्राप्ति व्हावी हेंहीं न्याय्य आहे.

याप्रमाणें या खंडांतील पहिल्या मंत्रापासून तों सहाव्या मंत्रापर्यंत स्वर्ग-प्रापक विहित कर्म कोणतें ? करावें कसें ? विहित कर्म केलें नाहीं तर किंवा केलेलें कर्म अविधिपूर्वक झालें तर काय शिक्षा होते ? आणि विहित कर्म विधिपूर्वक केलें तर कोणतें फल प्राप्त होतें, हें सर्व विस्तारानें सांगून पहिल्या मंत्रांत " एषः वः सुकृतस्य पन्थाः ( सत्कर्माचा तुम्हांस योग्य असा हा मार्ग आहे ) " असें प्रतिज्ञारूपानें जें सांगितलें त्याचें श्रुतिबलानें समर्थन केलें आहे. सारांश, या सहा मंत्रांत सामान्यतः सकाम असणारा जो कर्ममार्ग त्याचें विस्तारपूर्वक वर्णन झालें. या मार्गांत ब्रह्मज्ञानाचा किंवा ब्रह्मात्मैकत्वज्ञानाचा मुळींच संबंध असत नाहीं, हें लक्षांत ठेवावयाचें आहे. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म । एतच्छ्रेयो येऽभिनन्दन्ति मूढा जरामृत्युं ते पुनरेवापि यन्ति ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ—येषु अष्टादशोक्तं अवरं कर्म, एते यज्ञरूपाः हि अदृढाः प्लवाः** ( ज्यांमध्यें अष्टादशांनीं उक्त केलेलें व अवर म्हणजे कमी योग्यतेचें कर्म आहे तें म्हणजे खरोखर अदृढ असणाऱ्या नावा-फळ्याचे तार्फे-होत. ) **एतत् श्रेयः ये मूढाः अभिनन्दन्ति ते पुनः एव जरा-**

**मृत्युं अपि यन्ति** ( कर्म हेंच श्रेयस्कर आहे असें म्हणून जे मूर्ख लोक समाधान मानून घेतात व आपल्यास धन्य समजतात ते लोक पुनः पुनः जन्ममृत्यूच्या लोकांत–स्वर्गांत जाऊनही पुनः जन्ममृत्यूच्या लोकांत–परत येतात ). ॥ ७ ॥

येथें अज्ञानानें पूर्ण भरलेल्या कर्मांची निंदा केली आहे. सकाम यज्ञादि कर्मसुद्धां वस्तुतः दुःखमूलक असतें. अविवेकाच्या साहाय्यानें वेदविहित कर्म केलें, तरी नित्य सुखाची प्राप्ति होत नाहीं, इतकेंच नव्हे, तर जन्म–मरणादि दुःखांची प्राप्ति होते, असें येथें सांगावयाचें आहे. भवसागर किंवा संसारसागर हा दुःखमूलक आहे आणि अज्ञानी स्थितींत असतां तो सुखरूप तरून जाणें केवळ अशक्य आहे. श्रुतीनें सांगितलेल्या यज्ञरूपी नौकांचा आश्रय केला तरी नित्य सुखाची प्राप्ति होत नाहीं. कारण या नौका किंवा फळ्याचे जोडून केलेले ताफे दृढ नसतात. हे ताफे केव्हां विस्कलित होतील, हें सांगतां येत नाहीं. उघडच आहे. सोळा ऋत्विज्, यजमान आणि यजमान-पत्नी यांच्याकडून झालेलें कर्म किंवा यांनीं म्हटलेलें मंत्र एकरूपाचें असणें केव्हांही शक्य नाहीं. ‘ यथासांग तें कर्म कांहीं घडेना ’ अशा अर्थाची समर्थांची उक्ति आहे, ती सर्वथैव खरी आहे. यज्ञासारखे अनेकलोकांनीं अनेकवेळीं अनेक मनःसंस्कारांनीं घडवून आणलेलें कर्म अव्यंग होणें ( बिनचूक होणें ) सहसा शक्य नाहीं. शिवाय कर्मानें उत्पन्न केलेलें फल नियतकालपर्यंतच टिकावयाचें. कर्म सामान्यतः सुव्यवस्थितरीतीनें होत नाहीं आणि यथाकथंचित सुव्यवस्थित झालेंच तर त्याचें फल चिरकाल टिकत नाहीं. हें श्रुतीस मुख्यतः सांगावयाचें आहे. हें सांगणें युक्तीला व अनुभवाला पटण्यासारखें आहे, हेंही कोणास नाकबूल करतां यावयाचें नाहीं. तात्पर्य सांगकर्म होणें अत्यंत दुर्घट म्हणून कर्माचें फल मिळणें शक्य नाहीं आणि मिळालें तरी तें फल कालभंगुर असावयाचें, हें स्पष्ट आहे. तेव्हां ओघामें असें म्हणणें प्राप्त होतें कीं, आत्मज्ञानाव्यतिरिक्त जें जें आपण कांहीं करितों तें अत्यंत निकृष्टप्रतीचें कर्म होतें. ही असली कर्माची गति (मीमांसा ) असतांही ज्या अविवेकी लोकांस कर्म हेंच अत्यंत श्रेष्ठ आहे असें वाटतें, कर्मानें मात्र आपलें आत्यंतिक कल्याण होईलसें वाटतें, जे लोक कधींही आत्मज्ञानाचा विचार करीत नाहींत त्यांना यद्यपि कर्माचें फल जो स्वर्ग तो मिळाला, तरी कर्मफलाचा पुण्यकाल संपल्याबरोबर ह्या लोकांस जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत पडावें लागतें. तात्पर्य दुःखाची स्थिति प्राप्त होते. हें कसें, तें पुढील दोन तीन मंत्रांत स्पष्ट करून सांगितलें आहे. ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पण्डितं मन्यमानाः । जङ्घन्यमाना परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथाऽन्धाः ॥ ८ ॥**

अन्वय व अर्थ—अविद्यायां अंतरे वर्तमानाः, स्वयं धीराः, पंडितं मन्यमानाः, जङ्घन्यमानाः मुढाः परियन्ति; अन्धेन एव नीयमानाः अंधाः यथा ( अविद्येमध्यें असणारे व कर्म करणारे, आपल्या स्वतांला आपण मोठे बुद्धिवान् आहों, असें समजणारे आणि आपल्यास जें विदित व्हावयास पाहिजे तें विदित आहे, असें मानून घेणारे स्वविघातकी मूर्ख लोक जन्ममरणामध्यें चक्राकार फिरत असतात. अंधळ्यानें अंधळ्यास न्यावें, याप्रमाणें अविद्या यांस फिरवित फिरवित जन्ममरणाच्या गर्तेमध्यें लोटून देत असते. ) ॥ ८ ॥

विवेकशून्य जी अविद्या तिच्यामध्यें राहून कर्मांमध्यें गुरफटलेले विवेकशून्य लोक स्वतः आपल्यास आपण मोठे बुद्धिवान् आणि पंडित असें समजून घेत असतात. स्वतः बुद्धि नसूनही व कांहीं वाचलेलें किंवा ऐकलेलें नसूनही या लोकांस मोठा पण वृथा अभिमान असतो कीं आपली विवेकबुद्धि अत्यंत तीव्र आहे आणि आपल्यासारखी विद्वत्ता दुसऱ्या कोणासही नाहीं. स्वतः कांहीं समजत नाहीं. आणि दुसऱ्यानें कांहीं चार उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या तरी हे ऐकून घ्यावयाचे नाहींत. विषयाच्या इच्छेनें कर्म करून तें पार पडलें असतां आपण मोठे सुखी होऊं, धन्य असूं आणि परमश्रेष्ठपतीचें भाग्य आपल्या चरणापाशीं येऊन आपली सेवा अखंड करीत राहील, अशा प्रकारचा लोभ यांस सुटलेला असतो. कर्माचें फल नित्य सुख–दुःखात्मक असतें. विषयप्राप्ति झाल्यावर कांहीं वेळ सुख होतें हें ठीक. पण विषय प्राप्त होऊन तो नाहींसा झाला म्हणजे दुःखपूर्ण शोक आणि अप्राप्त विषय प्राप्त झाला नाहींतर तत्संबंधी चिंतापूर्ण निराशा उत्पन्न करणें हा प्रत्येक कर्मविपाकाचा इतिहास आहे. कर्मानें संपत्ति वाढेल व ऐश्वर्य येईल कदाचित्; परंतु चित्ताला जी अखंड शान्ति हवी असते ती विषयजनक कर्मानें किंवा विषयजन्यसुखानें केव्हांही मिळावयाची नाहीं. अविवेकी कर्मांचा विपाक म्हणजे जन्म, जरा; दुःख, शोक, चिंता, यांची मालिका, दत्त म्हणून अविद्येमध्यें काम करणाऱ्या माणसाच्या पाठीमागें लागते. सारांश, हे लोक केवळ अविद्येचे गुलाम बनतात आणि ती जिकडे झोडीत

नेईल तिकडे यांस जावें लागतें. अविद्या, अनात्मसंबंधी विद्या, कर्म करून विषयाचा उपभोग घेण्याची प्रेरणा करणारी अविद्या, ही स्वतः ज्ञानशून्य म्हणजे अंधळी आहे. आणि हिच्या नादाला लागलेले संसारी लोकही अंधळे असतात. मग काय विचारावें ही अंधळी अविद्या या अंधळ्या ज्ञानशून्य लोकांस जन्ममरणमूलक गर्तेमध्यें नेऊन अंधेरामध्यें या लोकांस गरगर फिरवीत राहते. सदैव चक्राकार भ्रमण करणाऱ्या शुक-नलिकायंत्रावर बसविलेला राघु आपण पडूं की काय या भीतीनें जसजसा त्या फिरणाऱ्या यंत्राचा आधार घेतो, तसतसें तें यंत्र जास्त जोरानें फिरूं लागून त्या राघूची स्थिती दीनवाणी करित असतें, हें सर्वांस अनुभवानेंही ठाऊक आहे. असाच प्रकार संसारी पुरुषाचा आहे. अविवेकी संसार हें दुःखाचें आगर होय. यांत उत्पन्न होणाऱ्या दुःखांचें उपशमन करण्यासाठीं जों जों संसारी उपाय जीव करितो, तों तों या दुःखमूलक संसारांत जास्तच खोल पाय जाऊन जीव कायमचे संकटांत पडतात. हें चिखलांत पडलेल्या आणि त्यांतून निघण्याचा प्रयत्न करण्यासाठीं जास्त जोरानें पाय खालीं दडपणाऱ्या गाईला जसें जास्त खोलांत जाऊन पडावें लागतें, त्याचेंच हें प्रत्यंतर होय. असो; या विषयाविषाविषयीं जितकें लिहावें किंवा जितकें बोलावें तितकें थोडेंच आहे. ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**अविद्यायां बहुधा वर्तमाना वयं कृतार्था इत्य-भिमन्यन्ति बालाः । यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात्तेनाऽऽतुराः क्षीणलोकाश्च्यवन्ते ॥ ९ ॥**

अन्वय व अर्थ—**अविद्यायां बहुधा वर्तमानाः, वयं कृतार्थाः इति बालाः अभिमन्यन्ति** ( अविद्येमध्यें अनेक प्रकारचीं कामें करणारे व अनेक स्वरूपांनीं राहणारे बालिश लोक आपण धन्य आहों, असें सम-जतात, आणि त्यांतच अभिमान मानून घेत असतात. ) **यत् कर्मिणः रागात् न प्रवेदयन्ति, तेन आतुराः क्षीणलोकाः च्यवन्ते** ( कर्म मात्र करणाऱ्या लोकांस कामक्रोधादिकांमुळें आपल्या स्वतःचें कल्याण अक-ल्याण कळत नाहीं. म्हणून ते लोक लौकरच आपल्या स्थानापासून भ्रष्ट होऊन खालीं खालीं घसरत जातात. ) ॥ ९ ॥

हा मंत्र वरील मंत्राचा अनुवाद करित आहे. येथें केवळ कर्मठ लोकांस 'आपण धन्य आहों' असा अभिमान वाटतो हें जास्त सांगितलें आहे आणि कामक्रोधादि

विकारांमुळें त्यास आपलें कल्याण अकल्याण कळत नाहीं, ही एक गोष्ट जास्त सांगितली आहे. दोन्ही ही मंत्र केवळ संसारी पुरुषांचें चित्र स्पष्ट रेखाटणारे आहेत. येथें आत्मज्ञान नसतें, इतकेंच नव्हे तर वेदानें स्वर्गलोक मिळून देणारीं जीं कांहीं कर्में विहित केलीं आहेत, त्यांचेंही आचरण करण्याचें ज्ञान किंवा मनःसामर्थ्य या पुरुषांस नसत. स्वार्थी कर्म करावें, त्या पासून उत्पन्न होणाऱ्या फलांचा उपभोग घ्यावा आणि पूर्वसंचितानें जें काय सुख प्राप्त झालें असेल किंवा जी कोणती स्थिति प्राप्त झाली असेल त्यापासून भ्रष्ट व्हावें, हा त्यांचा नित्याचा रोजगार आहे. असो ॥९॥

---

## मंत्र दहावा.

**इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं नान्यच्छ्रेयो वेदयन्ते प्रमूढाः । नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वेमं लोकं हीनतरं वा विशन्ति ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थ—इष्टापूर्तं वरिष्ठं मन्यमानाः प्रमूढाः अन्यत् श्रेयः न वेदयन्ते** ( यज्ञयाग आणि वापीकूपादि सिद्ध करणें हेंच अत्यंत श्रेष्ठ कर्म आहे, असें मानणाऱ्या वेदमार्गी कर्मठांस अविवेकामुळें दुसरा जो कल्याणकर मार्ग आहे, तो कळत नाहीं.) **नाकस्य पृष्ठे सुकृते अनुभूत्वा ते इमं लोकं हीनतरं वा विशन्ति** ( पुण्यांशानें उत्पन्न होणारे कर्मफलाचा अनुभव स्वर्गपृष्ठावर कांहीं वेळ घेऊन हे वैदिक कर्मठ लोक पुनः मृत्युलोकीं जन्म घेण्यासाठीं येतात. किंवा भूलोकापेक्षांही जास्त कमी योग्यतेच्या लोकीं स्वकर्मानुसार या लोकांस जन्म घ्यावा लागतो. ) ॥ १० ॥

येथें वेदानें जें कर्म स्वर्ग मिळवून देणारें आहे म्हणून सांगितलें आहे, तें कर्म करणाऱ्या लोकांचा वृत्तांत सांगितला आहे. जन्माला येऊन इंद्रचन्द्रादि देवतांस प्रसन्न करणारे यज्ञयाग करावे किंवा येथेंच विहिरी, तळीं, घाट, इत्यादि बांधून लोकांकडून शाबासकी मिळवून घ्यावी, हें या कर्मठांस श्रेष्ठ प्रकारचें कर्म आहे, असें वाटतें. आत्मा म्हणून कांहीं एक पदार्थ आहे आणि त्याचें ज्ञान करून घेऊन जीवाचें कल्याण करणें हें आपलें कर्तव्य आहे, या ज्ञानाची या कर्मठ लोकांना ओळख किंवा खबरही नसते. वेदानें सांगितलेलीं कर्में केलीं म्हणजे आपण कृतार्थ झालों, या परतें आपल्यास कांहीं एक करावयाचें राहिलें नाहीं, असें या स्ववंचकांस वाटत असतें. यांच्या वेदविहित स्वार्थी कर्मांमुळें कांहींकालपर्यंत या लोकांना स्वर्गसुखाचा आस्वाद मिळतो.

तथापि सत्कर्मानें उत्पन्न झालेल्या पुण्याचा क्षय झाल्याबरोबर मृत्युलोकांमध्यें किंवा त्याच्यापेक्षांही हीनतर लोकांमध्यें यांस जन्म घ्यावा लागतो. तात्पर्य हें आहे कीं, जावत्कालपर्यंत आत्मप्रकाशाचा किरण अंतःकरणामध्यें प्रविष्ट झाला नाहीं, तोंपर्यंत शरीरपुष्टि करणारें, ऐश्वर्य देणारें, कीर्ति पसरविणारें कर्म आपल्या हातून झालें, तरी जीवाला अखंड शान्तीचें सुखधाम प्राप्त व्हावयाचें नाहीं. तुम्ही संसारांत असा, नीतीनें वागा, समाजाचें कल्याण करा, राजनिष्ठ असा, धर्मानें वागून इंद्रादिदेवतांस प्रसन्न करा, कमी अधिक प्रमाणानें तुम्हांस सुखाचा वांटा मिळेल, हें खरें. पण आपण स्वरूपतः अमर आहों, सुखाचें आगर आहों, असें ज्ञान करून देऊन स्वरूपाचें आविष्करण करणारी ब्रह्मविद्या जोंपर्यंत तुम्हांस प्राप्त झाली नाहीं, तोंपर्यंत जन्ममरणाची भीति कायम राहणार, अज्ञानाचा सागर जास्त खोलावत जाणार आणि दुःखाचे पर्वत अधिक अधिक उंच होत जाणार, यांत शंका नाहीं. चक्रव्यूहांत सांपडलेला अभिमन्यु स्वस्थानीं परत येण्याचा मार्ग माहीत नसल्यामुळें जसा त्या द्रोणनिर्मित चक्रामध्यें गरगर फिरत राहिला आणि शेवटीं प्राणास मुकला, त्याप्रमाणें अज्ञानाच्या किंवा अनात्मज्ञानाच्या अंधमय प्रदेशांत जोंपर्यंत आपण वावरत आहों, तोंपर्यंत आपण निराबाध शान्तीची अपेक्षा करणें हें मुंगीनें हत्ती गिळण्याची अपेक्षा करण्यासारखें व्यर्थ आहे. असो ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा.

**तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्ष्यचर्यां चरन्तः । सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा ॥ ११ ॥**

**अन्वय व अर्थ—हि ये शान्ताः विद्वांसः भैक्ष्यचर्यां चरन्तः, अरण्ये तपःश्रद्धे उपवसन्ति** ( इंद्रियदमन केलेले जे विद्वान् लोक भिक्षावृत्तीनें राहून अरण्यामंध्यें तपश्चर्या करितात आणि आस्तिकवृत्तीनें राहतात ) **यत्र सः अमृतः अव्ययात्मा हि पुरुषः, सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति** ( जेथें जन्ममरणशून्य असणारा अक्षयात्मा पुरुष राहतो तेथें देवयानमार्गानें ते पापपुण्यशून्य झालेले वानप्रस्थ अथवा तपस्वी लोक जातात ) ॥ ११ ॥

येथें वानप्रस्थ आणि संन्याशी लोकांचीं लक्षणें आणि या लोकांस तपश्चर्येनें आणि आस्तिकबुद्धीनें प्राप्त होणारें फल, यांचे निदर्शन केलें आहे. तथापि या वानप्रस्थांस

अथवा यतींस आत्मस्वरूपाची ओळख झालेली नसतें. हें ' आत्मज्ञान ' या स्पष्ट शब्दाच्या अभावानें स्पष्ट होत आहे. संसारांतील सुखदुःखाचा कंटाळा आल्यामुळें किंवा संसारांत राहिलें असतां सांसारिक दुःखें अपरिहार्य स्वरूपाचीं आहेत, असें कळल्यामुळें हें लोक संसाराचे सर्व पाशबंध तोडून देऊन अरण्यामध्यें राहतात आणि तेथें भिक्षावृत्तीनें उदरंभरण करून आस्तिकबुद्धीनें तपश्चर्या करितात. संसाराच्या अथवा संसार उत्पन्न करणाऱ्या प्रमेयांच्या मूळाशीं कांहीं नित्य तत्त्वें आहेत, तीं शोधून काढणाच्या प्रयत्नांमध्यें यांच्या मनोबुद्धि गुंतून गेलेल्या असतात. माझ्या-समजुतीनें हे लोक कापिलसांख्यांतील विशिष्ट मताचे असावे. श्रुतींचा उदय झाल्यानंतर अनेक शतकांनीं सांख्यमतप्रवर्तक कपिलमहामुनींचा अवतार झाला, हें खरे; या महामुनींनीं वेदसंहितेंत ब्राह्मणांत व उपनिषदांत आढळणारीं विशकलित मतें एकत्र करून त्यांस सूत्रबद्ध केलें आणि आपल्या बुद्धीच्या जोरावर एक महाशास्त्र निर्माण करून सर्व जगास चाकित केलें, हें ही खरें. पण तीं सूत्रें आणि तें शास्त्र ह्या उभयतांचा पाया या दृश्य जगतावर आणि जगतांत असणाऱ्या परंतु इंद्रियांत न दिसणाऱ्या अनेक सामर्थ्यांवर रचिलेला होता. या मतांत जीवस्वरूपाची ओळख यांस झालेली दिसते; पण जीव हा स्वरूपतः आत्मा आहे, परमात्मा आहे, असें यांस ठाऊक तरी नव्हतें किंवा ठाऊक असून ब्रह्मसिद्धांतावर यांची श्रद्धा तरी बसलेली नव्हती, असें वाटतें. या दृश्यजगताचा छडा लावण्याचा प्रयत्न करून यांनीं परिणामवादाचा उद्घोष केला; असो; पण कापिलसांख्यांस मूळभूत असणारीं तत्त्वें वेदकालीं प्रचलित होतीं, हें विसरतां नये. सारांश, सापेक्ष तत्त्वज्ञानाचें हें सर्वमहत्कार्य या लोकांनीं व यांच्या आचार्यांनीं स्वबुद्धीच्या जोरावर केलें म्हणून असल्या जाड्या तपस्व्यांस व तीव्र आस्तिक्यबुद्धीच्या लोकांस जें कल्याणकारक यश प्राप्त व्हावयास पाहिजे होतें, तें मिळालें नाहीं म्हणजे यांस आत्मस्वरूपाची ओळख झाली नाहीं. असो; श्रुति म्हणते कीं, असल्या शुद्ध आचरणाच्या आणि शुद्ध ज्ञानी लोकांच्या तपश्चर्येमुळें या लोकांस अमृत, अव्यय आणि सर्व जगांस पूर्णत्व देणारा जो हिरण्यगर्भ त्याच्या लोकीं वास्तव्य करावयास सांपडून एक कल्पपर्यंत मात्र यांस अमरत्व भोगावयास सांपडतें. येथें ' अमृत ', ' अव्ययात्मा, ' ' पुरुष, ' अशीं पदें आहेत, या वरून कित्येक पंडितांस म्हणतां येईल कीं, या मंत्रांतील यातींस व वानप्रस्थांस श्रुतिमान्य असणारी मुक्ति मिळाली पाहिजे. परंतु हें म्हणणें श्रुतिसंमत होणार नाहीं. कारण पहिल्या मंत्रापासून तो ह्या मंत्रापर्यंत कर्मांचें प्रकरण चाललेलें आहे. बाराव्या मंत्रांत ' परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ' इत्यादि पदें स्पष्ट सुचविणार आहेत कीं मागील अकरा मंत्रांत सांगितलेलीं सर्व फळें कर्मांनें उत्पन्न झालेलीं आहेत, तीं नश्वर आहेत; आणि अभंग शान्ति देणारें व ज्ञानरूप करणारें नित्यसिद्ध जें आत्मस्वरूप तें अनित्य-कर्मानें किंवा कर्मफलानें किंवा अनित्यतपःश्रद्धेनें केव्हांही सिद्ध व्हावयाचें

नाहीं. (२) तपःश्रद्धा आहे परंतु ज्ञान नाहीं, विशेषतः आत्मज्ञान नाहीं, अशी स्थिति असेल तोंपर्यंत कैवल्यसुखाची प्राप्ति होणें अशक्य आहे. 'ज्ञानेनैव तु कैवल्यं' असें श्रुति म्हणते 'सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' असें स्मृति ही म्हणते. अनुभवही असाच आहे. आत्मज्ञान झाल्याशिवाय चौकस जीवाला शान्ति मिळत नाहीं, असें कित्येक उदाहरणांनीं सिद्ध करून देतां येईल. म्हणून वरील शंका बरोबर नाहीं. ती बरोबर आहे असें म्हटलें तर प्रकरणविरोध, उपक्रमोपसंहारविरोध, श्रुतिस्मृतिविरोध आणि अनुभवविरोध येऊन पडतात. असा विरोध उत्पन्न करणारा उपदेश सर्व जीवांचें कल्याण करण्यासाठीं अवतीर्ण झालेली श्रुतिमाता केव्हांहीं करणार नाहीं.

याप्रमाणें येथपर्यंत श्रुतिविहित कर्म करणारे, शुद्ध सांसारिक पद्धतीनें वागणारे, इष्टापूर्तादिकर्में करणारे आणि विश्वज्ञानाचा शोध लावण्याचा प्रयत्न करणारे सर्व लोक आत्मज्ञानशून्य असल्यामुळें कोणी येथें, कोणी स्वर्गलोकीं, कोणी हिरण्यगर्भाच्या लोकीं विषयसुखें किंवा मानसिकसुखें भोगण्याचे अधिकारी होतात. पण हीं सुखें कालभंगुर आहेत, हीं सुखें जन्ममरण चुकवीत नाहींत, हीं सुखें जीवाला ज्ञानरूप करीत नाहींत, उपाधींपासून सोडवीत नाहींत, असें स्वानुभवावरून प्रत्येकास कळून चुकण्यासारखें आहे, आणि जीवास हें कळावें एतदर्थच श्रुतीनें या प्रकरणांत कर्मांचें दुःसाध्यत्व, कर्मसुखाचें क्षणभंगुरत्व इत्यादिकांचें वर्णन केलें आहे. या प्रकारचा हा संसार आहे, असें प्रत्येक जीवास कळावें हें श्रुतीचें मनोगत आहे. असो. ॥ ११ ॥

---

## मंत्र बारावा.

**परीक्ष्य लोकान्कर्मचितान्ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन । तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥ १२ ॥**

**अन्वय व अर्थ—कर्मचितान् लोकान् परीक्ष्य ब्राह्मणः निर्वेदं आयात्** (याप्रमाणें येथील सर्व दृश्यवस्तु आणि त्यापासून उत्पन्न होणारीं सुखें कर्मजन्य आणि क्षणभंगुर आहेत, असें विवेकानें समजून घेऊन ब्राह्मण म्हणजे नित्यानित्यविवेक करणारा पुरुष वैराग्यशील होतो) **अकृतः कृतेन न अस्ति** (अकृत म्हणजे नित्यसिद्ध आत्मस्वरूप कर्मानें केव्हांही प्राप्त व्हावयाचें नाहीं असा विवेक, विचारी पुरुषाला उत्पन्न होतो.) **तद्विज्ञानार्थं समित्पाणिः स श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं**

**गुरुं एव अभिगच्छेत् ( त्या अकृत अथवा नित्यसिद्ध वस्तूच्या ज्ञान-विज्ञानासाठीं श्रुतिसंपन्न आणि अनुभवसाक्षात्कारी गुरुला मात्र या विवेकीपुरुषानें शरण जावें ). ॥ १२ ॥**

मागील मंत्राच्या विवरणांत सांगितल्याप्रमाणें जो विवेकी पुरुष आहे, ज्याला अनुभवानें शहाणपण मिळविण्याचें सामर्थ्य आहे, तो येथें व अन्यत्र दिसणारें सर्व विश्व आणि त्यांतील सुखें आत्मबाह्य असून कर्मानें उत्पन्न केलेलीं आहेत, नित्य सिद्ध नाहींत, असें कळून घेतो. हें त्याचें कळणें निश्चयरूपाचें झालें म्हणजे त्याला या क्षणभंगुर बाह्यसुखांचा व शान्ति उत्पन्न न करणाऱ्या अज्ञानाचा वीट येतो व तिरस्कार उत्पन्न होतो. त्याला वैराग्य प्राप्त होतें आणि त्याला असें कळून चुकतें कीं, आपल्याला जी नित्य वस्तु हवी आहे तिचें स्वरूप अनित्यकर्मानें केव्हांही सिद्ध व्हावयाचें नाहीं. तात्पर्य त्याला नित्यानित्य विवेक यथार्थरीतीनें करितां येऊं लागतो. नित्याचें ग्रहण करावें अनित्याचा त्याग करावा, असेंही त्याला समजूं लागतें. हें समजल्यानंतर नित्य वस्तूचा अधिगम होण्यासाठीं तो वेदसंपन्न आणि साक्षात्कारी श्रीगुरूला नम्रपणानें शरण जातो.

प्रत्येक जीवाला नित्य वस्तु हवी असते आणि तिच्या प्राप्तीसाठीं अथवा ती मिळेल अशा आशेनें सर्व ज्ञानी व अज्ञानी पुरुषांची धडपड सारखी सुरू असते. अमुक मिळालें तर सुख मिळेल, तमुक केलें असतां माझें ऐश्वर्य वाढेल, ही गोष्ट केली असतां माझी कीर्ति अजरामर होईल, ती गोष्ट केली असतां माझे पुत्र, पौत्र, प्रपौत्र मला तर्पणोदक देतील, असें केलें असतां मला स्वर्ग मिळेल, तसें केलें असतां सर्व विश्वाचा उलगडा मला करितां येईल आणि मला नित्य वस्तु सांपडेल, अशा भरी भरून प्रत्येक जीव कर्माच्या पाठीमागें लागला आहे. पण अनुभवप्रकार वेगळा असतो. नित्य वस्तु कर्म करून उत्पन्न होत नाहीं किंवा मिळत नाहीं हें तत्त्व ज्ञानी तपस्व्यास सुद्धां समजण्यास फार काळ लागत असतो, आणि फार काळ गेला तरी तें तत्त्व एखाद्यासच समजतें. ' यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ' असें भगवंतांनीं श्रीमद्भगवद्गीतेमध्यें सांगितलें आहे, तें सर्वथा यथार्थ आहे. आपल्या चित्ताला शांति हवी असेल तर शांतीचें माहेरघर जें आत्मस्वरूप तें आपण स्वतः होऊं, तेव्हांच आपल्याला शांति मिळेल, इतकेंच नव्हे तर आपण शांतिस्वरूप होऊं. कर्मानें शांति मिळते; पण ती एक क्षण-मात्र जिवंत असते. हें तत्त्व कळत नाहीं म्हणून आम्ही जीव संसारामध्यें राहातों आणि सांसारिक सुखाच्या आशेनें कर्म करीत असतों. हा शुद्ध भ्रम आहे, पण हा भ्रम आहे ही गोष्ट सुद्धां आम्हांस समजत नाहीं. विवेकी पुरुषांस मात्र हें तत्त्व समजतें. आणि हें समजल्यानंतर त्या पुरुषाला सांसारिक सुखाचा आणि संसाराचा तिरस्कार उत्पन्न होतो. श्रुतीचा असा उपदेश आहे कीं, अशा विवेकी पुरुषानें योग्य अधिकारी पुरुषाला शरण जावें आणि अध्ययन करण्याच्या बुद्धीनें आत्मतत्त्वस्वरूपाविषयीं प्रश्न करून आपली यथार्थ समजूत करून घ्यावी. ॥ १२ ॥

---

## मंत्र तेरावा.

**तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक्प्रशान्तचित्ताय शमान्विताय । येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्त्वतो ब्रह्मविद्याम् ॥ १३ ॥**

अन्वय व अर्थ—तस्मै सम्यक्प्रशान्तचित्ताय शमान्विताय सः विद्वान् येन अक्षरं पुरुषं वेद सत्यं तां ब्रह्मविद्यां प्रोवाच ( अशा प्रकारें, शास्त्रशुद्धरीतीनें रागद्वेषादिशून्य झालेला, इंद्रियनिग्रह केलेला, वैराग्यशील पुरुष शरण आला असतां आणि त्यानें ज्ञानभिक्षा मागितली तर त्याला ब्रह्मविद्येचा यथार्थ उपदेश करावा; तो असा कीं, ज्याच्या योगानें त्या वैराग्यशील शिष्याला अक्षर असें जें विश्वाचें अधिष्ठान असणारें आत्मस्वरूप तें समजून ' मी हीं आत्मस्वरूपच आहें ' असा त्याचा निश्चय होईल. ) ॥ १३ ॥

मागील मंत्रांत गुरु वेदशास्त्रसंपन्न आणि आत्मसाक्षात्कारी असावा अशी जी लक्षणें सांगितली, त्यालाच आणखी एक विशेषण जोडून तो दयाशील आणि शिष्यकल्याणकर्ता असावा असें या मंत्रांत सुचविलें आहे. तसेंच मागील मंत्रांत नित्यानित्य विवेक संपन्न आणि विषयवैराग्यशील असा पुरुष मात्र ब्रह्मज्ञानाला अधिकारी होतो, असें सांगितलें, त्यांतच भर टाकून तो शमदमादिगुणांनीं युक्त असावा आणि मुक्त होण्याची तीव्र इच्छा त्यास असावी, असें येथें स्पष्ट सांगितलें आहे. ब्रह्मविद्येचें लक्षण ही थोडक्यांत दिलें आहे. तें असें कीं, ब्रह्मवस्तु अक्षर म्हणजे अविनाशी असून ती जशी आहे तशीच अनुभवाला येते. विश्वाप्रमाणें तिचा प्रकार नाहीं. विश्व दिसतें तसें असत नाहीं. आणि असतें तसें दिसत नाहीं. म्हणून तें परमार्थतः सत्य नव्हें. या साठीं सत्य या विशेषणाचा उच्चार श्रुतीनें येथें स्पष्ट केला आहे. 'तत्त्वतः' हें पदही ध्यानांत ठेवण्यासारखें आहे ' तत्त्वं असि ' ( तें तूं आहेस ) असा सर्व वेदांतशास्त्रांचा स्पष्ट उपदेश आहे. म्हणून आचार्यांनीं शिष्याचा असा निश्चय करून दिला पाहिजे कीं तोही स्वरूपतः ब्रह्मरूप आहे. सारांश ब्रह्म हीं एकच अविनाशी सत्य वस्तु आहे आणि ती आपण आहों, असा उपदेश साक्षात्कारी गुरूनें अधिकारी मुमुक्षु शिष्यांस करावा, हें बाराव्या आणि तेराव्या मंत्रांचें तात्पर्य आहे. ॥ १३ ॥

**प्रथममुण्डक द्वितीयखण्ड समाप्त.**

**प्रथम मुण्डक समाप्त.**

---

# द्वितीय-मुण्डक.

## प्रथम-खण्ड.

### मंत्र पहिला.

**तदेतत्सत्यं यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिङ्गाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः । तथाऽक्षराद्विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते तत्र चैवापि यन्ति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—तत् एतत् सत्यं** ( तें हेंही सत्य आहे. )

ज्याअर्थी ब्रह्म ही सत्यवस्तु आहे, त्याअर्थी त्याअधिष्ठानावर आश्रय घेऊन प्रकट झालेलें जीवस्वरूपही स्वभावतः सत्यच आहे. प्रकट होणें म्हणजे व्यवहारकक्षेंत येणें. हा व्यवहार होय. म्हणून व्यवहारांतील जीवही व्यवहारांत सत्य आहे. याच न्यायानें जड ही व्यवहारांत सत्य आहे. असो:—

**सोम्य, यथा सुदीप्तात् पावकात् सहस्रशः विस्फुलिङ्गाः प्रभवन्ते** ( हे सोम्य ! ज्याप्रमाणें उत्तमरीतीनें प्रदीप्त झालेल्या अग्नीपासून एकाच स्वरूपाच्या हजारों ठिणग्या उत्पन्न होतात. ) **तथा अक्षरात् विविधाः भावाः प्रजायन्ते** ( त्याप्रमाणें अक्षरापासून अनेक प्रकारचे भाव म्हणजे जीव उत्पन्न होतात. ) **तत्र च एव अपि यन्ति** ( आणि तेथें मात्र जाऊन ते लीन होतात. ॥ १ ॥

पहिल्या मंत्रांतील दृष्टांत अत्यंत समर्पक असून त्याचें तात्पर्यही उघड आहे. झगझगीत पेटलेला अग्नि हजारों ठिणग्या बाहेर टाकतो व त्या कमीजास्त लहानमोठ्या असतात, हें प्रत्येकानें पाहिलें आहे. तसेंच त्या ठिणग्या कांहींवेळ राहून पुनः आपल्या मूळकारणाकडे, अग्निस्वरूपाकडे, तेजाकडे जाऊन लीन होतात हेंही कित्येकांनीं निरीक्षित केलें असेल. हा दृष्टांत देऊन श्रुतीनें आणखी एक गोष्ट साधण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. तो हा कीं, या हजारों ठिणग्या बाहेर पडत असल्या तरी जेथून त्यांचा उद्भव झाला तेथील स्वरूपांत मुळींच फरक होत नाहीं. याच रीतीनें अक्षर म्हणजे आत्मस्वरूपापासून विविध म्हणजे नानाप्रकारच्या उपाधी घेऊन अनंत जीव जन्मास येतात आणि पुनः देहांच्या आयुष्यांची स्वकर्मानुसार मर्यादा संपली म्हणजे ब्रह्मामध्यें जाऊन

लीन होतात, हें खरें; पण जीव सगुणब्रह्मापासून निर्माण झाले म्हणून ब्रह्माचें स्वरूप कांहीं कमी होते किंवा ते जीव तेथें जाऊन मिसळले म्हणून ब्रह्माचें स्वरूप मोठें होतें, अशांतला प्रकार नाहीं. दृष्टांतामध्यें दार्ष्टांतांतील सर्व प्रकार दिसत नाहींत म्हणून ब्रह्माला अग्नीची उपमा तंतोतंत लागत नाहीं. तथापि उत्पत्तीचा आणि लयाचा भाग दाखविण्याला वर सांगितल्याप्रमाणें ती उपमा अतिशय समर्पक आहे, हें मात्र प्रत्ययास येतें. ॥१॥

---

## मंत्र दुसरा.

**दिव्यो ह्यमूर्तः पुरुष सबाह्याभ्यन्तरो ह्यजः ।**
**अप्राणो ह्यमनाः शुभ्रो ह्यक्षरात्परतः परः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—हि पुरुषः दिव्यः अमूर्तः सबाह्याभ्यंतरः हि अजः, अप्राणः, हि अमनाः. शभ्रः, हि अक्षरात् परतः परः** ( परब्रह्म हें सर्व दृश्यादृश्य वस्तूंस पूर्णत्व देणारें आहे. कारण तें स्वयंप्रकाश व अमूर्त म्हणजे निराकार आहे. तें अंतर्बाह्यव्यापी आहे, तें अनादि आहे, तें प्राणशून्य, मनःशून्य, निर्मळ आणि सर्वव्यापी अव्यक्ताहून श्रेष्ठ असणाऱ्या सगुण ब्रह्माहून अत्यंत श्रेष्ठ आहे. ॥ २ ॥

येथें परब्रह्मस्वरूपाचें वर्णन आहे. ब्रह्माला पुरुष ही संज्ञा देण्याचें कारण हें आहे कीं तें यच्चावत् वस्तूंना—भूत, भविष्य आणि वर्तमान दृष्टादृष्टपदार्थांना—अस्तित्व देणारें, ज्ञानस्वरूप देणारें आणि आनंदस्वरूप करणारें आहे. थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे तें सच्चिदानंद स्वरूप आहे. हें स्वरूपतः अस्तिरूप म्हणजे ज्ञानरूप म्हणजे आनंदरूप आहे. सर्वांस अस्तित्व प्राप्त होतें, कांहीं कालपर्यंत तरी ‘ पदार्थ आहे ’ असें आपल्यांस म्हणतां येतें; याचें कारण हें पदार्थांचें अस्तित्व तेथें ब्रह्म आहे म्हणून त्यांस प्राप्त होतें. कांहीं पदार्थ ज्ञेय स्वरूपाचे आणि कांहीं ज्ञातृस्वरूपाचे असतात. कांहीं पदार्थ आनंद देणारे आणि कांहीं आनंद घेणारे पदार्थ असतात. याचें कारण प्रत्येक पदार्थांत विद्यमान असणारें ब्रह्म ज्ञानरूप अथवा आनंदरूप आहे हें होय. हें कशावरून ? असें कोणी विचारील तर त्याच्या समाधानासाठीं श्रुति म्हणते कीं परब्रह्म हें स्वयंप्रकाश असून सर्वांस प्रकाशित करणारें; अंतर्बाह्य व्यापणारें असून सर्वांस बाह्य आणि आन्तरें ( आंतील भाग आणि बाहेरील भाग ) अशा स्वरूपाचे करणारें, स्वतः जन्मादि उपाधांनीं अव्याप्त असून तें प्राणशून्य व मनःशून्य; निर्मळ आहे म्हणून चराचर वस्तूंस जन्ममरणादि अवस्था ( जीवांत प्राण, मन, इत्यादि उपाधी आणि चराचरांत सत्यादि गुणत्रयांचे मळ ) उत्पन्न होतात. परब्रह्म हें सर्वाहून विलक्षण,

सर्वांत राहून सर्वांच्या पलीकडे असणारें आहे म्हणून आब्रह्मस्तंबपर्यंतच्या सर्व पदार्थमात्रांना नामरूपादि उपाधी देणारें आहे. अर्थातच हें ब्रह्म स्वयंप्रकाश निराकार, अंतर्बाह्यव्यापी, अविकार्य, अविकारी, निरुपाधिक, निर्मळ आणि सर्व दृष्टादृष्ट वस्तूंहून विलक्षण या स्वरूपाचें आहे. तात्पर्य तें सर्वांस सत्ता देणारें, सर्वांस ज्ञानी किंवा ज्ञेय करणारें, सर्वांस–सर्व–परिच्छिन्न पदार्थांस–सोपाधिक करणारें, अशा स्वरूपाचें आहे. म्हणजे तें वस्तुतः सच्चिदानंदस्वरूप आहे. ॥ २ ॥

तिसऱ्या मंत्रापासून नवव्या मंत्रापर्यंतचे सर्व मंत्र सृष्टीच्या उत्पत्तीचा विचार करणारे आहेत.

---

## मंत्र तिसरा.

**एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेन्द्रियाणि च ।**
**खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—एतस्मात् प्राणः, मनः सर्वेन्द्रियाणि च, खं, वायुः, ज्योतिः, आपः, विश्वस्य धारिणी पृथिवी जायते** ( याच्यापासून प्राण, मनादि सर्वेंद्रियें, आकाश, वायु, तेज, जल आणि विश्वाचें धारण करणारी पृथ्वी हीं उत्पन्न होतात. ) ॥ ३ ॥

मागच्या मंत्रांत ज्या अक्षराचा उल्लेख आहे त्या ब्रह्मापासून प्राण मनादि अंतःसृष्टि आणि आकाश वायु आदि बाह्यसृष्टि उत्पन्न होतात. प्राण, मन, इत्यादि उत्पन्न होण्यापूर्वी ब्रह्माचें स्वरूप प्राणशून्य, मनःशून्य, असेंच असलें पाहिजे. परिच्छिन्नत्व, मर्यादित्व किंवा सगुणत्व प्राप्त झाल म्हणजे अद्वैतस्थिति जाऊन द्वैताची स्थिति प्राप्त होते; एकत्व जाऊन अनेकत्व येतें; याचें कारण उपाधी होत. उपाधी असतात म्हणून सगुणत्व प्राप्त होते किंवा सगुणत्व असतें म्हणून उपाधी येतात, असा अन्योन्याश्रयाचा प्रकार येथें दिसतो. परंतु सगुणत्व म्हणजे उपाधि असा अर्थ केला म्हणजे हा दोष नाहींसा होतो. असो; ह्या सर्व सगुणत्व प्रकट करणाऱ्या उपाधी ब्रह्माच्या अधिष्ठानावर आविर्भूत होतात. यावरून ही एक वर नमूद केलेली गोष्ट सिद्ध होते कीं, ब्रह्मस्वरूपांत स्वरूपतः उपाधी नाहींत. तें निरुपाधिक म्हणून निर्गुण आहे.

आतां प्राण, मन, आदीकरून जी उत्पत्ति या मंत्रांत सांगितली आहे, ती हिरण्यगर्भस्वरूपाची आहे, असें मला वाटतें. हिरण्यगर्भांत प्रथमतः ज्ञानाचें स्फुरण होतांक्षणीं प्राण, मन इत्यादिकांचें आविर्भवन झालें. ही प्राणमनादि अव्यक्त सृष्टि होय. शुद्धज्ञानस्वरूपाला प्राणाच्या उपाधीची अपेक्षा नाहीं. पण विशेषज्ञानाला प्रथम प्राण, नंतर

मन, नंतर इंद्रियें आणि नतर पंचमहाभूतांच्या तन्मात्रा या क्रमानें हिरण्यगर्भाचें स्वरूप सिद्ध झालें. हें स्वरूप अथवा हा जगदात्मा किंवा सूत्रात्मा विराट्ब्रह्माच्या स्वरूपाचें मूल बीज होय. हिरण्यगर्भाच्या आविर्भवनाबरोबरच मूलप्रकृतीचें आविर्भवन होऊन विराट्स्वरूपाचें बीज तयार होतें व योग्य समयीं विराट्स्वरूप अथवा व्यक्तसृष्टीचें समष्टिस्वरूप प्रकट होतें. नंतर व्यक्तसृष्टीचें व्यष्टिरूप अथवा भिन्न चराचर सृष्टि परिणामरूपानें आविर्भूत होतें. हें वृत्त सांगण्याचा अभिप्राय श्रुतींतील मंत्रावरून सिद्ध होतोसें मला वाटतें. स्थूलापासून सूक्ष्म व्हावें, एकरसत्वापासून अनेकरसत्व उत्क्रांत व्हावें, निरिंद्रियापासून (अव्यक्तापासून) व्यक्त व्हावें, हा विसृष्टीचा नियम आहे; तदनुसार श्रुतीनें सृष्टीचा क्रम सांगितला आहे, हें या मंत्रापासून या प्रकरणाच्या शेवटपर्यंतचे सर्व मंत्र काळजीपूर्वक अवलोकिले, तर कोणाच्याही ध्यानांत सहज येईल. ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**अग्निर्मूर्धा चक्षुषी चन्द्रसूर्यौ दिशः श्रोत्रे वाग्विवृताश्च वेदाः । वायुः प्राणो हृदयं विश्वमस्य पद्भ्यां पृथिवी ह्येष सर्वभूतान्तरात्मा ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—अग्निः अस्य मूर्धा, चन्द्रसूर्यौ अस्य चक्षुषी, दिशः अस्य श्रोत्रे, वेदाः वाग्विवृताः, वायुः अस्य प्राणः, विश्वं, अस्य हृदयं** (अग्नि हा विराट् स्वरूपाचें मस्तक, चंद्र सूर्य हे ह्याचे दोन नेत्र, सर्व दिशा हे त्याचे दोन कान, वेद ही उद्घाटन करणारी त्याची वाणी, वायु हा त्याचा प्राण आणि हें सर्व विश्व त्याच्या मनांत असणारे सर्व संकल्प, विकल्प, निश्चय, इत्यादि मनोविकार होत) **पद्भ्यां पृथिवी** (याच्या दोन पायांपासून पृथ्वी उत्पन्न झाली) **हि एषः सर्वभूतान्तरात्मा** (कारण हा सर्व भूतांचा अंतर्यामी आहे.)॥ ४ ॥

ह्या मंत्रांत विराट् स्वरूपाचें वर्णन आहे. पुरुषसूक्तांत ज्या स्वरूपाचें वर्णन केलें आहे, तोच विराट् पुरुष येथें संकलितरीतीनें सांगितला आहे. विराटाच्या पायांपासून पृथ्वी झाली, असें म्हटलें आहे. यावरून मला असें वाटते कीं, याच्या मस्तकापासून अग्नि, डोळ्यांपासून चंद्रसूर्य, कर्णांपासून दिशा, वाणीपासून सर्व वेद, याच्या प्राणापासून वायु आणि याच्या हृदयांत उत्पन्न होणाऱ्या विकारांपासून हें सर्व विश्व उत्पन्न झालें आहे. असा अर्थ निघावा आणि निघतो; पुरुषसूक्तांतही अशाच तऱ्हेचें वर्णन आहे. हा विराट् पुरुष सर्व प्राण्यांचा अंतर्यामी आहे, याचा अर्थ सर्व चराचर सृष्टीचें अंतर्बाह्य नियमन करणारा तोच प्रभु नित्य आहे. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**तस्मादग्निः समिधो यस्य सूर्यः सोमात्पर्जन्य ओषधयः पृथिव्याम् । पुमान्रेतः सिञ्चति योषितायां बह्वीः प्रजाः पुरुषात्संप्रसूताः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ--तस्मात् अग्निः यस्य समिधः सूर्यः** ( त्याच्या पासून अग्नि उत्पन्न झाला. या अग्नीची समिध सूर्य होय. ) **सोमात् पर्जन्यः, पृथिव्यां ओषधयः, योषितायां पुमान् रेतः सिञ्चति** ( सोमापासून पर्जन्य, त्यापासून पृथ्वीमध्यें ओषधी, ओषधींपासून स्त्रीशरीरांत पडणारें पुरुषांचें वीर्य असा ) **पुरुषात् बह्वीः प्रजाः संप्रसूताः** (महापुरुषापासून अनेक प्रकारच्या प्रजा उत्पन्न होण्याचा क्रम आहे ) ॥५॥

येथें अन्यश्रुतींमध्यें सांगितलेल्या पंचाग्नींच्या उत्पत्तीचा व स्वरूपाचा क्रम सांगितला आहे आणि सिद्धांत असा केला आहे कीं, सर्व प्रजांची उत्पत्ति पुरुषापासून, विराट्स्वरूपापासून होते. हा पुरुष प्रथमतः अग्नि उत्पन्न करितो. अग्नीची सूर्य ही एक समिध आहे. या समिधेनें द्युलोक प्रकाशित होतो. तेथून सोमाची उत्पत्ति होते आणि त्यापासून पर्जन्य होतो. हा दुसरा अग्नि होय. पर्जन्य पडला म्हणजे पृथ्वीवर अनेक प्रकारची वृक्षवनस्पतीसृष्टि उद्भूत होते. हा तिसरा अग्नि. ओषधीपासून पुरुषरूपी चौथ्या अग्नींत पुरुषवीर्य उत्पन्न होतें आणि तें स्त्रीरूपी प्रजारूपानें अवतीर्ण होतें. स्त्री हा पांचवा अग्नि. याप्रमाणें पुरुषापासून अग्नि, त्यापासून परंपरेनें पर्जन्य, पृथिवी, नंतर पुरुष आणि नंतर स्त्रिया असें हें पांच अग्नि विराट्स्वरूपासून उत्पन्न होऊन प्रजांची वृद्धि करितात. ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**तस्मादृचः साम यजूंषि दीक्षा यज्ञाश्च सर्वे क्रतवो दक्षिणाश्च । संवत्सरश्च यजमानश्च लोकाः सोमो यत्र पवते यत्र सूर्यः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थ—तस्मात् सर्वे ऋचः, साम, यजूंषि, दीक्षा, यज्ञाः च, क्रतवः च, दक्षिणाः च, संवत्सरः च, यजमानः च, लोकाः** ( त्या विराट्स्वरूपापासून ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद, सर्व संस्कार, सर्व यज्ञ, सर्व

क्रतु, सर्व दक्षिणा, काल, यजमान आणि सर्व भोग–भुवनें उत्पन्न होतात) **यत्र सोमः यत्र सूर्यः पवते** (या भुवनांत सोम आणि सूर्य राहत असून ते या भुवनांस पवित्र करितात.) ॥ ६ ॥

येथें वेदत्रयीची उत्पत्ति, दीक्षा, यज्ञ, ज्यांत पशु मारले जातात ते क्रतु, यज्ञांत दिल्या जाणाऱ्या निरनिराळ्या स्वरूपांची दक्षिणा, कर्म करण्याचे काल, नियम, कर्मकर्ता यजमान आणि कर्मांपासून उत्पन्न होणारीं आणि जीवांस भोगभोगावयास लावणारीं सर्व प्रकरची भुवनें उत्पन्न होतात, असें सांगितलें आहे. सामान्यतः यज्ञकर्मांचीं सर्व अंगें व उपागें यांचा निर्देश येथें केलेला आहे. यज्ञांस अवश्य असणारे वेदमंत्र, यज्ञांतील दीक्षा घेण्याचा संस्कार, त्यांत दिली जाणारी दक्षिणा, त्यांस योग्य असणारा काल, त्यांचे यजमान (यज्ञदीक्षा घेतलेले कर्ते), जेथें भोग भोगले जातात, ते लोक–तीं भुवनें, या सर्वांचा निर्देश आहे. कर्म सकाम किंवा निष्काम असेल त्याच्या अनुसारानें यज्ञकर्त्यास दक्षिणायन किंवा उत्तरायण मार्गानें जावें लागते. असो; येथें यज्ञसंबंधीं विचार आहे आणि याच्याच जोरावर अपराविद्या म्हणजे कर्मविद्या असें आचार्यांनीं म्हटलें आहे. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**तस्माच्च देवा बहुधा संप्रसूताः साध्या मनुष्याः पशवो वयांसि । प्राणपानौ व्रीहियवौ तपश्च श्रद्धा सत्यं ब्रह्मचर्यं विधिश्च ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ–तस्मात् च बहुधा देवाः, साध्याः, मनुष्याः, पशवः, वयांसि, प्राणापानौ, व्रीहियवौ** (त्यापासून अनेक प्रकारचे–वेदांमध्यें सांगितलेले–देव, तसेंच साध्य, मनुष्य, पशु, पक्षी, प्राण आणि अपान वायु व सर्वप्रकारचीं धान्यें उत्पन्न होतात) **तपः श्रद्धा, सत्यं, ब्रह्मचर्यं, विधिः च** (त्या विराट्स्वरूपापासून तप, आस्तिक्यबुद्धि, सत्य, ब्रह्मचर्य आणि कर्तव्याविधि उत्पन्न होतात) ॥ ७ ॥

येथें यज्ञांत उपयोगी पडणारे देवांची व साध्यांची, तसेंच मनुष्य–पशुपक्ष्यांची, प्राणापानादि वायूंची व व्रीहीयवादि हविष्यान्नांची उत्पत्ति होते असें सांगितलें. प्राणादि वायु आणि हविष्यान्नें ही प्राण्याच्या जीवनांस उपयोगी पडणारीं आहेत. नंतर तप, श्रद्धा, सदाचरण आणि कर्तव्यनिश्चित करणारे सर्व विधि यांचा उल्लेख श्रुतीनें केला आहे. आणि यज्ञास अवश्य असणारीं साधनें निर्दिष्ट केलीं आहेत. हें सर्व यज्ञप्रकरण चाललें आहे. आणि यज्ञापासून विश्वाची उत्पत्ति झाली व सर्व कर्में यज्ञांगद्वारा चालतात, असें येथें सांगावयाचें आहे. ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**सप्त प्राणाः प्रभवन्ति तस्मात्सप्तार्चिषः समिधः सप्त होमाः। सप्त इमे लोका येषु चरन्ति प्राणा गुहाशया निहिताः सप्त सप्त ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः—तस्मात् सप्त प्राणाः सप्तार्चिषः, सप्त समिधः सप्त होमाः, इमे सप्त लोकाः प्रभवन्ति** ( त्या विराट्स्वरूपापासून सप्त प्राण ( इंद्रियें ) सप्त विज्ञान–प्रकाश, सप्त विषय, सप्त विज्ञानें, सप्त इंद्रियगोलक हीं उत्पन्न होतात ) **येषु गुहाशयाः निहिताः सप्त प्राणाः चरन्ति** ( ज्या प्रत्येक निरनिराळ्या इंद्रियगोलकामध्यें गुप्तरीतीनें असलेले सातही प्राण संचार करीत असतात. ) ॥ ८ ॥

येथें सात इंद्रियें, बुद्धीनें पाडिलेला सात विषयांच्या विज्ञानावरील प्रकाश, सात प्रकारचे विषय, सात प्रकारचीं ज्ञानें, सात प्रकारचे इंद्रियगोलक आणि प्रत्येक इंद्रिय गोलकामध्यें राहणारा पण न दिसणारा सप्त प्राणांतील एक विशिष्ट प्राण, या सर्वांची उत्पत्ति विराट्स्वरूपापासून होते असें सांगितलें, आपल्यास विषयाचें ज्ञान होतें, तेव्हां पुढील भाग अत्यंत अवश्य असतात. आपण नेत्रानें पहातो; तेव्हां पाहण्याचें सामर्थ्य असणारा डोळा, त्या डोळ्यांतील विषयप्रकाशक प्रकाश, पदार्थाचें स्वरूप, पाहण्याचा विषय, विषय पाहिल्यानंतर पदार्थाचें झालेलें विषयज्ञान आणि डोळा राहण्याचें स्थान इतके भाग अवश्य आहेत. इंद्रियें, इंद्रियांच्या द्वारें झालेलें विषय–ज्ञान, प्रकाश्यविषय, विषयप्रकाश आणि इंद्रियांचीं स्थानें, हें आपल्या ज्ञानाचें पृथक्करण आहे. कोणतेंही ज्ञान होतें, तेव्हां इतक्या गोष्टी अवश्य असतात. मुख्य जो प्राण आहे, त्याचे सात विभाग होऊन ते मन, बुद्धि, आणि पांच इंद्रियें यांच्या ठिकाणीं निरनिराळेपणानें राहत असतात म्हणजे एकेक प्राण एकेक इंद्रियांच्या स्थानामध्यें वास्तव्य करितो. आपणांस जें ज्ञान होतें त्याचें हें केलेलें पृथक्करण चिंतनीय आहे. ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**अतः समुद्रा गिरयश्च सर्वेऽस्मात्स्यन्दन्ते सिन्धवः सर्वरूपाः। अतश्च सर्वा ओषधयो रसश्च येनैष भूतैस्तिष्ठते ह्यन्तरात्मा ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ—अतः सर्वे समुद्राः गिरयः च** ( येथूनच सप्त समुद्र आणि सप्त पर्वत उत्पन्न होतात ) **अस्मात् सर्वरूपाः सिंधवः स्यंदन्ते** ( या विराट्स्वरूपापासूनच निरनिराळ्या स्वरूपाच्या नद्या उत्पन्न होऊन वाहत असतात ) **अतः च सर्वाः ओषधयः रसः च** ( ह्या विराट्-पुरुषापासून सर्व वनस्पती आणि त्यांतील रसही उत्पन्न होतात ) **येन एषः अन्तरात्मा भूतैः तिष्ठते** ( या रसाच्या योगानें हा अंतरात्मा भूतांसहवर्तमान विद्यमान् होतो. ) ॥ ९ ॥

येथें सांगितलें कीं, सात महासमुद्र, सात महापर्वत, आणि सात महानद्या यांची उत्पत्ति विराट्स्वरूपापासून होते. वनस्पतिसृष्टीचा व त्यांत जो रस असतो त्याचा उत्पादक हा विराट्पुरुष आहे. या रसाच्या मुळें विराट्पुरुषाचें लिंगशरीर स्थापित होतें आणि पंचमहाभूतें याला स्थूलशरीर निर्माण करून देतात. रस हें सूक्ष्मशरीर आणि पंचमहाभूतेंही विराट्स्वरूपाचें स्थूळ शरीर होतात. आणि ह्या उभयतांचेंही नियमन हा पुरुष करीत असतो ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**पुरुष एवेदं विश्वं कर्म तपो ब्रह्म परामृतम् ।**
**एतद्यो वेद निहितं गुहायां सोऽविद्याग्रन्थिं विकिर-**
**तीह सोम्य ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थ—पुरुषः एव इदं विश्वं, कर्म, तपः, परामृतं ब्रह्म,** (परमात्मा हाच हें सर्व विश्व, येथें होणारें सर्व कर्म, सर्व ज्ञान, तपश्चर्या आणि अत्यंत उत्तम जो परम पुरुषार्थ ब्रह्मज्ञान—आहे. सारांश, सर्वच ब्रह्म आहे आणि सर्व ब्रह्मच आहे. ) **एतत् गुहायां निहितं यः वेद** ( हें अंतःकरणांत गूढरीतीनें राहिलेलें तत्त्वज्ञान (ब्रह्म) ज्याला समजतें.) **सः सोम्य इह अविद्याग्रंथिं विकिरति** ( हे सौम्य!—या गूढतत्त्वाचें ज्ञान ज्याला होतें तो अविद्येची ग्रंथि नाहींशी करून टाकतो. ) ॥ १० ॥

हें दृश्य विश्व व त्यांतील सर्व सामर्थ्यें, विश्वांत होणारें सर्व कर्म, येथें होणारी सर्व ज्ञानतपश्चर्या आणि येथें प्राप्त होणारें अत्यंत उत्कृष्ट तत्त्वज्ञान—ब्रह्मज्ञान—आणि ब्रह्म हीं सर्व परमात्मस्वरूप आहेत. परमात्मा मात्र " सर्व झाला आहे, असें दिसतें.

सारांश हें सर्व ब्रह्म आहे आणि ब्रह्म हें सर्व आहे, असा श्रुतीचा सिद्धांत आहे. आणि तो सिद्धांत या खंडांत स्पष्टरीतीनें सांगितला आहे. तिसऱ्या, चौथ्या व नवव्या मंत्रांत विश्ववर्णन, पांचव्यांत प्रजोत्पत्ति, सहाव्यांत कर्म, सातव्यांत तप, आठव्यांत ज्ञान, अशा क्रमानें या सिद्धांताचें वर्णन आहे. आणि नवव्यांत विराट्स्वरूपाच्या स्थूल, सूक्ष्म, आणि कारण शरीराचा उल्लेख करून पुनः ब्रह्माचा परोक्ष उल्लेख केला आहे. तात्पर्य, एक ब्रह्म आहे, व व्यवहारांत या पासूनच सर्व उत्पन्न होऊन सर्वांचा लय येथें होतो, असें पहिल्या मंत्रांत सांगून दुसऱ्या मंत्रांत परमात्मस्वरूपाचें वर्णन केलें आहे. असो; एकच ब्रह्म आहे असें गूढज्ञान झालें म्हणजे विश्वाच्या संबंधानें आणि जीवाच्या संबंधानें ज्या कांहीं अविवेकी समजुती असतात, जें अज्ञान असतें, तें सर्व नाहींसे होतें; ब्रह्मज्ञानानें अज्ञान नष्ट होतें आणि अज्ञान नष्ट झालें म्हणजे जीव ब्रह्मरूप होतो, असा सिद्धांत या प्रकरणांत स्थापित केला आहे. ॥ १० ॥

हें सृष्टिप्रकरण होय. ब्रह्मानें सगुण होऊन (सत्त्वगुणाची उपाधि स्वीकारलीसें करून) तप केलें. हें तप म्हणजे पाठीमागील कल्पांत झालेल्या कर्मानुसार पुढील सृष्टीचा स्पष्ट संकल्प होय. असो; या तपामुळें समष्टि व व्यष्टि या उभयसृष्टीच्या उद्भवाचें बीज उत्पन्न होऊन कर्म प्रादुर्भूत झालें. शेवटीं कर्मांचा विपाक म्हणजे हें चराचर विश्व होय. याप्रमाणें हा मंत्र या खंडांतील प्रकरणाचा उपसंहार करून 'एक ब्रह्म आहे' या सिद्धांताची प्रतिष्ठापना करितो. असो; सध्यां इतकेंच पुरे.

द्वितीयमुण्डक प्रथमखंड समाप्त.

---

# द्वितीय–मुण्डक.

## द्वितीय–खण्ड.

### मंत्र पहिला.

**आविः संनिहितं गुहाचरं नाम महत्पदमत्रैतत्स-**
**मर्पितम् । एजत्प्राणन्निमिषच्च यदेतज्जानथ सदस-**
**द्वरेण्यं परं विज्ञानाद्यद्वरिष्ठं प्रजानाम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—आविः संनिहितं, गुहाचरं नाम महत्पदं** (हें प्रकाशरूप असणारें, हृदयाच्यामध्यें व्यवस्थितरीतीनें राहिलेलें, अंतःकर-

णामध्यें व्यापार करणारें आणि मोठ्या वस्तूंनींही ज्याचा आश्रय केला आहे असें, किंवा हें स्वतः अत्यंत मोठें आहे म्हणून ज्याचा सर्व वस्तूंनीं आश्रय केला आहे, असें ) **अत्र एतत् समर्पितं** ( येथें या ब्रह्मामध्यें हें सर्व समर्पित झालें आहे.) **एजत्, प्राणत् निमिषत् च यत्** ( हालचाल करणारें, श्वासोच्छ्वास करणारें, डोळे मिटविणारें जें आहे ) **एतत सदसद्वरेण्यं, प्रजानां विज्ञानात् परं, यत् वरिष्ठं तत् जानथ** ( कार्यकारणरूपी, सर्व चराचरांनीं स्तुति करण्यास योग्य, जें सर्व लोकांच्या विज्ञानाहून अत्यंत श्रेष्ठ व जें श्रेष्ठतम आहे तें ज्ञात करून घ्या. ) ॥१॥

येथें पुनः निरतिशय परब्रह्माचें वर्णन आहे. आणि तसेंच त्याचें ज्ञान करून घ्यावयाचें तें कोणत्या स्वरूपानें घ्यावें, याचेंही वर्णन आहे. श्रुति म्हणतेः हें स्वयंप्रकाश आहे. जीवांच्या अंतःकरणांत हें राहणारें, आणि तेथें शब्दस्पर्शादिरूपांनीं प्रकट होणारें व सर्व पदार्थांचा अंतर्भाव करणारें असल्यामुळें सर्वांहून अत्यंत मोठें, जीवांच्या जागृति, स्वप्न व सुषुप्ति स्थितींत (तिन्ही अवस्थांत) नित्य असणारें, सर्व कारणें आणि कार्यें यांच्याहून विलक्षण असल्यामुळें ( सर्व–कार्य–कारणातीत असल्यामुळें ) सर्ववंद्य, जीवांस होणाऱ्या विषयज्ञानांहून विलक्षण आणि सर्व निर्दुष्ट वस्तूंहून अत्यंत श्रेष्ठ, अशा स्वरूपानें परमात्म्याचें ध्यान करीत जा. येथें ही परब्रह्माच्या सत्, चित् आणि आनंद स्वरूपाचा विस्तार आहे. स्वयंप्रकाशरूपानें तें स्वतंत्रतः सर्वांच्या अंतर्यामीं राहतें, म्हणून अतिसूक्ष्म ब्रह्म ज्ञानरूप आहे. सर्व मोठ्या वस्तूंस आश्रय देतें, म्हणून तें मोठें म्हणजे आनंदरूप आहे. आणि जीवांच्या तिन्ही अवस्थांत तें विद्यमान असतें, म्हणून तें सद्रूप आहे. असें सच्चिदानंद स्वरूप असून तें सर्वकार्यकारणातीत, सर्व ज्ञानविज्ञानातीत आणि सर्वशुद्ध आहे. तात्पर्य, दृश्य विश्वांत दिसणारे विकार येथें कोणत्याही प्रकारें विद्यमान असत नाहींत. आपलें जें आत्मस्वरूप आहे तेंही सच्चिदानंदस्वरूप आहे. तें तिन्ही अवस्थांत जागृत असतें, सर्व इंद्रियजन्यज्ञानांचा आश्रय असतें आणि सर्वांचें व्यापक म्हणून सर्वांपेक्षां अतिशय मोठें असतें. यावरून परमार्थतः आपलें स्वरूप आणि ब्रह्मस्वरूप एक आहे, असें सिद्ध होतें. हेंच आपल्यास जाणून घ्यावयाचें आहे आणि तें जाणून घ्या असा श्रुतीचा उपदेश आहे. श्रवण, वेदांतश्रवण, त्याचें मनन आणि एकाग्रध्यान हा ब्रह्म जाणण्याचा मार्ग आहे. या मंत्रांत प्रथमचा उपाय म्हणजे जें श्रवण, त्याचा स्पष्ट उल्लेख आहे. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**यदर्चिमद्यदणुभ्योणु च यस्मिँल्लोका निहिता लोकिनश्च । तदेतदक्षरं ब्रह्म स प्राणस्तदु वाङ्मनः । तदेतत्सत्यं तदमृतं तद्वेद्धव्यं सोम्य विद्धि ॥ २ ॥**

अन्वय व अर्थ—**यत् अर्चिमत्, यतत् अणुभ्यः अणुच, यस्मिन् लोकाः लोकिनः च निहिताः** ( जें स्वयंप्रकाश आहे, जें लहानाहून लहान असतें आणि ज्यांमध्यें सर्व भुवनें आणि सर्व भुवनस्थ प्राणी राहतात. ) **तत् एतत् अक्षरं ब्रह्म, सः प्राणः, तत् उ वाङ्मनः** ( तें हें अक्षर ब्रह्म आहे, तें प्राण आहे, तें वाणी आहे. ) **तत् एतत् सत्यं, तत् अमतं, तत् वेद्धव्यं, सोम्य ! विद्धि** ( तें हें सत्य आहे, अमृत आहे, वेध करण्यास तेंच योग्य आहे, हे सौम्य, हें जाणून घे. ) ॥ २ ॥

येथें मननाचा विधि उपदेशिला आहे. मनन कसें करावयाचें तें सांगतात. हें ब्रह्म सर्वप्रकाशक आणि स्वयंप्रकाश, लहानाहून लहान असून सर्व चराचर विश्वास आपल्यामध्यें सामावणारें आहे. हें अविनाशी ब्रह्म निर्विकार असून तें प्राणाचा प्राण, वाणीची वाणी आणि मनाचें मन आहे. तें परमार्थतः सत्य असून अविनाशी आहे. अशा स्वरूपानें त्याचें एकाग्र मनन केलें असतां तें जाणतां येईल. मनन करणें ही दुसरी पायरी आहे. श्रवण झालेलें ब्रह्मस्वरूप मननांत जास्त परिचयाचें होतें आणि संभावनादि दोष नष्ट होतात ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**धनुर्गृहीत्वौपनिषदं महास्त्रं शरं ह्युपासानिशितं संधयीत । आयम्य तद्भावगतेन चेतसा लक्ष्यं तदेवाक्षरं सोम्य विद्धि ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ—**महास्त्रं औपनिषदं धनुः गृहीत्वा उपासानिशितं शरं संधयीत** [ ज्याची फेंक अतीशय लांब असते, असें उपनिषदांत सांगितलेलें धनुष्य (ॐकाररूपी धनुष्य) धारण करून त्यावर उपासनेनें तीक्ष्ण झालेल्या बाणाचें ( आत्मरूपी बाणाचें ) संधान करावें ] **आ-**

**धम्य तद्भावगतेन चेतसा लक्ष्यं** ( धनुष्याची प्रत्यंचा लांब ओढून ब्रह्मस्वरूपाशीं तादात्म्य झाला आहे भाव ज्याचा, अशा अंतःकरणानें अंतःकरणोपाधि—जीव—स्वरूपतः—तें ब्रह्म लक्षित करावें.) **सोम्य तत् एव अक्षरं विद्धि** ( हे सौम्य, हें अशा रीतीनें लक्षित केलेलें अविनाशी ब्रह्म जाणून घे ) ॥ ३ ॥

अंतःकरण ही ज्याची उपाधि आहे, त्या मुमुक्षु जीवानें ब्रह्माचें अखंड ध्यान करावें हें वरील श्लोकाचें तात्पर्य आहे.

येथें ध्यानाचा प्रकार सांगितला आहे. उपनिषदांत ओंकाराचें किंवा प्रणवाचें माहात्म्य अनेक वेळ सांगितलें आहे. मुमुक्षूनें प्रणवरूपी धनुष्य सिद्ध करून त्यावर एकाग्र-ध्यानाचा बाण (हा जीवस्वरूपी बाण असावा ) जोडावा. ओंकार या अक्षराचा आकार धनुष्यरूप आहे, हें कोणाही साधकास सहज समजणार आहे. असो; बाण लावून धनुष्याची दोरी इतकी लांब ओढावी कीं, चिदंशासह आपलें सर्व अंतःकरण ओंकार स्वरूप होईल, इतकेंच नव्हे, तर तें ब्रह्मस्वरूप होईल आणि याप्रमाणें चित्त ब्रह्मस्वरूपी एकाग्र झाल्यानंतर लक्ष्य जें ब्रह्म त्यावर ध्यानाचा बाण सोडावा. तात्पर्य ओंकारस्वरूपाच्या साहाय्यानें आपण ब्रह्मस्वरूपाचें ध्यान करावें आणि हें ध्यान करतांना आपलें चित्त इतर सर्व विषयांपासून निवृत्त करून एक परमात्मस्वरूपीं मात्र तें लावावें. असें एकनिष्ठ ध्यान साधकांनीं केलें असतां त्यांला ब्रह्मस्वरूपाचें ज्ञानविज्ञान होऊन ते ब्रह्मस्वरूप होतील, यांत संदेह नाहीं. येथें संप्रज्ञात ( सविकल्प ) व असंप्रज्ञात ( निर्विकल्प ) समाधींचा उल्लेख आहे. याप्रमाणें श्रवण, मनन आणि निदिध्यास हीं मुख्य साधनें सांगितलीं. ध्यानानें विपरीतभावनादि सर्व दोष निवारित होतात आणि ब्रह्मसाक्षात्कार होतो. ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ।**
**अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयो भवेत् ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—हि प्रणवः धनुः, आत्मा शरः, ब्रह्म तल्लक्ष्यं उच्यते** ( कारण प्रणव—ओंकार—याला धनुष्य म्हणतात; आत्मा—जीव—ह्याला बाण म्हणतात, आणि ज्याच्यावर आपल्यास नेम धरावयाचा आहे, त्याला ब्रह्म म्हणतात ) **अप्रमत्तेन वेद्धव्यं** ( या लक्ष्यरूपी परब्रह्मावर सावधानक नेम धरावा ) **शरवत् तन्मयः भवेत्** ( म्हणजे बाण

लक्ष्यामध्यें जसा घुसतो, त्याप्रमाणें आपला आत्मा ब्रह्मस्वरूपामध्यें शिरून त्याच्यामध्यें एकरूप होईल. ) ॥ ४ ॥

हा मंत्र पाठीमागील मंत्रानुसार निर्मळ जीवानें प्रणवाचा आधार घेऊन व ब्रह्माकडे एकाग्र दृष्टी ठेवून अवधानपूर्वक ध्यान केलें असतां, निर्मळ अंतःकरणाच्या जीवानें ध्यान केलें असतां, कोणतें फळ प्राप्त होईल हें स्पष्ट सांगितलें आहे. ब्रह्मस्वरूपाचें यथार्थ श्रवण करून एकाग्रमनन केलें आणि एकनिष्ठ अंतःकरणानें ब्रह्माचें मात्र ध्यान सावधतेनें केलें म्हणजे आत्मा ब्रह्म होतो. हें असें आत्मध्यानाचें फल आहे. येथें 'अप्रमत्त' हें पद ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. गाढ निद्रा आणि एकाग्रसमाधि यांत कोणताही विशेष नाहीं, असें कित्येक साधकांस वाटण्याचा संभव आहे. त्याचा निरास श्रुतीनें येथें केला आहे. गाढ निद्रेमध्यें आपला जीव सर्व उपाधींपासून निवृत्त होतो. या वेळीं मनबुद्धीसह सर्व ज्ञानेंद्रियें आणि कर्मेंद्रियें स्तब्ध राहतात. तशींच एकाग्र समाधीच्या वेळीं हीं सर्व इंद्रियें आपापल्या विषयांसह परावृत्त झालेलीं असतात. एक प्राणवायुमात्र दोन्ही स्थितींत आपलें कार्य करीत राहतो, तेव्हां दोन्ही स्थिती सारख्याच असें कोणास वाटण्याचा संभव आहे. पण अभंग समाधीस्थितीमध्यें शरीरांतील प्राणांचे ही व्यापार स्तब्ध होतात, हा एक भेद विसरतां कामा नये. त्याचप्रमाणें निद्राकालीं आपला जीव आत्मसुखाचा अनुभव घेत असतो, तरी त्याला त्यावेळीं आपण अनुभव घेत आहों, असें भान नसतें. पण समाधिस्थितींत हें स्वरूपभान विद्यमान असतें, हा दुसरा विशेष आहे आणि हा विशेष विसरूं नये म्हणून अप्रमत्तता किंवा सावधानपणा असणें जरूर आहे, असें श्रुतीनें 'अप्रमत्तेन' या पदानें स्पष्ट दाखविलें आहे. अत्यंत तीव्र ध्यानांत भानही असणें शक्य नाहीं. तथापि त्यावेळीं जीवाची ज्ञानपूर्ण आत्मस्थिति असते. पण निद्राकालीं जीव हा सोपाधिक असतो, हें अनुभवसिद्ध आहे. आपण स्वभावतः जागे होतों तेव्हां व झोंपेपूर्वी सोपाधिकच असतो. पण समाधींतून उत्थान होतें, तें इतरांकडून होतें. म्हणून त्यावेळीं सर्व उपाधींचा नाश झालेला असतो. असो आत्मस्वरूपाचें एकाग्र चित्तानें ध्यान केलें म्हणजे आत्मप्राप्ति होते हा फलितार्थ आहे ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**यस्मिन्द्यौः पृथिवी चान्तरिक्षमोतं मनः सह प्राणैश्च सर्वैः । तमेवैकं जानथ आत्मनामन्या वाचो विमुञ्चथामृतस्यैष सेतुः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—यस्मिन् द्यौः, पृथिवी च, अन्तरिक्षं सर्वैः प्राणैः सह मनः ओतं ( ज्यामध्यें द्युलोक, पृथ्वीलोक आणि अंतरिक्षलोक,**

व सर्व प्राणांसह मन हीं सर्व समर्पित झालीं आहेत ) **तं एव एकं आत्मानं जानथ** ( त्या एक आणि अद्वितीय आत्म्याचें ज्ञान करून घ्या ) **अन्याः वाचः विमुञ्चथ** ( अन्य सर्व वाणींचा, ज्ञानांचा त्याग करा ) **एषः अमृतस्य सेतुः** ( हा मोक्षपदास नेणारा सेतु आहे ) ॥ ५ ॥

आत्मस्वरूप समजणें परम कठिण आहे. म्हणून श्रुति पुनः पुनः त्याच स्वरूपाचें वर्णन करून साधकांस ब्रह्म-ज्ञान करून देण्याचा प्रयत्न करीत आहे. येथें सांगितलें आहे कीं, सर्व त्रैलोक्य आणि प्राणांसह मन हीं सर्व ब्रह्मस्वरूपांत अंतर्भूत होतात. म्हणून द्युलोकाचें, पृथ्वीचें व अंतरिक्षाचें, त्याचप्रमाणें प्राणांचे व अंतःकरण-चतुष्टयाचें ज्ञान देणाऱ्या ब्रह्माचें स्वरूप जें शास्त्र सांगतें त्या शास्त्रांपासून मात्र आपलें आत्यंतिक कल्याण होईल. अपरविद्येनें आपल्यांस सर्व उपाधींपासून मुक्त होतां येईल, अशी जर साधकांची कल्पना असेल तर ती कल्पना त्यांनीं सोडून द्यावी आणि एक आत्मस्वरूप मात्र जपून जाणून घेण्याचा अखंड प्रयत्न करावा. संसारसागरांतून तरून पलीकडे नेण्याचें, मोक्ष मिळवून देण्याचें जर कांहीं साधन असेल तर तें एक आत्मज्ञान मात्र आहे, असें श्रुतीला येथें सांगावयाचें आहे ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**अरा इव रथनाभौ संहता यत्र नाड्यः स एषोऽन्तश्चरते बहुधा जायमानः । ओमित्येवं ध्यायथ आत्मानं स्वस्ति वः पाराय तमसः परस्तात् ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थ—रथनाभौ अराः इव यत्र नाड्यः संहताः** ( रथाच्या नाभीमध्यें ज्याप्रमाणें चक्रांच्या सर्व अरा जाऊन मिळतात, त्याप्रमाणें जेथें सर्वशरीरव्यापी—सर्व शरीरांत संचार करणाऱ्या—नाड्या एकत्र होतात ) **सः एषः बहुधा जायमानः अंतः चरते** ( त्या नाड्या ज्या हृदयांत एकत्र होतात त्याच्या अंतर्यामी राहून अनेक प्रकारें प्रकट होणारा आत्मा सर्वत्र संचार करीत असतो ) **ॐ इति एवं आत्मानं ध्यायथ** ( पूर्वोक्त लक्षणानें युक्त असणाऱ्या आत्म्याचें ॐस्वरूपानें ध्यान करा ) **तमसः परस्तात् पाराय स्वस्ति वः** ( अंधकाराच्या पलीकडे असणाऱ्या दुसऱ्या तीराकडे जात असतां तुमचें कल्याण असो ) ॥ ६ ॥

या मंत्रांत शरीरांतील सर्व देहव्यापी नाड्या हृदयांत एकत्र होऊन तेथें वास्तव्य करणाऱ्या अंतरात्म्याच्या नियंतृत्वाखालीं राहत असतात आणि तेथें राहून सर्व शरीरभर पसरणाऱ्या नाड्यांच्या विद्यमानें हा आत्मा आपल्यांस अनेक स्वरूपांनीं प्रकट करीत असतो, असें सांगितलें. जीवाच्या हातून होणाऱ्या सर्व क्रिया आणि त्याला होणारीं सर्व विज्ञानें हीं एका आत्म्याचीं निरनिराळीं दृश्यमान स्वरूपें प्रकट करीत असतात. रथनाभीचा ताबा घेतला म्हणजे त्या रथाच्या सर्व अरा ज्याप्रमाणें आपल्या ताब्यांत येतात, त्याप्रमाणें आत्मस्वरूप आपल्या हातीं आलें म्हणजे सर्व प्रकट होणारीं स्वरूपें आणि तीं प्रकट होण्याचीं द्वारें सहज आपल्या ताब्यांत येतात. सारांश एक आत्मशास्त्राचें ज्ञानविज्ञान झालें कीं सर्व अपरविद्येचें व तिचे विषय असणाऱ्या शास्त्रांचें ज्ञानविज्ञान तुम्हांस होईल. असें आहे म्हणून श्रुति म्हणते कीं आम्हीं आतांपर्यंत आत्मस्वरूपाचें जें वर्णन केलें आहे, त्याचें ध्यान ओंकारस्वरूपानें करा म्हणजे मोक्षमार्गीकडे जातांना तुम्हांस सर्वत्र प्रकाशाचें साम्राज्य मिळेल. आत्मज्ञानाव्यतिरिक्त हें सर्व विश्व आणि त्यांतील सर्व चराचर पदार्थ म्हणजे एक शुद्ध अंधकाराचा भयंकर प्रदेश आहे. पण या प्रदेशांत आत्मज्ञानाची दीपिका घेऊन व आत्मस्वरूपाचें अखंड ध्यान करून जर तुम्ही भवसागर तरून जाण्याचा उद्योग केला तर तुम्हांस कोठेंही अडचण न येतां तुमचें परम कल्याण होईल. आत्मस्वरूपाचें यथार्थ ध्यान करणें केवळ असाध्य आहे म्हणून वेदविर्गीत जें ओंकारस्वरूप त्याचें ज्ञानपूर्वक ध्यान करा म्हणजे तुमचें सर्व प्रतिबंध नाहींतसे होऊन तुम्हांस आत्मज्ञानाची जोड मिळेल. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**यः सर्वज्ञः सर्वविद्यस्यैष महिमा भुवि । दिव्ये ब्रह्मपुरे ह्येष व्योम्न्यात्मा प्रतिष्ठितः । मनोमयः प्राणशरीरनेता प्रतिष्ठितोऽन्ने हृदयं संनिधाय । तद्विज्ञानेन परिपश्यन्ति धीरा आनन्दरूपममृतं यद्विभाति ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ—यः सर्वज्ञः, सर्ववित्, यस्य एषः महिमा भुवि, दिव्ये. ब्रह्मपुरे, हि एषः आत्मा व्योम्नि प्रतिष्ठितः** ( जो सर्वज्ञ आणि सर्ववेत्ता आहे, ज्याचा हा सर्व प्रसिद्ध महिमा भूलोकीं, द्युलोकीं व ब्रह्मपुरांत जगद्विश्रुत आहे तो हा आत्मा व्योमामध्यें प्रतिष्ठित झाला आहे ) **मनोमयः प्राणशरीरनेता अन्ने प्रतिष्ठितः** ( हा आत्मा मनोमय प्राण

आणि शरीर यांचा चालक असून अन्नामध्यें प्रतिष्ठित झाला आहे. ) **यत् आनंदरूपं अमृतं विभाति तत्—अमृतं आनंदरूपं—धीराः हृदयं संनिधाय परिपश्यंति** (तो सर्वप्रकाशक आत्मा, तसेंच, अमृतरूपी आणि आनंदरूपी आत्मा हृदयामध्यें ध्यानानें प्रतिष्ठित झाल्यामुळें त्याचें ज्ञान-विज्ञान होऊन तो विवेकीपुरुषांस स्वस्वरूपानें प्रकाशित होतो ) ॥ ७ ॥

येथें पूर्वीं सांगितलेल्या सर्व विशेषणांचा उपसंहार करून आणखी कांहीं आत्मस्वरूपाचें वर्णन करणाऱ्या विशेषणांचा उल्लेख केला आहे. तो सर्वज्ञ आहे व प्रत्येक पदार्थाचें प्रत्येक स्वरूप जाणणारा आहे. त्याचा सर्वप्रसिद्ध महिमा सर्व त्रैलोक्यभर आणि सर्व अंतःसृष्टीमध्यें पसरलेला आहे. कारण तो हृदयाकाशामध्यें प्रतिष्ठित झाला आहे. तो मनाचा नियंता असून मनोद्वारानें प्रकट होतो. तो प्राणांचा व शरीरांचा, सारांश, जीवांचा चालक आत्मा अन्नामध्यें म्हणजे अव्याकृत जी मूल प्रकृति तिचे ठिकाणीं राहून तिचें नियमन करितो. अशा प्रकारचें परमात्म्याचें स्वरूप आहे. या स्वरूपाचें ज्ञान होऊन ज्या विवेकी पुरुषांस विज्ञान झालें, त्यांना सर्व प्रकाशक जो आपला आत्मा तोच परमात्मा असून तो अमर ( नित्य असणारा ) आनंदरूप आणि ज्ञानरूप आहे, असा स्पष्ट साक्षात्कार होतो. कारण उघड आहे कीं, हृदयांत राहणारा व आनंदरूप व अमृतस्वरूप असणारा जो आपला शुद्ध आत्मा, त्याचें एकनिष्ठ ध्यान करून जे नर त्याचें ज्ञानविज्ञान करून घेतात त्यांस परमात्मस्वरूपाचें ज्ञानविज्ञान पूर्ण होतें. आत्मा व परमात्मा एकच, तेव्हां एकाचें ज्ञान म्हणजे दुसऱ्याचें ही ज्ञान सहज होऊन त्या ज्ञानाला विज्ञानत्व येतें. सारांश, श्रवण मनन आणि ध्यान या साधनांनीं ज्या विवेकीपुरुषानें सर्व विषयांचा त्याग करून व सर्वइंद्रियांचा उपशम करून आत्मस्वरूपाचें ओंकारद्वारा मोक्षप्रीत्यर्थ अखंड ध्यान केलें, निर्विषय मन करून तें ज्यांनीं हृदयवासी परमात्मस्वरूपामध्यें मात्र समर्पित केलें, त्यांना आपलें स्वरूप सच्चिदानंदरूप आहे, असें साक्षात्कारी ज्ञान होतें. इतकेंच नव्हे, तर परमात्मा ही सच्चिदानंदस्वरूप असून आत्मा व परमात्मा एकच, असें अद्वितीय ब्रह्माचें ज्ञान होऊन साक्षात्कार होतो. येथें मीं अन्वय निराळ्या तऱ्हेनें लाविला आहे, त्याचा विचार विद्वान् लोक करोत ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः । क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ—तस्मिन् परावरे दृष्टे हृदयग्रंथिः भिद्यते, सर्वसंशयाः छिद्यन्ते, अस्य कर्माणि क्षीयंते च** ( त्या परब्रह्माचें आणि अपर-

ब्रह्माचें ज्ञानविज्ञान ज्याला झालें, त्याच्या हृदयग्रंथीचा उच्छेद होतो, सर्व संशयांचें निराकरण होतें आणि त्यांचीं सर्व कर्में नाहींशीं होतात ) ॥ ८ ॥

मागच्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला व पर आणि अपर ब्रह्माच्या स्वरूपाची योग्यता ज्यास कळली, त्याच्या सर्व अविद्येनें उत्पन्न केलेल्या गांठी तुटून जातात. जीवाच्या हृदयामध्यें वास्तव्य करणाऱ्या अविद्याजनित वासनांचा समूह होऊन एक मोठें थोरलें गांठोडें बनलेलें असतें, या गांठोड्याला अविद्याग्रंथि असें नांव आहे. असो; विज्ञानी पुरुषाची अविद्याग्रंथि वर सांगितल्याप्रमाणें तुटते. त्याला जे संशय अथवा विपरीत भावना असतात, त्या सर्वांचें निराकरण होतें आणि त्यानें जीं जीं काय कर्में केलीं असतील त्या कर्मांपैकीं, जीं फलोन्मुख झालेलीं नसतात, तीं कर्में ( म्हणजे सर्व पूर्वसंचित ) यांचा नाश होतो. याचें कारण हें आहे कीं, त्याची अविद्या नाहींशी झालेली असते. आपण देह आहों; मन आहों; हा पुत्रमित्रकलत्रादि संसार आपल्या उपभोगासाठीं निर्माण झाला आहे, म्हणून तो माझा आहे, मला मरण येईल; इत्यादि प्रकारची जी भ्रांति अज्ञानामुळें जीवाला होत असते ती भ्रांति आत्मज्ञानाच्या परिपाकानें नाहींशी झाली; मी स्वरूपतः ब्रह्म आहें, असा निश्चय झाला; म्हणजे त्या पूर्णकामपुरुषाच्या विषयवासना विगलित होऊन जातात, यांत काय आश्चर्य आहे ? त्याचप्रमाणें मी ब्रह्म आहें, असा दृढनिश्चय झाल्यावर हें खरें किंवा तें खरें, इत्यादि प्रकारचें जें संशय असतात, ते सर्वच्या सर्व निराकृत होऊन जातात, हें सांगावयास पाहिजे काय ? शेवटीं मी कर्ता नव्हें, मी भोक्ता नव्हें, कर्म करून मला कांहीं मिळवावयाचें नाहीं, किंवा कर्म न केलें तर माझी कोणतीही हानि व्हावयाची नाहीं, कारण मी स्वरूपतः अकर्ता आहे, पूर्ण आहे, नित्य आहे, शुद्ध आहे, असें ज्ञान ज्यांस झालें त्याचें सर्व पूर्वसंचित दग्ध होऊन नाहींसे होतें, हें काय सांगावें ? शिवाय, मला असें वाटतें कीं पूर्वसंचित म्हणजे पूर्वकर्में फलोन्मुख होऊन भुक्त झाल्यानंतरच अज्ञानजन्य वासना आत्मज्ञानानें नष्ट होऊन क्रियमाण अर्थशून्य होतें व याप्रमाणें सर्व कर्मांचा नाश होतो. याप्रमाणें आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला असतां वासनेचा घट फुटतो, संशयाचें जाळें तुटतें आणि कर्मसंतति वासनेसह छिन्नविच्छिन्न होते, हें मुख्यतः श्रुतीस सांगावयाचें आहे. मंत्रांतील ‘ परावर ’ हें पद अपरब्रह्म आणि परब्रह्म या उभयतांचा अंतर्भाव करणारें आहे. म्हणजे श्रुतीला अपर विद्येचें ज्ञान जीवांनीं प्रथम करून घ्यावें; नंतर अपर विद्या संशयाचा उच्छेद करीत नाहीं, असें विवेकानें ज्ञान होतें. अर्थातच तें टाकून देऊन परब्रह्मज्ञान करून घ्यावें म्हणजे श्रुतीनें सांगितलेलें तत्त्व गुरुद्वारां समजून घ्यावें, असा अर्थ इष्ट आहे, असें मला वाटतें. असो ॥ ८ ॥

## मंत्र नववा.

**हिरण्मये परे कोशे विरजं ब्रह्म निष्कलम् ।**
**तच्छुभ्रं ज्योतिषां ज्योतिस्तद्यदात्मविदो विदुः ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ—निष्कलं विरजं ब्रह्म हिरण्मये परे कोशे** ( निष्कळ म्हणजे निरवयव आणि विरज म्हणजे शुद्ध ब्रह्म हें हिरण्मय म्हणजे जीवाचें जें प्रकाशात्मक ज्ञानविज्ञान त्याच्या श्रेष्ठ कोशांत—म्यानांत राहात असून ) **यत् आत्मविदः विदुः तत् शुभ्रं ज्योतिषां ज्योतिः** ( ज्याचें ज्ञान आत्मवेत्त्यांस होतें तें ब्रह्मतत्त्व शुभ्र आणि प्रकाशांचें प्रकाशक आहे ) ॥ ९ ॥

येथें आत्म्याच्या अंतर्यामीपणाचा स्पष्ट उल्लेख आहे. विषयांस प्रकाशित करणारा जो आपला विज्ञानमय कोश आहे तो इतर सर्व कोशांहून श्रेष्ठ आहे. अन्नमय कोश, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय असे पांच कोश श्रुतीला संमत आहेत. त्यां पैकीं शुद्ध आनंदमय कोश हेंच ब्रह्मस्वरूप आहे असें कोठें कोठें सांगितलेलें आहे. हा आनंदमय कोश विज्ञानमय कोशाच्या अंतर्यामीं असून त्याचें नियमन करितो, म्हणून येथें विज्ञानमय कोशाला सर्वश्रेष्ठ कोश असें म्हटलें आहे. असो; या कोशांत अवयव-शून्य म्हणजे एकरस आणि विरज म्हणजे शुद्ध ( अथवा सत्त्वरजतमांनीं परिवेष्टित न झालेलें ) असणारें हें ब्रह्म आहे. तें स्वतः शुभ्र असून जेवढे म्हणून प्रकाशक पदार्थ या विश्वांत आहेत, त्या सर्वांस आपल्या स्वयंभु प्रकाशानें प्रकाशित करून त्यांना इतर विषय प्रकाशित करण्याचें सामर्थ्य देणारें आहे. सारांश, हें ब्रह्म स्वयंप्रकाश, निर्मळ, एकरस आणि निर्गुण अशा स्वरूपाचें आहे. हें विज्ञानमय-कोशांत राहतें. हा नववा मंत्र पहिल्या दोन मंत्राचा व मागील प्रकरणांत आलेल्या वर्णनाचा उपसंहार करितो. तसेंच, तीनपासून सातपर्यंतच्या सर्व मंत्रांत सांगितलेले सिद्धांत एकवट करितो आणि ध्यानाचें फळ सांगतो ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः । तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थ—तत्र सूर्यः न, चन्द्रतारकं न भाति, इमाः विद्युतः न भांति, अयं अग्नि कुतः** ( तेथें सूर्य आपला प्रकाश पाडूं शकत नाहीं,

चंद्रतारकांचे किरणांस तेथें जाण्याचें सामर्थ्य नाहीं, या अत्यंत तेजस्वी विद्युद्दीपिका तेथपर्यंत पोहचूं शकत नाहींत, मग आपल्यांस दिसणाऱ्या अग्नीची काय कथा सांगावी ? ) **तं एव भान्तं सर्वं अनुभाति, तस्य भासा इदं सर्वं विभाति** ( आत्मप्रकाश प्राप्तझाल्यानंतर मात्र सूर्य-चंद्रादि प्रकाशित होऊन ते इतर विषयांस प्रकाशित करतात. म्हणजे त्याच्या भासानें सूर्यचंद्रादि प्रकाशक पदार्थ आणि अप्रकाशक वस्तु प्रकाशित होतात ) ॥ १० ॥

या मंत्राचा कठोपनिषदांत विचार पूर्णपणें झाला आहे येथें इतकेंच सांगावयाचें कीं मागील मंत्रांत ब्रह्माला प्रकाशकाचें प्रकाशक म्हटलें आहे तें कां ? याचें स्पष्टीकरण या मंत्रांत आलेलें आहे. तात्पर्य हें आहे कीं ज्ञानरूप म्हणजे अस्तित्वरूप ब्रह्माचा जेव्हां स्वीकार करावा, तेव्हां चंद्रसूर्यादि प्रकाशक व इतर सर्व प्रकाश्य वस्तु ज्ञानरूप म्हणजे अस्तित्वरूप अशा इंद्रियोपहित (इंद्रियादि उपाधि असणाऱ्या) जीवाला भासतात व दिसतात. तात्पर्य ब्रह्माभाव झालाच ( होणें नाहींच म्हणा ! ) तर सर्व शून्याकारच होईल, असें ही म्हणतां यावयाचें नाहीं; कारण शून्य तरी ज्ञानरूप आणि **नाहींसे होणें** म्हणजे तरी अस्तित्वच ! एवंच ब्रह्माचें अस्तित्व केव्हांही नाकारतां येत नाहीं १०

---

## मंत्र अकरावा.

**ब्रह्मैवेदममृतं पुरस्ताद्ब्रह्म पश्चाद्ब्रह्म दक्षिणतश्चो-त्तरेण । अधश्चोर्ध्वं च प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् ॥ ११ ॥**

## इति द्वितीयमुण्डकं समाप्तम् ।

**अन्वय व अर्थ—अमृतं ब्रह्म एव इदं पुरस्तात्, ब्रह्म पश्चात्, ब्रह्म दक्षिणतः, च उत्तरेण, अधः च, ऊर्ध्वं च, प्रसृतं ब्रह्म एव इदं विश्वं, इदं वरिष्ठं** ( हें सर्व आपल्यापुढें जें विविधरूपी विश्व विस्तारलें आहे, जें आपल्या पाठीमागें आहे, आपल्या दक्षिणेला आणि उत्तरेला, आपल्या वरील लोकांत आणि आपल्या खालींल लोकांत जें हें ब्रह्मांड जीव किंवा जीवेतर दृष्टीला प्रत्यक्ष होतें, तें सर्व अमृत ब्रह्म आहे. सर्व विश्व

ब्रह्म आणि जी जी कोणती श्रेष्ठ वस्तु आहे, तीही ब्रह्मच आहे; व श्रेष्ठ वस्तु सर्वाधार ब्रह्म आहे ) ॥ ११ ॥

हा सर्व प्रकरणाचा उपसंहार आहे. जीवांस व देवांस ज्या ज्या वस्तु दाही दिशांस सर्व विश्वभर पसरलेल्या दिसतात त्या त्या वस्तू परमार्थतः ब्रह्मरूप आहेत, असें येथें मागील मंत्रांवरून सिद्ध झालेल्या सिद्धांतांचें स्वरूप उपसंहाररूपानें सांगावयाचें आहे. आपल्यास आपल्या परिच्छिन्न इंद्रियांच्या द्वारानें ज्याचें ज्ञान होतें, तें हें विश्व परमार्थदृष्टीनें पाहिलें असतां ब्रह्मरूप आहे असा—आपला निश्चय होईल. त्याचप्रमाणें विश्वाला सत्त्वादिगुणात्मक मायेनें व्यापून टाकल्यामुळें त्यानें आपल्यास भिन्न भिन्न नामरूपांनीं दिसावें, अशी जी योजना तिनें केली आहे, ती क्षणभर एकीकडे ठेविली आणि आत्मस्वरूपानें—आपल्यास करतां आलाच तर—आपल्यास आंत बाहेर दिसणारें विश्व तेंही ब्रह्मरूप आहे आणि म्हणून आपणही ब्रह्मरूप आहों, असा आपला निश्चय होईल. या मंत्रांतील ‘ ब्रह्मैवेदं ’ ‘ विश्वमिदं वरिष्ठं ’ या पदांची जास्त चिकित्सा केली असतां मी म्हणतों तो अर्थ सिद्ध होईल असें मला वाटतें. ‘ ब्रह्म एव इदं विश्वं ’ म्हणजे जे जे म्हणून ज्ञेय पदार्थ आपल्यास इंद्रियमनोबुद्धिद्वारां दिसतात, ते पदार्थ आपल्याला जीं परिच्छिन्न मनोबुद्धीसह ज्ञानेंद्रियें मिळालीं आहेत, ज्या उपाधी प्राप्त झाल्या आहेत, त्यामुळें तें विश्व व विश्वगत पदार्थ आपल्यांस कालस्थलांनीं मर्यादित झालेले, कार्यकारणरूपी आणि नामरूपान्वित आहेत असें दिसतें. कालस्थलाच्या मर्यादा घेऊन मन हें विश्वव्यवस्था लावण्याचा प्रयत्न करतें. कार्यकारणांच्या मर्यादा घेऊन आपली बुद्धि विश्वाची व्यवस्था निश्चित करिते आणि इंद्रियें विश्वांचें जडस्वरूप आपल्यांस दाखवितात. हा सर्व मनोबुद्धींचा आणि इंद्रियांचा व्यापार व झालेला ज्ञानविस्तार वर्ज केला म्हणजे बाकी सत्तारूपात्मक ब्रह्म मात्र राहील, असें मला वाटतें. त्याच प्रमाणें जड विश्वापेक्षां वरिष्ठ असणारीं जीं आपलीं ज्ञानेंद्रियें त्यांस तमोगुणात्मक विश्व ज्या पद्धतीनें परिणत होत आहे तीच परिणति किंवा परिणाम परिच्छिन्न करीत असते. हा परिछिन्नत्वाचा भास सोडून दिला म्हणजे बाकी ब्रह्मच राहील. जीवानें अहंकाराचा, अंतःकरणचतुष्टयाचा, ज्ञानकर्मेंद्रियांचा, प्राणांचा आणि जड शरीरांचा परित्याग केला. सारांश, सर्व उपाधी टाकून दिल्या म्हणजे जीवाचें जीवत्व (परिच्छिन्नत्व) नाहीसें होऊन तो ब्रह्मरूप राहील आणि जगाच्याही सर्व उपाधी नष्ट झाल्या म्हणजे पुढें, पाठीमागें, दक्षिणेकडे, उत्तरेकडे, खालीं व वर, सर्वत्र कार्यकरण, नामरूप इत्यादि सर्व परिच्छिन्न परिकल्पितें, ( उपाधी ) नाहींशीं होऊन एक ब्रह्म मात्र घनदाट सर्वत्र एकरसानें ओतप्रोत भरलेलें आहे, येथें चराचर जडाजड, परापर, असा कोणताही एक भाग शिलक न राहतां एक ब्रह्म मात्र स्वसत्तेनें अवशिष्ट राहील, असें परोक्षज्ञान अधिकारी श्रवणकर्त्याला होईल आणि या श्रवणाला गुरूच्या साहाय्यानें मननाचे आणि ओंकारस्वरूपीं एकाग्र आणि एकनिष्ठ ध्यानाचे अखंड संस्कार झाले, म्हणजे

विवेकी मुमुक्षूला ब्रह्मसाक्षात्कार होऊन तो आपण ब्रह्मस्वरूप होईल. याप्रमाणें हा मंत्र ' एकमेवाद्वितीयं ' या अन्य श्रुतीची सार्थकता करितो. असो; ह्या प्रकरणांत ब्रह्मस्वरूप कसें जाणावें, हें व त्याला जाणण्याचीं श्रवण, मनन, निदिध्यास हीं तीन साधनें सांगून मुमुक्षूच्या सोईसाठीं पुनः पुनः ब्रह्मस्वरूपाचें वर्णन केलें आहे, तें आस्तिक्य बुद्धीच्या साधकाचा परमार्थ निश्चयपूर्ण करील, असें मला वाटतें ॥ ११ ॥

## द्वितीय मुण्डक समाप्त ।

---

# तृतीय–मुण्डक ।

---

## खड पहिलें.

---

### मंत्र पाहिला.

**द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते । तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—द्वा सुपर्णा, सयुजा सखाया, समानं वृक्षं परिषस्वजाते** ( दोन सुंदर पंख असणारे, सहचर स्नेही–पक्षी–एकाच वृक्षाचा आश्रय घेऊन राहिले आहेत ) **तयोः अन्यः स्वादु पिप्पलं अत्ति, अन्यः अनश्नन् अभिचाकशीति** ( त्या दोघांपैकीं एक जण गोड फळें खातो आणि दुसरा पक्षी कांहीं एक न खातां साक्षीस्वरूपानें मात्र असतो ) ॥ १ ॥

जीव आणि शिव (जीव आणि परमात्मा) या उभयतांवर हें रूपक केलें आहे. तें उपनिषद्–गत मंत्राचें मनोगत उत्तम रीतीनें सिद्धीस नेतें. एकाच वृक्षाचा आश्रय घेऊन दोन सुंदर पक्षी अत्यंत स्नेहानें एकत्र राहतात हें रूपक आहे. जीव व शिव हे ते दोन पक्षी होत. एकाच वृक्षाचा म्हणजे शरीराचा आश्रय घेऊन जीव व शिव असतात. उभयतांचें ही वास्तव्य जीवांच्या हृदयामध्यें असतें. ते नित्य सहचर आहेत. जेथें जीव असतो तेथें शिव असावयाचा आणि जेथें शिव प्रकट होतो तेथें जीव असावयाचाच, असा त्यांचा संबंध आहे. त्यांचा विरह झालेला केव्हांही दिसत नाहीं. ते एक-

मेकांचे स्नेही आहेत. 'सखायौ' याचा स्नेही असा अर्थ करावा किंवा श्री शंकराचार्य म्हणतात त्याप्रमाणें उभयतांचीही अभिव्यक्ति (प्रकट न, प्रकट होणें) एकाच कारणानें होतेः म्हणून त्यांस एक अर्थाचें नांव आहे, असें म्हणावें. तसाच उभयतांचा जन्मवृत्तांत एकाच तऱ्हेचा असतो. जीव आणि शिव या उभयतांचा जन्म म्हणजे त्यांचें आविर्भूत होणें एकाच कारणानें म्हणजे अविद्येच्या योगानें होतें. ब्रह्म आविर्भूत व्हावयाचें म्हणजे तें जीव आणि शिव या ज्ञातृत्वरूपानें होतें. याप्रमाणें ज्ञानरूपी पक्ष (पंख) असणारे दोन सहचर पक्ष्यांचा जन्मवृत्तांत आहे. श्रीमध्वाचार्य म्हणतात:— त्याप्रमाणें शिव हा नित्य जीवावर उपकार करणारा असतो आणि जीव विवेकी असेल तर शिवाची आराधना करणारा असतो. कोणताही अर्थ घेतला तरी तात्पर्य हें आहे कीं, उभयतांमध्यें उत्तम प्रेम असण्याचा संभव आहे.

यांपैकीं एकजण गोड फलाचा आस्वाद घेतो. जें जें काय कर्म त्यानें केलें असेल, त्याचें फल भोगावें असा त्याचा स्वभाव असतो. 'स्वादु' म्हणजे गोड होय. कर्मफल प्राप्त व्हावें या साठीं जीव कर्म करितो आणि कर्म सिद्ध झालें म्हणजे आपल्यास कर्मजन्य सुखद फलें उपभोगावयास सांपडतील, अशी त्याची कल्पना असते. हीं कर्मफलें गोड असतातच असा नियम नाहीं. तथापि कर्मविपाकाच्या दुर्धर नियमांनीं जीवाला आपल्या कर्माचें फल भोगावें लागतें. म्हणून 'स्वादु अत्ति' या पदांचा 'आस्वाद घेतो' इतकाच अर्थ करावा असें मला वाटतें. असो दुसरा शिव-नामक पक्षी कर्मफलाचा उपभोग घेत नाहीं. तो साक्षीरूपानें आपल्या शांत स्वरूपामध्यें विद्यमान असतो. हें स्पष्ट समजण्यासारखें आहे. 'साक्षी चेता केवलो निर्गुणश्च' अशी श्रुति किंवा 'न मां कर्माणि लिंपंति' अशी स्मृति शिवाच्या किंवा परमात्म्याच्या साक्षित्वाला प्रमाण आहे.

याप्रमाणें एककालीं जन्मास आलेलें हें द्वय नित्य एकत्र सहवास करणारें व पुण्य ज्ञान–विज्ञानानें अलंकृत झालेलें असतें, हा या मंत्राच्या पहिल्या अर्धाचा अर्थ आहे. दुसरा अर्ध असें सांगतो कीं, जीव कर्मफलाचा उपभोग घेणारा आणि शिव साक्षी-स्वरूपानें राहणारा आहे म्हणून या उभयतांमध्यें भेद आहे. असा या उभयतांच्या रूपाचा आणि कर्माचा इतिहास आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**समाने वृक्षे पुरुषो निमग्नोऽनीशया शोचति मुह्यमानः । जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमानमिति वीतशोकः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ--समाने वृक्षे** ( एकाच वृक्षावर-शरीराचा आश्रय घेऊन-हृदयांत राहून- ) **निमग्नः पुरुषः अनीशया मुह्यमानः शोचति** ( सकाम कर्म करण्यामध्यें निमग्न झालेला जीव आपण कर्मफलाच्या संबंधें अत्यंत परतंत्र आहों, असें पाहून वेड्यासारखा शोक करीत बसतो ) **यदा अन्यं जुष्टं ईशं पश्यति अस्य महिमानं इति वीतशोकः** ( पण जेव्हां दुसरा प्रसन्न झालेला ईश म्हणजे स्वामी जो शिव त्याचें दर्शन होतें, तेव्हां त्याचा महिमा फार मोठा आहे असें पाहतो व तो गतशोक होतो. ॥ २ ॥

या मंत्रांत कर्मफलाचा उपभोग घेणाऱ्या जीवाचें पारतंत्र्य त्यांस समजूं लागतें आणि आपल्या हातांत कर्मफलाच्या संबंधानें कोणतीही सत्ता नाहीं, असें पाहून अज्ञानी जीव शोकाकुल होतो. अर्थात् ज्या अनादिवासनेनें परिच्छिन्न झालेल्या जीवास कर्म करण्याची प्रेरणा केली ती अज्ञानजन्य वासना किंवा अविद्या, किंवा अविद्येचा स्वामी परमेश्वर कर्मफलाचें नियंत्रण करीत असतो, हें त्याला समजतें. उघड आहे कीं जीव परिच्छिन्न आहे, म्हणून तो कर्मफलाच्या कामांत सर्वथा परतंत्र आहे. असो, कर्म केलें असतांही कर्मफल आपल्याला हवें तसें मिळत नाहीं किंवा इच्छेच्या विपरीत फल मिळतें, असें पाहून आपल्या पारतंत्र्याची ओळख त्यास पटते आणि त्यामुळें तो शोक करावयास लागतो. ही संसारी जीवाची स्थिति आहे. पुढें त्याला विवेक प्राप्त झाल्यावर शरीरस्थ व शरीरस्वामी दुसरा पक्षी जो ईश तो आपल्याहून-अज्ञानत्वाहून-अति विलक्षण आहे, सदैव शांत आहे. असें जेव्हां-पाहतो, हा त्याचा किंबहुना, आपला महिमा जेव्हा विवेकी जीवास कळतो, तेव्हां कर्मफलाविषयीं, संसाराविषयीं, आपण उदासीन झालों तर आपलें हें अपरिच्छिन्न शिवस्वरूप आपल्यास दिसेल आणि प्राप्त होईल असें ज्ञान त्यास होतें आणि श्रवणादिकांनीं ज्ञानविज्ञान झालें म्हणजे शोकमोह नाहींसा होतो, असेंही त्याला समजतें व तो शोकशून्य होतो ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् । तदा विद्वान्पुण्यपापे विधूय निरञ्जनः परमं साम्यमुपैति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ—यदा पश्यः रुक्मवर्णं, कर्तारं, ईशं, ब्रह्मयोनिं पुरुषं पश्यते** (ज्यावेळीं विवेकी पुरुषाला सुंदरस्वरूपी, सर्वकर्त्या, सर्वस्वामी

आणि सर्वांची उत्पत्ति करणाऱ्या पुरुषाचें ज्ञान होतें ) **तदा पुण्यपापे विधय विद्वान् निरञ्जनः परमं साम्यं उपैति** ( त्यावेळीं आपलें सर्व पुण्यपाप आणि पुण्यपापाची वासना झाडून टाकून विद्वान् साधक निर्मळ होतो आणि शिव-स्वरूपाशीं अतिश्रेष्ठ प्रकारची समता, तादात्म्य, प्राप्त करून घेतो ) ॥ ३ ॥

मागच्या मंत्रामध्यें सांगितल्याप्रमाणें परमेश्वराचा महिमा अवगत होऊन दृढज्ञानानें आणि भक्तिपूर्वक आराधनेनें जेव्हां स्वयंप्रकाश, स्वतंत्र, जगत्स्वामी, जगत्कर्त्या पुरुषोत्तमाचें स्वरूप अधिगत होतें, सारांश, जेव्हां ज्ञानपूर्वक दृढभक्तीच्या योगानें आणि श्रवण, मनन, निदिध्यासानें आपल्या नित्य संनिध असणाऱ्या आत्मस्वरूपाचें ज्ञान होतें, तेव्हां पुण्यपापात्मक फल भोगण्याची किंवा धर्माधर्मात्मक कर्मे करण्याची प्रवृत्ति नाहींशी होऊन हा विद्वान् साधक निरंजन होतो म्हणजे याचे सर्व चित्तदोष नाहींसे होऊन याला पूर्ण विज्ञान प्राप्त होतें. तात्पर्य तो ब्रह्मस्वरूप होतो.

याप्रमाणें दुसऱ्या मंत्रांत संसाराचा तिरस्कार प्राप्त होऊन जीव आत्मज्ञानाच्या प्राप्तीचा उद्योग करूं लागतो आणि तिसऱ्या मंत्रांत आपल्या निष्काम ज्ञानध्यान-भक्तीच्या जोरावर निर्मलत्व प्राप्त करून घेऊन ज्ञानी होतो आणि पुढें ज्ञानरूप होतो, हें सांगितलें आहे. ईशस्वरूपाच्या ज्ञानाचा व सत्तेचा महिमा कळल्या नंतर तो साधक शोकमुक्त होत्साता ज्ञानमार्ग स्वीकृत करितो आणि शेवटीं ईशस्वरूप होतो. ईशस्वरूप लाभानंतर ब्रह्मस्वरूप प्राप्त करून घेण्यास काय उशीर आहे ! ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**प्राणो ह्येष यः सर्वभूतैर्विभाति विजानन्विद्वान्भवते नातिवादी । आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—हि यः एषः प्राणः सर्वभूतैः विभाति** ( कारण हा जो प्राण—परमेश्वर—सर्वभूतांमध्यें प्रकाशमान होतो ) **विजानन् विद्वान् अतिवादी न भवते** ( हें जाणणारा ज्ञानी व साक्षात्कारी साधक वादविवादामध्यें कधींहि पडत नाहीं ) **एषः आत्मक्रीडः, आत्मरतिः, क्रियावान् ब्रह्मविदां वरिष्ठः** ( हा आत्मस्वरूपांत क्रीडा करणारा व आत्मस्वरूपीं प्रेम ठेवणारा विद्वान् मुमुक्षुला मात्र योग्य तीं कर्मे करण्यास सिद्ध होऊन सर्व ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ होतो ) ॥ ४ ॥

हा जो प्राणाचा प्राण आहे, हा जो परमेश्वर आहे तो यच्च यावत् भूतांमध्यें राहून, त्यांस सत्ता देऊन, तेथें व त्यांसह प्रकाशित होतो; सारांश, सर्वत्र परमेश्वर भरला आहे, माझ्यामध्येंही तो आहे, किंबहुना मीं परमेश्वर आहें आणि मी ही विश्वंभर आहें, असें पूर्णज्ञान ज्याला झालें, असा साक्षात्कार ज्याला झाला, तो धन्य पुरुष अतिवाद करीत नाहीं. त्याला वादविवाद करण्याचें कारण नसतें. लोक अतिवाद करतात तो आपल्या पक्षाची सत्यता स्थापित करण्याकरितां करीत असतात. वादानें सत्याचा शोध लागतो हें खरें, पण अतिवाद हा सामान्यतः आपल्या विरुद्ध पक्षावर जय मिळविण्यासाठीं होत असतो. पण आमच्या या साक्षात्कारी साधकाला वाद किंवा अतिवाद करण्याचें कारणच पडत नाहीं. सर्व ब्रह्म विश्व झालें, असा त्याचा अभंग निश्चय झाला असतां तो वाद करील कोणाशीं आणि करील कशा करितां ? तो नित्य आत्मस्वरूपामध्यें रममाण होऊन त्याच्याशींच ज्ञानध्यानादि क्रीडा करण्यामध्यें दंग होऊन गेलेला असतो. सर्वच विश्व ब्रह्म आहे अशी ज्याची दृष्टि झाली, सर्व ज्ञान हें ब्रह्म, सर्व वाणी ही ब्रह्म, सर्व विद्या ही ब्रह्म, सर्व ब्रह्म आहे, असें ज्याला कळूं लागलें त्याला कोठेंही सत्पक्ष किंवा खोटा पक्ष दिसत नाहीं. मग अशा पुरुषाला वादविवाद करण्याचें कारण काय ? 'ब्रह्ममय स्थिति झाली, आतां काय उणें । अहंकार दग्ध झाला, स्वातंत्र्याचें लेणें ॥' अशी त्याची स्थिति होते. याप्रमाणें आत्मस्वरूपाशीं एकतानता प्राप्त होऊन ब्रह्मस्वरूप झालेला पुरुष मौनव्रत स्वीकारून सर्व ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ होतो, हें सांगण्याची अपेक्षा राहत नाहीं. हा जीवन्मुक्ताच्या स्थितीचा विचार येथें झाला आणि याप्रमाणें अज्ञान, ज्ञान, साक्षात्कार, विज्ञान आणि जीवन्मुक्त-स्थिति यांचें पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या आणि चौथ्या मंत्रांत वर्णन झालें. यानंतर श्रवणादिकांहून अन्य साधनें ज्ञानाच्या उपयोगीं पडतात. त्यांचें दिग्दर्शन पुढील दोन मंत्रांत करावयाचें आहे. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् । अन्तःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—एषः आत्मा सत्येन, तपसा, सम्यग्ज्ञानेन, ब्रह्मचर्येण लभ्यः** ( हा शुद्ध आत्मा नित्य सत्यानें, नित्य तपानें, नित्य यथार्थ ज्ञानानें, आणि नित्य ब्रह्मचर्यानें प्राप्त व्हावयाचा असतो. ) **यं क्षीणदोषाः यतयः पश्यन्ति अंतःशरीरे ज्योतिर्मयः शुभ्रः हि**

**( ज्याला दोषक्षय झालेले संन्याशी साक्षात्कृत करतात, तो अन्तः शरीरांत–अंतःकरणांत–हृदयांत–कारणशरीरांत–स्वयंप्रकाश आणि सर्वथा निर्मळ असा असतो–म्हणून त्याची प्राप्ति सत्यादि साधनांनीं व्हावयाची असते ) ॥ ५ ॥**

येथें सत्यादि जीं साधनें सांगितलीं आहेत, तीं विषयनिवृत्तिपर आहेत, विषयभोगांचा त्याग करण्यास प्रवृत्त करणारीं आहेत, निवृत्तिपर आहेत, किंवा निवृत्तिमूलक आणि निवृत्तिपरिणामी आहेत, हें समजून घ्यावयाचें आहे. ज्याला आत्मप्राप्ति करून घ्यावयाची आहे, त्यानें सत्य बोलण्याचा आणि सत्य शोधण्याचा अभ्यास नित्य केला पाहिजे. आपण संसारामध्यें सामान्यतः असत्य भाषण करितों, तें विषयाच्या प्राप्तीस्तव होय. असत्यभाषणानें कदाचित् विषयभोग मिळण्याचा संभव आहे, निदान असत्यभाषणानें संसाराचें वैभव वाढतें, असें केव्हां केव्हां दिसतें, तेव्हां असत्य भाषण हेंच श्रेयस्कर आहे, असें अज्ञानी जीवास वाटतें. पण सर्वसाक्षी आणि सर्वनियंत्या आत्म्याची प्राप्ति असत्यभाषणानें किंवा अनृताचरणानें केव्हांही व्हावयाची नाहीं. या कामीं आपण असत्य बोललों तर आपण स्वतः आपल्या आत्म्याची वंचना केल्यासारखी होईल. आणि आत्मप्राप्ति व्हावयाची नाहीं. याचप्रमाणें तपश्चर्येचीही गोष्ट आहे. विषयांची तपश्चर्या विषयप्राप्ति करून देईल, आत्मप्राप्ति करून देणार नाहीं. आत्मप्राप्तीसाठीं आत्मतपश्चर्या मात्र केली पाहिजे. म्हणजे विषयभोगाचा त्याग करून आत्मज्ञानध्यानाचा नित्य अभ्यास केला पाहिजे. ज्ञानाचीही हीच हकीकत आहे. विषयज्ञानानें विषय मिळतील, विषयात्मक विश्वाचें ज्ञानही होईल; पण तें ज्ञान केव्हांही यथार्थ असावयाचें नाहीं. कारण विषयाचें ज्ञान इन्द्रियांचे द्वारां होत असतें व असलें ज्ञान केव्हांही परमार्थतः सत्य असत नाहीं. यासाठीं इंद्रियांनीं मिळविलेल्या विषयभोगात्मक ज्ञानाचा त्याग करून नित्य आत्मज्ञानाचा मात्र अभ्यास केला पाहिजे. याप्रमाणें विषयभोगज्ञानाचा त्याग विहित होतो. ब्रह्मचर्याचीही अशीच कथा आहे. ब्रह्मचर्य याचा रूढ अर्थ घ्या किंवा 'वेदाध्ययन, आत्मभक्ति' हे यौगिक अर्थ घ्या, तात्पर्य एकच आहे आणि तें विषयोपभोगाची निवृत्ति सांगत आहे. असो, हा विषयोपभोगत्याग ज्यांनीं केला, ज्यांनीं विषयज्ञानास पाठीमागें टाकणाऱ्या व विश्वज्ञानाचा अंतर्भाव करणाऱ्या आत्मज्ञानाचा अभ्यास नित्य केला, ते सर्वतोपरि शुद्ध झालेले आत्मसंयमी यति ज्या पुरुषोत्तमाचें दर्शन साक्षात् घेतात, तो परमेश्वर जीवांच्या स्थूल शरीराच्या व सूक्ष्म शरीराच्या पलीकडे असणाऱ्या व या उभयतांचेंही नियमन करणाऱ्या कारणशरीरांत स्वयंप्रकाशत्वानें राहून आपल्या निर्मलत्वानें त्या कारणशरीराचेंही नियमन करितो. सारांश, तो ज्ञानरूप आणि शुद्ध आत्मरूप आहे; तेव्हां त्याचें दर्शन हवें असेल, तर आपण विषयनिवृत्ति करणाऱ्या सत्यादि पूर्वोक्त साधनांचा अवलंब केला पाहिजे. सारांश, विषयोपभोग

हाच पुरुषार्थ आहे, असें समजून विषयप्राप्तिसाठीं आपण जीं कर्में करितों, त्यांचा सर्वथैव त्याग करून आपण सत्याचरण, आत्मतपश्चर्या, आत्मज्ञान आणि संन्यास या साधनांचा अवलंब केला पाहिजे, हें श्रुतीस सांगावयाचें आहे. हा अवलंब नित्य हवा, अभंग हवा; एखादे वेळीं मात्र सत्य भाषण केलें, किंवा तपश्चर्या केली, तर आत्मलाभ व्हावयाचा नाहीं. हें स्पष्ट समजावून देण्यासाठीं मंत्रांत 'नित्य' या पदाची योजना केली आहे. हीं साधनें संसाराला उपयोगी पडतात, हें सांगावयास नकोच ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**सत्यमेव जयति नानृतं सत्येन पन्था विततो देवयानः । येनाऽऽक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामा यत्र तत्सत्यस्य परमं निधानम् ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थ—सत्यं एव जयति, अनृतं न** ( सत्याचा मात्र जय होतो; असत्याचा केव्हांही होत नाहीं ) **देवयानः पंथाः सत्येन विततः** ( देवयान नामक जो मार्ग आहे, तो सत्यानें सिद्ध झालेला आहे ) **आप्तकामाः ऋषयः येन यत्र आक्रमन्ति तत् सत्यस्य परमं निधानं** ( पूर्णकाम ऋषी ज्या मार्गानें देवयानास जातात तो मार्ग सत्यानें परिपूर्ण झाला आहे. या देवयानांत सत्याचें अतिश्रेष्ठ निधान—अति उंच प्रतीचा ठेवा म्हणजे परब्रह्म—राहत असतें ) ॥ ६ ॥

मागील मंत्रांत सांगितलेल्या सत्याची स्तुति करणारा हा मंत्र आहे. ही स्तुति यथार्थ आहे. कारण ज्या देवयानमार्गांत जीवाला आत्मप्राप्ति व्हावयाची आहे, तो मार्ग सत्यस्वरूपानें मात्र सिद्ध झाला आहे. सत्यान्वेषण आणि सत्यभाषण यांनीं देवयानाचा पंथ सिद्ध झाला आहे. या पंथांत सत्याव्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहीं. चांगल्या मुरुमाची खडी घालून ज्याप्रमाणें आपण एखादा रस्ता तयार करितों, त्याप्रमाणें सत्याच्यानें मात्र देवयानपंथ सिद्ध झाला आहे. याच मार्गानें आप्तकाम ऋषि जातात; कारण येथें नित्य वास्तव्य करणारें सत्यनिधान जें परब्रह्म तें नित्य वास्तव्य करितें. म्हणून निष्कामपुरुषांनीं, विवेकीपुरुषांनीं, ज्या मार्गाचा अवलंब केला असता आणि ज्या मार्गानें गेलें असतां सत्याचा निधि जो परमात्मा तो प्राप्त होतो. तो मार्ग सत्यान्वेषण आणि सत्यभाषण यांनीं मात्र सिद्ध होतो. म्हणून सत्यानें जय मिळतो किंवा सत्याचा जय होतो, असत्याचा जय होत नाहीं, असत्यानें पुरुषार्थ साधत नाहीं; असें श्रुतीनें सांगितलें आहे आणि हीच सत्याची स्तुति होय ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**बृहच्च तद्दिव्यमचिन्त्यरूपं सूक्ष्माच्च तत्सूक्ष्मतरं विभाति। दूरात्सुदूरे तदिहान्तिके च पश्यत्स्विहैव निहितं गुहायाम्॥ ७॥**

**अन्वय व अर्थ—तत् बृहत्, दिव्यं अचिंत्यरूपं** ( तें ब्रह्म किंवा आत्मस्वरूप सर्वांहून मोठें आहे, दिव्य आहे, स्वयंप्रकाश आहे आणि इंद्रियांस व मनोबुद्धींस अगोचर आहे ) **तत् सूक्ष्मात् सूक्ष्मतरं च विभाति** ( ते इंद्रियांस अगोचर ब्रह्मरूप अति सूक्ष्म वस्तूंहूनही अत्यंत सूक्ष्म असें प्रकाशमान होत असतें ) **तत् दूरात् सुदुरे इह आन्तिके च** ( तें अत्यंत दूर वस्तूंहून ही अतिशय दूर आहे आणि अत्यंत निकट वस्तूंहून अत्यंत निकट म्हणजे जीवांच्या अतिसंनिध, त्यांच्या अंतर्यामीं असते) **पश्यत्सु इह एव गुहायां निहितं** (ज्यांना ज्यांना म्हणून चित्कला प्राप्त झाली आहे, त्यांच्या हृदयांतील गुहेंत—हृदयांत असणाऱ्या आकाशांत—दहराकाशांत—तें गूढरीतीनें वास्तव्य करीत असतें )॥ ७॥

येथें पुनः ब्रह्मस्वरूपाचें वर्णन करून ज्ञानीपुरुषांस व अज्ञानीपुरुषांस तें कोणत्या धर्मांनीं प्रकट होतें तें सांगितलें आहे. तें सर्वांत मोठ्या असणाऱ्या आकाशाहूनही अत्यंत मोठें असतें. तें दिव्य म्हणजे स्वयंप्रकाश असून सूर्य-चंद्रादि तेजोगोलांस प्रकाशित करतें; पण त्याचा प्रकाश इतका अलौकिक आहे कीं, सर्व विषयांचें ग्रहण करणारीं जीं बुद्धीत्यादि इंद्रियें त्यांनाही ग्रहण करितां येत नाहीं. तें जसें मोठ्याहून मोठें आहे तसेंच लहानाहूनही लहान आहे. तें अज्ञानीलोकांस अत्यंतात्यंत दूर असून ज्ञानीलोकांस अत्यंतात्यंत सन्निध आहे. अज्ञानीलोकांस जें मुळींच नाहीं असें भासतें, तेंच ज्ञानीलोकांचें आत्मस्वरूप होऊन बसतें. तें सर्व जीवमात्राच्या हृदयाकाशांत गूढ स्थितीनें राहिलें आहे, म्हणून तें अज्ञानीलोकांस दिसत नाहीं आणि ज्ञानीलोकांस स्वानुभवानें कळतें. बाह्यदृष्टीच्या लोकांस जें अचिंत्यरूप तेंच ज्ञानी लोकांचें स्वानुभवस्वरूप असतें. तें अज्ञानीलोकांना अत्यंत मोठ्या आकाशाहूनही मोठें असल्यामुळें व आकाशाचा अत्यंत सूक्ष्म असा जो अंश त्याच्याहीपेक्षां सूक्ष्म असल्यामुळें दिसत नाहीं. परंतु ज्ञानीपुरुष स्वतःच ब्रह्मस्वरूप झाल्यामुळें तें त्याला नित्य अनुभवास येतें. तात्पर्य ज्ञानीलोक स्वतः ब्रह्म असतात, म्हणून त्यांना सहज लीलेनें साध्य असणारी ब्रह्मवस्तु अज्ञानीलोकांस अत्यंत कष्ट करूनही प्राप्त होत नाहीं॥ ७॥

---

## मंत्र आठवा.

**न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा । ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वस्त तस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ--चक्षुषा न गृह्यते, वाचा अपि न, अन्यैः देवैः तपसा वा कर्मणा न** ( हें ब्रह्मतत्त्व चक्षूला दिसत नाहीं, वाणीला सांगतां येत नाहीं, इतर देवांना म्हणजे इंद्रियांना हें भासत नाहीं, तपश्चर्येनें किंवा कर्मानें साध्य होत नाहीं ) **तु विशुद्धसत्वः ज्ञानप्रसादेन** ( पण ज्याचें सत्त्व म्हणजे अंतःकरण अतिनिर्मळ झालें आहे, त्याच्यावर ज्ञानाचा प्रसाद होऊन त्याला तें साक्षात्कृत होतें. ) ततः ( म्हणून ) **निष्कलं तं ध्यायमानः पश्यते** ( त्या निर्गुण आणि निरवयव ब्रह्मस्वरूपाचें नित्य ध्यान करणाऱ्या पुरुषास तें स्पष्ट दिसूं लागतें किंवा शुद्धचित्तीपुरुषानें ब्रह्मविद्येचें श्रवण करून परोक्षज्ञानाचा प्रसाद करून घेतल्यानंतर निर्विकल्प समाधीमध्यें असणाऱ्या त्या पुरुषाला ब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो. ) ॥ ८ ॥

मागच्या मंत्रांत ब्रह्मस्वरूप अचिंत्यरूप आहे म्हणून सांगितलें म्हणून तें नेत्रादि ज्ञानेंद्रियांस किंवा वाणी-आदि कर्मेंद्रियांस गोचर होत नाहीं. बाह्यज्ञान देणाऱ्या इंद्रियांच्या साहाय्यानें केलेली उग्र तपश्चर्या ब्रह्मस्वरूपापर्यंत पोंचत नाहीं किंवा कर्मेंद्रियांच्या साहाय्यानें केलेलें कर्म त्याला उत्पन्न करूं शकत नाहीं. सारांश, ब्रह्मस्वरूप साध्य होण्याला एकच उपाय आहे. तो उपाय म्हणजे निर्मल अंतःकरणाच्या सात्त्विक संन्याशानें गुरुप्रसादपूर्वक मिळविलेल्या ज्ञानासह एकरस ब्रह्माचें अखंड ध्यान हा होय. सारांश वृत्तीचा अखंड प्रवाह जेव्हां ब्रह्मरूप होईल, तेव्हांच ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होते. ८

---

## मंत्र नववा.

**एषोऽणुरात्मा चेतसा वेदितव्यो यस्मिन्प्राणः पञ्चधा संविवेश । प्राणैश्चित्तं सर्वमोतं प्रजानां यस्मिन्विशुद्धे विभवत्येष आत्मा ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ—यस्मिन् प्राणः पञ्चधा संविवेश, चेतसा एषः अणुः आत्मा वेदितव्यः** ( ज्याच्यामध्यें प्राण पांच स्वरूपाचा होऊन प्रविष्ट झाला आहे, त्या शरीराच्या हृदयांत असणाऱ्या शुद्ध अंतःकरणानें मात्र हा सूक्ष्म आत्मा समजून घेतला पाहिजे. ) **प्रजानां सर्वं चित्तं प्राणैः ओतं** ( सर्व प्राण्यांचें संपूर्ण अंतःकरण संपूर्ण इंद्रियांसह प्राणांनीं अभिव्याप्त झालें आहे. ) **विशुद्धे यस्मिन् एषः आत्मा विभवति** ( या शुद्ध अंतःकरणांत हा आत्मा प्रकाशतो म्हणजे आपलें स्वरूप प्रकट करितो. ) ॥ ९ ॥

तात्पर्य, आपल्या अंतःकरणानें हा आत्मा शोधून काढावयाचा आहे. आपलें अंतःकरण हें पंचप्राण आणि सर्व इंद्रियें यांनीं व्याप्त झालेलें असतें. म्हणजे सर्व प्राण आणि सर्व इंद्रियें यांचें नियमन आपलें चित्त करीत असतें. हें चित्त जेव्हां शुद्ध होईल, म्हणजे आपल्या प्राणांचे व इंद्रियांचे व्यापार विषय-निर्माण करण्यांत आणि विषय-चिंतन करण्यांत दंग झालेले असतात, त्या वृत्ति जाऊन जेव्हां इंद्रियें सर्व अंतर्मुख झाल्यामुळें चित्त स्वच्छ होईल, तेव्हां या स्वच्छ झालेल्या अंतःकरणामध्यें आत्म-स्वरूपाचा प्रकाश स्पष्ट होईल, सारांश, आत्म-प्राप्ति होईल, एवंच आत्म-प्राप्ति होण्याला ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, मन व बुद्धि, या सर्वांनीं आपले भोग्य विषय सोडून देऊन तीं निर्विषय झालीं, तीं स्तब्ध झालीं, शांत झालीं, निमालीं म्हणजे चित्ताला शुद्ध चैतन्यस्वरूप प्राप्त होतें आणि हें शुद्ध चैतन्य आत्म-स्वरूप पाहण्यास योग्य होतें ॥ ९ ॥

---

## मंत्र दाहावा.

**यं यं लोकं मनसा संविभाति विशुद्धसत्त्वः**
**कामयते यांश्च कामान् । तं तं लोकं जयते तांश्च**
**कामांस्तस्मादात्मज्ञं ह्यर्चयेद्भूतिकामः ॥ १० ॥**

**इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषदि तृतीयमुण्डके प्रथमः खण्डः**

**अन्वय व अर्थ—विशुद्धसत्त्वः यं यं लोकं मनसा संविभाति यान् च कामान् कामयते** ( शुद्ध झालेला जीवन्मुक्त ज्या ज्या भुवनामध्यें जाण्याचा संकल्प करितो, किंवा ज्या ज्या वासना त्याच्या अंतःकरणांत

उत्पन्न होतात ) **तं तं लोकं तान् च कामान् जयते** ( तीं तीं भुवनें आणि त्या त्या त्याच्या वासना पूर्ण होतात ) **तस्मात् भूतिकामः आत्मज्ञं हि अर्चयेत्** ( म्हणून आत्मकल्याण करणाऱ्या पुरुषानें आत्मज्ञानी साधूची मात्र आराधना करावी ) ॥ १० ॥

या मंत्रांत फलश्रुति सांगितली आहे. जीवन्मुक्त पुरुषाला जेथें जावेंसें वाटतें तेथें त्यास अति लीलेनें जातां येतें, किंवा त्याला ज्या वासना उत्पन्न होतात, त्या सर्वच्या सर्व परिपूर्ण होतात. पण हें ध्यानांत ठेवावयाचें कीं, जीवन्मुक्ताचे सर्व संकल्प आणि सर्व वासना सात्त्विक स्वरूपाच्या मात्र असतात. शिवाय, तो ब्रह्मरूप झाला असल्यामुळें तो सर्व विश्व नटलेला नटनाटकी विद्वान् सर्व ठिकाणीं राहूं लागतो व सर्व वासनाही तोच होतो. असो, ज्याला आपलें कल्याण करून घ्यावयाचें आहे, त्यानें ह्या परमेश्वरतुल्य पुरुषाची सेवा करावी, हें योग्य आहे. तात्पर्य, जीवन्मुक्ताला सर्वकर्तृत्व आणि सर्ववंद्यत्व प्राप्त होतें. त्याच्या स्वाधीन सर्व विश्व होतें आणि सर्व कल्याणेच्छु त्याचे दास होतात अथवा सर्व चराचर विश्व त्याच्या भजनीं लागतें. हें आत्मज्ञानाचें मात्र फल होय ॥ १० ॥

**तृतीय मुण्डक प्रथम खण्ड समाप्त.**

---

# तृतीय-मुण्डक।

## खंड दुसरें.

### मंत्र पहिला.

**स वेदैतत्परमं ब्रह्म धाम यत्र विश्वं निहितं भाति शुभ्रम् । उपासते पुरुषं ये ह्यकामास्ते शुक्रमेतदतिवर्तन्ति धीराः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—यत्र निहितं विश्वं शुभ्रं भाति, सः एतत् परमं ब्रह्म धाम वेद** ( येथें सामाऊन गेलेलें सर्व विश्व ब्रह्मतेजानें प्रकाशूं लागतें, तें ब्रह्म धाम ज्या ब्रह्मज्ञ पुरुषाला ठाऊक असतें ) **ये अकामाः पुरुषं उपासते** ( अशा ब्रह्मज्ञ पुरुषाची जे निष्काम साधक सेवा करि-

तात ) **ते धीराः एतत् शुक्रं अतिवर्तंति** ( ते विवेकी पुरुष या शुक्राचें म्हणजे तेजाचें अथवा जन्माचें अतिक्रमण करितात ) ॥ १ ॥

या मंत्राचा अर्थ स्पष्ट आहे. ब्रह्मामध्यें विश्व राहत असल्याकारणानें ज्ञानी पुरुषाला हें विश्व ब्रह्मतेजानें प्रकाशत आहे, असें दिसूं लागतें. हा साक्षात्कार ज्याला होऊं लागतो, त्यालाच सर्वश्रेष्ठ ब्रह्म समजलें आहे, असें समजावें. अशा ब्रह्मज्ञ पुरुषाची निष्कामबुद्धीनें जे उपासना करितात; तेही इतर सर्व तेजांपेक्षां अत्यंत श्रेष्ठ असणाऱ्या ब्रह्मतेजानें अलंकृत होतात, असा अर्थ घ्यावा किंवा हे ब्रह्मज्ञोपासक-पुरुष शुक्र म्हणजे नृबीज त्याचें, जन्ममरणाचें अतिक्रमण करितात, जन्ममरणाचा त्रास त्यांना होत नाहीं, असा अर्थ घ्यावा; तात्पर्य एकच आहे. ‘ ब्रह्मधाम ’ ब्रह्म हेंच धाम=ब्रह्म हेंच आहे सर्व वासनांचें आश्रयपद, असें ब्रह्म. सारांश, सर्व वासनांचा आश्रय असणारें जें ब्रह्म तें ब्रह्मज्ञ पुरुषाला उत्तम प्रकारें ठाऊक असतें, म्हणून साधकानें त्याची आराधना करावी. मंत्रांतील ‘ ब्रह्म ’ आणि ‘ धाम ’ हीं पदें समस्त न करितां निरनिराळीं घेतलीं तरी अर्थ तात्पर्य एकच निष्पन्न होत आहे. ‘ पुरुष ’ या पदाचा ‘ ब्रह्मज्ञ पुरुष ’ असा अर्थ न करितां ‘ ब्रह्म ’ असा अर्थ केला तरी तात्पर्य एकच आहे ॥१॥

---

## मंत्र दुसरा.

**कामान्यः कामयते मन्यमानः स कामभिर्जायते तत्रतत्र । पर्याप्तकामस्य कृतात्मनस्त्विहैव सर्वे प्रविलीयन्ति कामाः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—यः मन्यमानः कामान् कामयते** (जो विषयगुण मात्र चिंतन करणारा पुरुष विषयांची प्रार्थना करीत असतो ) **सः तत्रतत्र कामभिः जायते** ( तो पुरुष चिंतिलेले इष्ट विषय जेथें असतील तेथें जन्म पावतो ) **कृतात्मनः पर्याप्तकामस्य तु इह एव सर्वे कामाः प्रविलीयन्ति** ( परंतु ज्यानें आत्मस्वरूप आपलेसें केलें आहे, ज्याला ब्रह्मस्वरूपाचें उत्तम ज्ञानविज्ञान झालें आहे, त्या पुरुषाच्या सर्व विषयेच्छा ब्रह्मप्राप्तीनेंच परिपूर्ण झाल्या असल्यामुळें त्याचे सर्व वासनामय मनोविकार ह्या लोकींच लय पावतात. सारांश, त्याचे सर्व काम ( इच्छा ) नष्ट झाल्यामुळें त्याला पुनर्जन्म घ्यावा लागत नाहीं ) ॥ २ ॥

ज्या विषयाचें अखंड चिंतन जीव करीत असतो, तो विषय या जन्मीं प्राप्त झाला नाहीं, तर जीवाला त्या त्या वासनातृप्तीसाठीं दुसरा जन्म घ्यावा लागतो आणि जितक्या जितक्या वासना अतृप्त राहिल्या असतील तितका वेळ त्याला जन्म घ्यावा लागतो, असें श्रुतीचें म्हणणें आहे. मी परिच्छिन्न आहें म्हणजे देहादि आहें, असें ज्याच्या सत्तेनें वाटतें तो अहंकार व या अहंकारामुळें ' मला हें हवें, तें हवें ' अशी नित्य प्रज्वलित होणारी वासना, ह्या अज्ञानजन्य मलाचें जोंपर्यंत निष्कासन झालें नाहीं, सारांश, अज्ञान नष्ट झालें नाहीं, तोंपर्यंत पुनःपुनः जन्म घ्यावा लागणें हें नीट आहे. पण ज्ञानप्रकाशानें जेव्हां सर्व अज्ञान नाहींसें होऊन मनाला उन्मनीस्थिति प्राप्त होते, तेव्हां उपाधि संपतात व उपाधि नष्ट झालेल्या पुरुषाचें जन्ममरण संपतें. असो; अर्थात् ब्रह्मस्वरूपाचें ज्ञानविज्ञान झाल्यामुळें, ज्याच्या सर्व विषयवासना ब्रह्मप्राप्ति झाल्यामुळें— मागच्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें सर्व विश्व ब्रह्मस्वरूपांत सामावून जातें, म्हणून ब्रह्मप्राप्ति झाल्यानें सर्व विषयांची प्राप्ति होऊन वासनांची तृप्ति झाल्यामुळें—सारांश, तो पूर्णकाम झाल्यामुळें, त्याच्या सर्व आशा व मनीषा ह्या लोकींच विलय पावतात. तात्पर्य त्याला पुनः जन्म घेण्याचें कारण पडत नाहीं. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन । यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ——अयं आत्मा प्रवचनेन न लभ्यः, न मेधया, न बहुना श्रुतेन** ( आत्मस्वरूप मिळावयाचें तें ब्रह्ममीमांसेसंबंधानें पुष्कळ चर्चा जिव्हेनें मात्र केली म्हणून मिळत नाहीं, केवळ अलौकिक बुद्धि असेल तरी मिळत नाहीं किंवा वेदाचें केवळ सांगोपांग अध्ययन केलें असलें म्हणूनही मिळत नाहीं ) **एषः यं वृणुते तेन लभ्यः** ( ज्याला परमात्म्यानें प्रेमपुरःसर निवडून घेतला आहे त्याला मात्र आत्मस्वरूपाची प्राप्ती होते ) **तस्य एषः आत्मा स्वां तनुं विवृणुते** ( त्याला मात्र परमात्मा आपलें स्वरूप निराच्छादित करितो—स्पष्ट करून दाखवितो—त्याला मात्र आत्मस्वरूपाचा पूर्ण प्रकाश प्राप्त होतो; किंवा आत्म्यानें ज्या साधकाला निवडून घेतलें, त्याला तो प्राप्त होतो म्हणजे त्या साधकाचें शरीर आत्मस्वरूपमय होतें ) ॥ ३ ॥

येथें या मंत्रांत आत्मस्वरूपाच्या प्राप्तीला कुशाग्रबुद्धि किंवा अपरंपार वेदाध्ययन किंवा वेदाध्यापन, अथवा वेदविषयाची आणि वेदांतविषयाची मीमांसा हीं साधनें आत्मज्ञान व्यतिरिक्त असतील तर त्यांचा कांहीं एक उपयोग होत नाहीं, हें सांगितलें आहे. आत्मप्राप्तीला आत्मज्ञान हेंच मुख्य साधन आहे. आत्मज्ञानाची दृष्टि प्राप्त होऊन तिच्या साहाय्यानें आपण आपल्या कुशाग्रबुद्धीचा किंवा अध्ययनाचा अथवा अध्यापनाचा अगर या सर्व साधनांचा एकसमयावच्छेदेंकरून अवलंब केला, तर मात्र परमात्म्याचा ज्ञानप्रसाद होतो; आणि प्रसाद झाल्यावर मात्र आत्मकृपा होऊन आत्मप्राप्ति होते; ती इतकी कीं परमात्मा आपलें सर्व अचिंत्यस्वरूप आत्मभक्ताला प्रकाशित करून दाखवितो. फार काय सांगावें ? त्या साधकाच्या शरीरादि सर्व उपाधी ब्रह्ममय होऊन त्याला सर्वत्र परमात्मस्वरूप दिसूं लागतें. तात्पर्य, ब्रह्मज्ञान ब्रह्माच्या कृपेनें (grace) मात्र मिळावयाचें आहे. भक्तांची मात्र इतकी तयारी पाहिजे कीं त्यांनीं आपलें अंतःकरण वासना–शून्य आणि अभिमान–शून्य केलें पाहिजे. आणि आत्मप्राप्तीची इच्छा धारण करून श्रवणादि साधनत्रयीचा दृढ अवलंब केला पाहिजे. विषयात्मकवृत्तीची पूर्ण निवृत्ति आणि ज्ञानप्राप्तीची पूर्ण इच्छा हीं दोन साधनें आत्मप्राप्तीला सवघड करितात. वरवरचें अध्ययन किंवा अध्यापन किंवा ग्रंथधारण यांचा येथें कांहीं एक उपयोग होत नाहीं ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**नायमात्मा बलहीनेन लभ्यो न च प्रमादात्तपसो वाऽप्यलिङ्गात् एतैरुपायैर्यतते यस्तु विद्वांस्तस्यैष आत्मा विशते ब्रह्मधाम ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—अयं आत्मा बलहीनेन न लभ्यः** ( ज्याला सामर्थ्य नाहीं त्याला हा आत्मा मिळावयाचा नाहीं ) **न च प्रमादात्** ( चित्त चांचल्य असेल तर, अंतःकरण एकाग्र नसेल तर, विचारामध्यें धांदल असेल तर आत्मप्राप्ति व्हावयाची नाहीं ) **वा तपसः अलिंगात्** ( किंवा ज्या तपाला कोणत्याही प्रकारचें लिंग नाहीं, कोणत्याही प्रकारचें इष्ट ध्येय नाहीं त्यालाही आत्मप्राप्ति देववत नाहीं ) **यः विद्वान तु एतैः उपायैः यतते तस्य ब्रह्मधाम एषः आत्मा विशते** ( पण जो विद्वान् पुरुष बल, अप्रमाद आणि इष्टकार्यार्थी तपश्चर्या करितो, त्याच्या ब्रह्मधामांत म्हणजे हृदयपुंडरीकांत हा सर्वव्यापी आत्मा प्रवेश करितो ) ॥४॥

येथें पुनः आत्म-प्रार्थना करणाऱ्या साधकाला उपयोगी पडणारीं साधनें सांगितलीं आहेत. साधकाचें शरीर आणि मन हीं दोन्हींही खंबीर असलीं पाहिजेत. तसेंच विषयांच्या अनेकत्वामुळें त्याचें चित्त चंचल होणारें नसलें पाहिजे आणि तो जी ज्ञानपूर्वक तपश्चर्या करीत असेल ती कांहीं तरी ध्येय ठेवून चालविली असली पाहिजे. शारीरिक आणि मानसिक बल कोणत्याही विषयाच्या प्राप्तीला अवश्य असतें. आत्मप्राप्तिही इतर सर्वविषयांच्या प्राप्तीहून अत्यंत श्रेष्ठ आहे खरी, पण त्याचप्रमाणें ती अतिशय अवघडही आहे. म्हणून सुदृढ शरीर आणि दृढनिश्चयी मन यांची आवश्यकता आहे. याचप्रमाणें साधकाच्या मनांत अनेक विषयांचा ध्यास असतां उपयोगी नाहीं. विषयाच्या अनेकत्वामुळें एकाच विषयाकडे एकाग्र अवधान लागत नाहीं. चित्ताची धांदल होते, मन गोंधळून जातें. आणि ज्या चूका होऊं नयेत त्या सहज होतात. यासाठीं प्रमाद म्हणजे गोंधळ किंवा अनवधानता इचा रिघाव ब्रह्म–साधकाच्या मनांत होणें हें अत्यंत अनिष्ट आहे. त्याचप्रमाणें आपण जी ज्ञानाची आराधना करितों तिला ब्रह्मप्राप्ति हेंच ध्येय असलें पाहिजे. ब्रह्म–व्यतिरिक्त दुसऱ्याच कांहीं विषयाचें ध्यान आपण करूं लागलों, तर ब्रह्म–प्राप्ति हा जो आपला मुख्य हेतु तो साध्य व्हावयाचा नाहीं. असो, तेव्हां शरीर–मन–सुदृढता, सावधानता आणि ब्रह्म–विषय–ध्यान हें उपाय साधकाजवळ असले म्हणजे त्याच्या अंतःकरणांत सर्वव्यापी आत्मा प्रवेश करितो. म्हणजे आत्मस्वरूप आत्मसाधकाला आपल्या हृदयांत पूर्ण तेजानें प्रकाशत आहे, असें कळूं लागतें. मंत्रांतील 'ब्रह्मधाम' =ब्रह्मपुर म्हणजे दहराकाश. येथें ब्रह्माचें नित्य वास्तव्य असतें. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**संप्राप्यैनमृषयो ज्ञानतृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशान्ताः । ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानः सर्वमेवाऽऽविशन्ति ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—एनं संप्राप्य ज्ञानतृप्ताः कृतात्मानः वीतरागाः प्रशान्ताः ऋषयः** ( ज्ञानानें तृप्त झालेले, कृतकृत्य झालेले, सर्वरागद्वेषादिकांचा निरास केलेले, शांत वृत्तीचे ऋषींना ब्रह्मप्राप्ति झाल्यानंतर ) **सर्वगं सर्वतः प्राप्य ते धीराः युक्तात्मानः सर्व एव आविशंति** (सर्वव्यापी ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति सर्व दिशांकडून होऊन पूर्वोक्त ऋषी विवेकवंत आणि आत्मनिष्ठ होतसाते ब्रह्मस्वरूपामध्यें प्रवेश करितात ) ५

येथें पुनः, ज्या पुरुषांना ब्रह्मप्राप्ति होते, त्यांची लक्षणें सांगून तें ब्रह्मामध्यें कसा प्रवेश करितात, तेंही वृत्त सांगितलें आहे. हीं साधनें म्हणजे पूर्णज्ञान आणि या ज्ञानानें प्राप्त झालेली तृप्ति, कृतकृत्यता, रागद्वेषादि विकारांचा व हर्षखेदादिकांचा सर्वथा त्याग आणि या सर्वांमुळें आलेली शांतवृत्ति हीं सिद्ध झालीं, सारांश-ज्ञानस्वरूपानें प्राप्त झालेलें समाधान, आत्मस्वरूपाच्या ज्ञानानें 'आपणही ब्रह्म आहों' असा निश्चय, विकारशून्यता आणि समाधानवृत्ति इतकीं साधनें एकत्र झालीं म्हणजे आत्मनिष्ठ विवेकी पुरुषांना सर्वत्र ब्रह्म आहे असें दिसूं लागतें आणि ते स्वभावतः आणि स्वरूपतः ब्रह्मस्वरूपांत प्रवेश करून ब्रह्म होतात. सारांश, अंतर्बाह्य विषयोपभोगांची पूर्णनिवृत्ति ही रागद्वेषादिकांचा उच्छेद करिते, चित्त प्रशांत होतें, आत्मस्वरूपाचें परोक्ष ज्ञान झाल्यामुळें ज्ञान हेंच समाधानाचें कारण आहे, असें कळूं लागतें; आणि मग विवेकानें आत्मनिष्ठ पुरुषाला सर्व ब्रह्मरूप आहे, आपणही ब्रह्मरूप आहों असा साक्षात्कार होतो. शेवटीं 'ब्रह्म जाणतो तो ब्रह्म होतो' या न्यायानें हा साधकही ब्रह्मरूप होतो अथवा ब्रह्म होतो ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः । ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थ—**वेदान्त-विज्ञान-सुनिश्चितार्थाः, यतयः संन्यास-योगात् शुद्धसत्वाः** ( वेदान्ताचें म्हणजे तत्त्वज्ञानाचें ज्ञानविज्ञान झाल्यामुळें सत्य ब्रह्मस्वरूपासंबंधानें ज्यांचा पूर्ण निश्चय यथाशास्त्र झाला आहे, संन्यासयोगाचें अनुष्ठान केल्यामुळें जे यति निर्मळ अंतःकरणाचे झाले आहेत ) **ते ब्रह्मलोकेषु परांतकाले परामृताः सर्वे परिमुच्यंति** ( ते देहाच्या अंतकाळीं ब्रह्मस्वरूपीं मिसळून जाऊन उत्कृष्ट जें अमृत तें जिवंतपणींच प्राप्त करून घेतात आणि सर्वथा मुक्त होतात ) ६

याचा अर्थ स्पष्ट आहे. वेदांताच्या श्रवणादिकांनीं ब्रह्मज्ञानविज्ञान होऊन ब्रह्मस्वरूपाविषयीं ज्यांचा निश्चय ठाम होतो आणि सर्वविषयभोगांचा परित्याग केल्यामुळें ज्यांचें अंतःकरण शुद्ध होतें, ते जिवंत असतात तरी—देहधारी असतात तरी—ब्रह्मलोकीं ( ब्रह्मचिंतनांत ) अखंड राहून ब्रह्मस्वरूप होतात आणि सर्वथा मुक्त होतात. तात्पर्य, ब्रह्मप्राप्ति होण्याला ब्रह्मस्वरूपाविषयीं ज्ञानपूर्वक दृढनिश्चय आणि विषयोप

भोगांच्या संबंधानें पूर्ण वैराग्य प्राप्त झाल्यामुळें चित्तमालिन्य उत्पन्न करणाऱ्या रागद्वेषादिविकारांचा पूर्ण अभाव हीं साध्य झालीं, ब्रह्मनिष्ठा कायम असली म्हणजे देहधाऱ्यालाही जीवन्मुक्ति मिळते. मुक्ति मिळविण्यासाठीं त्याला लोकांतर करावें लागत नाहीं. कोठें जावेंयावें लागत नाहीं. याचें देहांत राहूनही विश्वांतर होते आणि संसारांत वागत असतांही तो संन्याशी असतो. देहादि उपाधि आहेत, हा ध्यास सुटणें म्हणजे खरें देहावसान होय. संसाऱ्यांचें देहावसान मरणसमयीं होतेसें दिसतें, पण हें देहावसान खरें नाहीं. कारण, हा वर्तमान देह सुटला तरी वासना व अहंकार जिवंत असतात व ही जिवंत जोडी पुनः देह उत्पन्न करिते. वासनादिकांच्या चक्रांत सांपडलेल्या जीवाचें देहावसान अथवा उपाधिनाश होणें शक्य नाहीं. तेव्हां लौकिक मरण येणें हें संसाऱ्याचें खरें मरण नव्हे. खरें मरण उपाधिनाशानंतर येतें. उपाधिनाश हेंच खरें मरण होय. असें जिवंतपणींच मरण प्राप्त झालेला पुरुष अमृत—सर्वश्रेष्ठ अमृत—प्राप्त करून घेतो आणि ब्रह्मचिंतनांत राहिल्यामुळें सर्वथा मुक्त होतो ॥६॥

---

## मंत्र सातवा.

**गताः कलाः पञ्चदश प्रतिष्ठा देवाश्च सर्वे प्रति देवतासु । कर्माणि विज्ञानमयश्च आत्मा परेऽव्यये सर्व एकीभवन्ति ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ—पंचदश* कलाः प्रतिष्ठाः (प्रतिष्ठां ?) गताः, सर्वे देवाः च प्रतिदेवतासु, कर्माणि विज्ञानमयः च आत्मा सर्वे अव्यये परे एकीभवन्ति** ( पंधरा प्राणादि कला आपापल्या मूळकारणांमध्यें लीन होतात, सर्व इंद्रियें आपापल्या आधिदैविक देवतांकडे परत जातात. संचित आणि क्रियमाणादि कर्में व विज्ञानमय आत्मा हीं सर्वच्या सर्वजण त्या अव्यय असून सर्वव्यापी असणाऱ्या सर्वश्रेष्ठ आत्मस्वरूपांत एकरूप होतात ) ॥ ७ ॥

येथें उपाधींची व्यवस्था काय होतें, हें सांगितलें. प्रश्नोपनिषदाच्या सहाव्या प्रश्नांत सोळा कला कोणकोणत्या आहेत हें सांगितलें आहे. या कला म्हणजे जीवाच्या सभोंवार असणाऱ्या सोळा उपाधी होत. तेथें सोळा उपाधी सांगितल्या असतां या उपनि-

---

* प्राण, श्रद्धा, पंचमहाभूतें, इंद्रिय, मन, अन्न, वीर्य, तप, मंत्र, कर्म, लोक, आणि नाम. याप्रश्नोपनिषदांत सांगितलेल्या कला आहेत.

यदांत ' पंधरा प्राणादि कलांचा ' मात्र निर्देष कां केला असा प्रश्न उत्पन्न होण्याचें कारण नाहीं. कां तर तेथील सोळा कलांत अंतर्गत झालेल्या ' कर्म ' वस्तूची व्यवस्था काय होते तें या मंत्रांत निराळें सांगितलें आहे. कर्म वजा केलें म्हणजे बाकी पंधरा कला मात्र अवशिष्ट राहतात. या उपनिषदाचें असें सांगणें आहे कीं मुक्त झालेल्या पुरुषांचे प्राणादि सर्व कलात्मकभाग आपापल्या मूळकारणांमध्यें जाऊन लय पावतात. त्याच प्रमाणें जीवाच्या इंद्रियावर स्वामित्व चालविणारे सर्व देव आपापल्या मूळस्वरूपांत परत जातात. याप्रमाणें सर्वकलांचा म्हणजे जीवाच्या उपाधींचा ( पंचभूतात्मक शरीर, पंचज्ञानेंद्रियें, मन, श्रद्धा, प्राण, इत्यादि कर्मेतर सर्व उपाधींचा ) निरास झाल्यावर कर्म आणि विज्ञानमय आत्मा हीं मात्र शिलक राहतात. पैकीं कर्म ( पूर्वसंचित आणि क्रियमाण ) हें आत्मज्ञान होऊन नष्ट झालें, आणि विज्ञानमय आत्मा म्हणजे जीव याच्या प्राणादि सर्व उपाधि नाहींशा झाल्या, म्हणजे तो उपाधिशून्य होतो, कर्मशून्य होतो, ज्ञानरूप होतो, सारांश सर्वव्यापी आणि सर्व-श्रेष्ठ होतो, ब्रह्मरूप होतो. मुक्त झालेल्या पुरुषाच्या दृष्टीनें सर्व ब्रह्मरूप होतें. आपल्या जीवांच्या दृष्टीनें प्राणादि सर्व कला आपल्या मूळ कारणांत (अव्यक्तांत) लीन होतात. असो; कर्में नष्ट होतात आणि जीव ज्ञानरूप होतो. तात्पर्य उपाधिशून्य झालेला पुरुष मुक्त होतो ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**यथा नद्यः स्यन्दमानाः समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय । तथा विद्वान्नामरूपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ—स्यंदमानाः नद्यः यथा समुद्रे नामरूपे विहाय अस्तं गच्छंति, तथा नामरूपात् विमुक्तः विद्वान् परात्परं दिव्यं पुरुषं उपैति ( वाहणाऱ्या नद्या आपलीं नामरूपें सोडून देऊन ज्याप्रमाणें समुद्रांत शिरून एकरूप होतात त्याप्रमाणें नामरूपादि उपाधींचा त्याग केलेला ज्ञानी पुरुष दिव्य आणि परात्पर—श्रेष्ठापेक्षांही श्रेष्ठ-जो पुरुषोत्तम त्याप्रत जाऊन एकरूप होतात ) ॥ ८ ॥**

हा मंत्र प्रश्नोपनिषदांत आला आहे तेव्हां त्याची चर्चा पुनः येथें करण्याचें कारण दिसत नाहीं ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति । तरति शोकं तरति पाप्मानं गुहाग्रन्थिभ्यो विमुक्तोऽमृतो भवति ॥ ९ ॥**

अन्वय व अर्थ—**यः ह वै तत् परमं ब्रह्म वेद, सः ब्रह्म एव भवति** ( ज्या कोणाला या परमश्रेष्ठ ब्रह्माचें ज्ञान विज्ञान झालें तो ब्रह्मच होतो ) **अस्य कुले अब्रह्मवित् न भवति** ( त्याच्या कुलामध्यें ब्रह्मसंबंधानें अज्ञानी पुरुष उत्पन्न होत नाहीं ) **शोकं तरति, पाप्मानं तरति, गुहाग्रंथिभ्यः विमुक्तः अमृतः भवति** ( तो ब्रह्मवेत्ता शोकपार होतो, पापसमुद्र तरून जातो आणि अंतःकरणांत ज्या वासनादि ग्रंथि असतात त्यांपासून मुक्त होतो. आणि शेवटीं तो अमर होतो, अमृतरूपी होतो, ब्रह्म होतो ) ॥ ९ ॥

या मंत्रांत ब्रह्मविद्येचें फल सांगितलें आहे. ज्या पुरुषाला सर्वश्रेष्ठ व सर्वविलक्षण ब्रह्मस्वरूप समजतें आणि त्याचा साक्षात्कार होतो, तो प्रत्यक्ष ब्रह्म होतो. ‘ ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति ’ अशी अन्य श्रुति आहे. ब्रह्मज्ञानविज्ञानाचें हें फल आहे. स्वतःच्या संबंधानें ही गोष्ट झाली पण ब्रह्मज्ञ पुरुषाचा संसारही सुखमय होतो, हें सांगण्यासाठीं श्रुतीचा सिद्धांत असा आहे कीं, त्याच्या वंशांत ब्रह्मज्ञान नाहीं असा जीव उत्पन्न होत नाहीं. सर्वच ब्रह्ममय झाल्यावर ब्रह्मवेत्त्याच्या कुलांतील मंडळीही ब्रह्मरूप व्हावी हें योग्यच आहे. ‘ आपणासारिखे करिती तात्काळ । नाहीं काळ वेळ तया लागीं ’ असें साधुपुरुष म्हणतात, तें खोटें नाहीं. ब्रह्मवेत्त्याच्या उपदेशाचें, आचरणाचें आणि ज्ञानाचें सामर्थ्यच असें असतें कीं, त्याच्या तेजानें ब्रह्मज्ञ पुरुषाजवळ येणारे सर्व जीव ब्रह्मरूप व्हावे. याचप्रमाणें या संसारांत राहूनही त्याला शोक मोह होण्याचीं स्थानें व कारणें नाहींशी होतात. त्याची स्वार्थबुद्धि नष्ट झाल्यामुळें त्याच्या हातून कोणतेंही पुण्य किंवा पापकर्म होत नाहीं. म्हणजे इतरांचें नुकसान करणारें कर्म त्याच्या हातून केव्हांही होत नाहीं. ऐहिक किंवा पारात्रिक भोगांची वासना, कर्म–कर्तृत्वाचा अभिमान व अहंकार हीं दोन्हींही रसातळास गेलीं असल्यामुळें त्याच्या हातून परोपकारी कर्म मात्र घडत असतें. तथापि अहंकर्तृत्व आणि अहंभोक्तृत्व सर्वथा निमाल्यामुळें त्याला पुण्यपापाची वार्ताही नसते. परमार्थदृष्टीनें पाहिलें तर पुण्यसुद्धां पापरूप असतें. कारण तेथें स्वतःला स्वर्गलोकीं सुख मिळावें अशी आशा असते. वैषयिक सुखाची गोष्ट आली कीं, त्यांत जेथें एकाचा फायदा, तेथें दुसऱ्याचें नुकसान

व्हावयाचें, हा सिद्धांतच आहे. मग तें स्वतःस सुख देणारें पुण्य कां असेना? आता व्यावहारिक पापापेक्षां व्यावहारिक पुण्य अत्यंत श्रेष्ठ खरें, पण परमार्थाचा विचार करतांना पुण्य आणि पाप ह्या दोन्ही वृत्ती स्वतःपर असल्यामुळें पापरूपच होतात. असो,असल्या पापरूप सागराला तरून तो चालतो आणि याच उपनिषदांत ( २।२।८ पहा! ) सांगितल्याप्रमाणें त्याच्या सर्व हृदयग्रंथींचा भेद होतो, तो निरुपाधि होतो आणि ब्रह्मरूप होतो. प्रथम अर्धांत ब्रह्म होतो असें जें सांगितलें आहे, त्याचें विस्तृत वर्णन या मंत्राच्या उत्तर भागांत आहे ॥ ९ ॥

**तदेतदृचाऽभ्युक्तम्–**

**अन्वय व अर्थ—तत् एतत् ऋचा अभ्युक्तम्** (तें हें ऋग्वेदमंत्रानें स्पष्ट केलें आहे. )

तें हें म्हणजे ब्रह्मविद्येचा उपदेश कोणास करावा याचा नियम| होय. हा नियम ऋग्वेदामध्यें पठित झाला आहे.

---

## मंत्र दहावा.

**क्रियावन्तः श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठाः स्वयं जुह्वत एकर्षिं श्रद्धयन्तः । तेषामेवैतां ब्रह्मविद्यां वदेत शिरोव्रतं विधिवद्यैस्तु चीर्णम् ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थ–क्रियावन्तः, श्रोत्रियाः ब्रह्मनिष्ठाः, स्वयं एकर्षिं जुह्वतः श्रद्धयन्तः** ( वेदविहित कर्मे करणारे, वेदाध्ययन केलेले, अगर ब्रह्माचें ज्ञान करून घेऊन परब्रह्माचें ज्ञान प्रसृत व्हावें, एतदर्थ एकनिष्ठेनें प्रयत्न करणारे, स्वतः एकर्षि नामक अग्नीला हवनानें तृप्त करणारे व शुद्ध आस्तिक्य बुद्धि असलेले ) **तेषां यैः शिरोव्रतं चीर्णं एतां ब्रह्मविद्यां वदेत** ( त्यांपैकीं ज्यांनीं विधिपूर्वक शिरोव्रताचें अनुष्ठान केलें आहे, त्यांना मात्र ब्रह्मविद्येचा उपदेश करावा ) ॥ १० ॥

ऋग्वेदमंत्रानें ब्रह्मविद्या शिकण्याचा अधिकार कोणास असतो तें सांगितलें आहे. वेदाध्ययन, विहितकर्माचें अनुष्ठान अग्निहोत्रधारण (यांतच शमदमदिमनःसंयमाचा भाग होतो . ब्रह्मनिष्ठा, आस्तिक्यबुद्धि ज्या ब्रह्मसाधकांस आहे, त्यांपैकीं ज्यांनीं शिरोव्रताचें अनुष्ठान केलेलें असेल त्यांस मात्र ब्रह्मविद्येचा उपदेश करावा. वेदव्रताचें अनुष्ठान कसें करावें, शिरावर अग्निधारण कसें करावें, इत्यादिकांचें वर्णन अथर्ववेदामध्यें

सांपडेल. तात्पर्य मुमुक्षूंनें जें अवश्य केलें पाहिजे, विवेक, वैराग्य, मनःसंयमन आणि मुमुक्षा हीं साध्य करून घेतलीं पाहिजेत, असे जे नियम ब्रह्मविद्येंत सांगितलें आहेत, तें सर्व केवळ ऋग्वेदांत सांगितलेल्या ह्या मंत्रांचा शुद्ध अनुवाद आहे. ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा.

**तदेतत्सत्यमृषिरङ्गिराः पुरोवाच नैतदचीर्णव्रतोऽधीते । नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः॥११॥**

**इति तृतीयमुण्डके द्वितीयः खण्डः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—तत् एतत् सत्यं आङ्गिराः ऋषिः पुरा उवाच** ( तें हें सत्य पूर्वी आङ्गिराऋषी शौनकाप्रत उपदेशिता झाला ) **एतत् अचीर्णव्रतः न अधीते** ( ज्यानें येथें सांगितलेल्या व्रताचें अनुष्ठान केलें नाहीं तो या उपनिषदाचें पठण करीत नाहीं ) **परमऋषिभ्यो नमः, नमः परमऋषिभ्यः** ( श्रेष्ठ ऋषींना नमस्कार असो; श्रेष्ठ मुनींना नमस्कार असो ) ॥ ११ ॥

याप्रमाणें ही ब्रह्मविद्या पूर्वी अंगिराऋषीनें शौनकास उपदेशिली. ही विद्या ज्यानें विहितव्रताचें अनुष्ठान केलें नाहीं, त्याला अधीत करतां येत नाहीं. कारण त्याला समजून घेण्याचा अधिकार प्राप्त होत नाहीं. व त्यांनें अध्ययन केलें तरी त्यांस ती समजावयाची नाहीं. ज्या महाभागऋषींनीं ब्रह्मविद्येच्या संप्रदायाची परंपरा चालू ठेविली, त्या थोर आणि जगकल्याणकारी ऋषींस नमस्कार करितों. येथें दोन वेळ नमस्काराचा उच्चार आहे. तो ब्रह्मविद्येविषयीं आदर दाखविण्यासाठीं आणि मुण्डक उपनिषत् समाप्त झालें, हें कळविण्यासाठीं झाला आहे ॥ ११ ॥

**तृतीय मुण्डकांतील द्वितीयखंडाचें विवरण समाप्त झालें.**

**ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः ।**
**भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥**
**स्थिरैरङ्गैस्तुष्टुवाꣳसस्तनूभिः ।**
**व्यशेम देवहितं यदायुः ॥**
**ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।**

**अथर्ववेदीय मुण्डकोपनिषदाचें विवरण संपलें.**

ॐ शांतिः शांतिः शांतिः

---

# उपसंहार.

या उपनिषदांतील पहिल्या तीन मंत्रांत श्रुतीचें अपौरुषेयत्व, तिची परंपरा आणि परविद्यामूलक प्रश्न इतके विषय आले आहेत.

१ पहिल्या मंत्रांत प्रथमतः श्रुतीच्या म्हणजे उपनिषदांच्या अपौरुषेयत्वाचा विचार कर्तव्य आहे. हा प्रश्न उत्पन्न होण्याचीं कारणें अनेक आहेत, पण त्यांतील एका कारणाचा मात्र उल्लेख श्रुतीनें परोक्षतः केला आहे. विश्वाची उत्पत्ति करून त्यांचें पालनपोषण करणारा, सर्व देवांत ज्येष्ठ व श्रेष्ठ असणारा जो ब्रह्मदेव, त्यानें आपल्या ज्येष्ठ पुत्राला ब्रह्मविद्येचें संप्रदान केलें, असें श्रुति सांगते. पण ब्रह्मदेवालाही ही ब्रह्मविद्या कोठून प्राप्त झाली, हें मात्र सांगत नाहीं. असें कां ? याचें कारण उघड आहे. तें हें कीं, ब्रह्मदेवाला या विद्येचें स्फुरण स्वयंभुपणानें झालें, असें जनांस समजावें हें श्रुतीचें इंगित आहे. ब्रह्मदेवाला ही विद्या या कल्पच्या आरंभीं सर्वांच्या अगोदर समजली व त्यानें तिचा संप्रदाय मात्र पुढें चालूं ठेविला; म्हणून या विद्येला ब्रह्मविद्या हें नांव द्या, हवें असलें तर; पण ही विद्या ब्रह्मदेवानें उत्पन्न केली असें मात्र म्हणूं नका. अमेरिकस नांवाच्या गृहस्थानें एका नवीन पृथ्वीखंडाचा शोध लाविला म्हणून त्या खंडाला ‘अमेरिका’ आपण म्हणतों हें खरें; पण यावरून त्या शोधकपुरुषानें अमेरिका उत्पन्न केली असें केव्हांही समजत नाहीं. हर्शेलसाहेबानें नभोमंडलांतलि ‘हर्शेल’ नामक नवीन ग्रहाचा शोध लाविला म्हणून जर आपण ‘हर्शेल’ ग्रहाचें पितृत्व हर्शेलसाहेबांस देऊं लागलों, तर आपल्या तारतम्यज्ञानाची स्तुति करावी, तेवढी थोडीच होणार ! असाच प्रकार ब्रह्मविद्येच्या संबंधाचा आहे. सर्व दृश्यादृश्याचें नियमन करणाऱ्या ब्रह्माचें स्वरूप काय असावें, हें दीर्घ व एकनिष्ठज्ञान तपश्चर्येच्या साहाय्यानें ब्रह्मदेवास परमात्म्याच्या प्रसादानें **समजलें,** म्हणून त्यानें ब्रह्म **उत्पन्न केलें,** त्याचें स्वरूपही उत्पन्न केलें किंवा ब्रह्माकडे सर्व नियामकत्व दिलें किंवा ब्रह्मविद्या निर्माण केली, असें असत्य-विधान आपल्यास किंवा ब्रह्मदेवास तरी कसे करितां येईल ? पुनः ब्रह्मदेवच जर उत्पन्न झालेला देव आहे, तर तो कालस्थलातीत व कार्यकारणातीत ब्रह्माला किंवा ब्रह्मस्वरूप सांगणाऱ्या विद्येला उत्पन्न कशी करणार ? अनुत्पाद्य वस्तु उत्पन्न पुरुषाच्या हातून उत्पन्न झाली, असें म्हणणें म्हणजे स्वच्छ व स्थिर जलांत पडलेल्या सूर्यप्रति-बिंबांनीं सूर्यबिंब उत्पन्न केलें, असें म्हणण्याचें महापातक आपल्या शिरावर येऊन आदळतें ! असो; ब्रह्म व ब्रह्मविद्या या नित्यवस्तु आहेत. यांस उत्पन्न करणें केव्हांही शक्य नाहीं; म्हणून उपनिषन्मूलक श्रुतींस अपौरुषेय, अपुरुषकृत, अकृत, नित्यसिद्ध, असें म्हणण्याचा योग्य परिपाठ आहे. ह्याचें तात्पर्य इतकेंच आहे कीं, ब्रह्मविद्येंत जे नित्य आणि सत्य सिद्धांत सांगितलेले असतात, त्यांचें नित्यत्व अथवा सत्यत्व कोणा पुरुषाच्या–प्रत्यक्ष पुरुषोत्तमाच्याही–इच्छेवर अवलंबून नसतें. गुरुत्वाकर्षणाचे नियम कोणी केले नाहींत व कोणाच्या इच्छेवर अवलंबून नाहींत. जड स्वभाव जोंपर्यंत आहे तसा असेल, तोंपर्यंत ते नियम निराबाधपणानें चालावयाचे, हा दृश्यसृष्टींतील ठाम सिद्धांत आहे. परस्पराकर्षणाचा आपला स्वभाव जडानें सोडिला तर मात्र गुरु-

त्वाकपणाच्या सिद्धांतांत फरक पडेल. ही जडाची गोष्ट झाली. पण ब्रह्म हें स्वतः व स्वरूपानें निर्गुण आहे, म्हणून त्याचें स्वरूप व हें स्वरूप सिद्धांतरूपानें सांगणारी ब्रह्मविद्या, केव्हांही व कोणत्याही प्रसंगीं अन्यथा होण्याचा संभव सुद्धां नाहीं. कांहीं परिस्थिति पाहून राजा किंवा सरकार कायदे करितें व परिस्थिति बदलली म्हणजे ते कायदे फिरवितें, तसा प्रकार ब्रह्मविद्येचा नाहीं. कारण तेथें परिस्थितीचाच अभाव असतो. कायदे ग्रंथरूप असोत किंवा स्मृतिरूप असोत; कालस्थलांनीं परिस्थितींत अंतर पडलें कीं ते कायद्याचे ग्रंथ किंवा स्मृति अन्यरूपानें अवतीर्ण झाल्याच पाहिजेत. पण ब्रह्मस्थितींत कालस्थलाचा प्रश्न नसतो, म्हणून, ब्रह्मविद्येचें स्वरूपांतर होण्याची शक्यता उत्पन्न होत नाहीं. अतएव ब्रह्मविद्या नित्य म्हणजे अपौरुषेय आहे.

याप्रमाणें श्रुतीला ' अपौरुषेय ' कां म्हणतात व म्हटलें पाहिजे याची एक उपपत्ति आहे. आतां या मंत्रांत आणखी एक दोन सिद्धांतांचा साक्षात् उल्लेख आहे, त्यांचें स्पष्टीकरण, मला वाटतें तसें, करून या मंत्राची रजा घेतों. 'ब्रह्मदेव हा **विश्वाच्या उत्पत्तीचें निमित्तकारण** असून त्यांचें **पालन पोषणही करणारा** आहे' असें श्रुतीनें म्हटलें आहे. अर्थात्‌च या वाक्यापासून एक सामान्य सिद्धांत निघतो तो हा : ब्रह्मविद्या समजण्याला अधिकार लागतो. हा अधिकार किंवा योग्यता म्हणजे जें कांहीं कर्तव्य प्राप्त झालें असेल, ते निष्कामत्वानें करून आपलें अंतःकरण शुद्ध करावयाचें आणि जसजसें अंतःकरण शुद्ध होत जाईल, तसतसें ब्रह्मचिंतन व ब्रह्मप्रवचन केवळ स्वकृतार्थतेच्या व लोककल्याण करण्याच्या सदिच्छेनें करावयाचें. स्वार्थ साधणाऱ्या म्हणजे स्वतःच्या शरीरास व मनास उपभोग व आनंद देणाऱ्या वस्तूंचा त्याग करून संन्यासवृत्तीनें अरण्यांत किंवा उदासीनवृत्तीनें समाजांत राहणें हा मार्ग ठीक असेल कदाचित्; पण समाजांत संन्यासवृत्तीनें राहून लोकांचें खरें कल्याण करण्यामध्यें आपली काया व आपलें मन चंदनापरि झिजविण्यानें शरीराचे व मनाचे दोष नाहींतसे होतात, आपलें मन विस्तीर्ण होऊन तें साधु पुरुषांच्या, परमेश्वराच्या किंवा ब्रह्माच्या निर्मर्याद मनाशीं सरूप होत जाण्याचा संभव असतो, तसा केवळ शरीराच्या किंवा मनाच्या शुद्ध नैष्कर्म्यानें म्हणजे कर्मसंन्यासानें उत्पन्न होईल, असें मला वाटत नाहीं. 'नहि संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ' ' कायक्लेशभयात्त्यजेत् ' इत्यादि गीतावाक्यें मी म्हणतों, याला प्रमाण आहेत. अद्वैतमताचे खरे प्रणेते प्रत्यक्ष श्रीमच्छंकराचार्यही म्हणतात कीं ' अपरविद्या म्हणजे धर्माधर्माचीं साधनें व त्यांचीं फलें सांगणारी विद्या होय. ' म्हणजे कांहीं तरी स्वतःचें विषयकल्याण करणारें फल योजून त्याच्या सिद्ध्यर्थ जें विशेष कर्म करावें लागणार, तें कर्म सांगणारी अपरा विद्या असते, म्हणून ती त्याज्य आहे. याचा अर्थ सर्वकर्मांचा त्याग करणें, असा नव्हे. तर स्वतःची विषयसमृद्धि करणाऱ्या कर्मांचा व ती विद्या सांगणाऱ्या अपरविद्येचा मात्र त्याग मुमुक्षूला विहित आहे. आचार्यांचें हें तात्पर्य आहे, असें मला वाटतें. असें नसतें तर श्रीमच्छंकराचार्यांसारख्या अलौकिक जीवन्मुक्तश्रेष्ठानें जगत्कल्याणार्थ प्रस्थानत्रयीवर विस्तीर्ण, न्यायशुद्ध व आपल्या ओजस्वी तेजानें सर्वांस दिपवून टाकणारीं भाष्यें तरी कां लिहिलीं किंवा असन्मतांचा उच्छेद करण्यासाठीं दिग्विजय करण्याचे श्रम तरी कशाला घेतले ? तें कांहीं नव्हे; ' जीवन्मुक्तानें स्वविषयोत्तेजक कर्मांबरोबर स्वपरापर आत्मिक कल्याण करणारे कर्मांचा सुद्धां त्याग करावा, ' हें जें स्वपरविघातकारी मत आमच्या आधुनिक समाजांत आज पांचसहाशें

वर्षे सैरावैरा बोकाळलें आहे, तें श्रुतीला मान्य नाहीं, श्रुतीचें सारसर्वस्व मंथणाऱ्या श्रीकृष्णास मान्य नाहीं आणि अद्वैतविद्येला पुनः अभंग अधिष्ठानावर बसविणाऱ्या श्रीशंकराचार्यांस ही मान्य नाहीं, हें पुरुषाच्या हातांतील सलकड्यांइतकें उघड आहे. आतां ' कर्म न करणें ' हा नियम मनुष्यस्वभावास व विशेषतः 'आर्यस्थानाला' खालीं हिंदुस्थानापर्यंत स्वकर्मानें किंवा कर्माभावानें ढकलणाऱ्या आमच्या येथील लोकांस आवडतो. कांहीं वाक्यांचा फायदा घेऊन व 'मिथिलायां हि दग्धायां का मे वद क्षतिर्भवेत् ' इत्यादि अर्थाचीं वाक्यें पोपटांसारखीं घोकून आमच्यांतील ' वेदांती ' म्हणवून घणारे कांहीं अहंमन्य लोक सर्वकर्मशून्य झाल्याचें स्तोमही मिरवितात. पण देह आहे, तोंपर्यंत उदरगर्तेंत कांहीं तरी भरलेंच पाहिजे; तेव्हां 'हत्वाऽपि स इमाँल्लोकान्' इत्यादि श्रीकृष्णगीत श्लोकांचा अनर्थकारी अर्थ करून वाटेल तें कर्म करण्यास प्रवृत्त होतात आणि 'अंधळ्यांच्या माळेस नेणारा अंधळा' आपल्यास व आपल्या अनुयायांस कांटेरी खळग्यांत नेऊन टाकितो,त्याप्रमाणें हे लोक स्ववंचना करून आपल्याबरोबर दुसऱ्याच्याही गळ्याला फांस लावितात. असो; तात्पर्य हें आहे कीं परमार्थ–हानि करणाऱ्या विषयांची उत्पत्ति हा कलियुगाचा खरा पाया; ह्याचा नाश करणें हें प्रत्येक सुजाण पुरुषाचें कर्तव्य आहे. विषयात्मक पदार्थ उत्पन्न करणाऱ्या कर्मांचा त्याग करावयाचा म्हणजे स्वतःची चैन जितकी कमी करितां येईल तितकी करावयाची आणि राहिलेल्या वेळांत व असलेल्या शक्तीनें, शरीरानें अथवा मनानें पंगु असलेल्या इतर लोकांचा समाचार घ्यावयाचा, हें श्रुतिस्मृतिप्रणीत तत्त्व आहे. अनुभवही असाच आहे. नाणवलला प्रत्येक खरा साधु ' जड जीवां उद्धार केला । मार्ग सुपंथ दाविला ' याच न्यायानें वागत असतो आणि श्रुतीचा न्यायबद्ध उपदेश असाच आहे. कांहीं कर्में बद्धक आहेत, म्हणून सर्व कर्मांचा त्याग करणें, हें चोऱ्या होतात म्हणून द्रव्यसंग्रह करावयाचा नाहीं किंवा ' कां न सदन बांधावें कीं त्यांताचि ती बिळें करील घुस ' या पंतोक्तींत ' न ' काढून टाकावयाचा, असें होईल ! असो.

दुसरी गोष्ट 'सर्वविद्याप्रतिष्ठां ब्रह्मविद्यां' या पदसमूहाकडे मुमुक्षूंचें लक्ष्य वेधावें, अशी माझी मनोदेवता मला सांगते. आत्मविद्या किंवा ब्रह्मविद्या ही सर्वविद्यांस अस्तित्व देणारी, त्यांस आश्रय देणारी व त्यांचें नियमन करणारी आहे. माझ्या समजुतीनें ब्रह्मविद्येच्या या लक्षणाकडे जितकें लक्ष्य लागावें, तितकें आपल्यापैकीं जे सुजाण लोक आहेत त्यांचें लक्ष्य लागलेलें नाहीं. विश्वामध्यें अनेक, नव्हे ! अनंत विद्या आहेत, आमच्या पूर्वपूर्वजांस पुष्कळ विद्या शिकण्याची हौस होती. पण ज्या दिवशीं अयथार्थ नैष्कर्म्याचा अवतार होऊन संन्यासदीक्षेची किंवा सर्वकर्मसंन्यासाची मुहूर्तमेढ रोविली गेली, त्या दिवसापासून पुढें आज तागाईत विश्वविद्यासंबंधानें जें औदासिन्य, जो तिरस्कार अवतीर्ण झाला व जो आमच्यामध्येंही आजपर्यंत आनुवंशिक संस्कारांनीं जिवंत राहिला आहे, त्याचें अल्पसें वर्णन करितांना सहस्रमुखी शेष सुद्धां थकेल; मग माझ्या सारख्या एकमुखी अल्पज्ञानें त्याचें काय वर्णन करावें ? नाहीं म्हणावयाला अपरविद्यैपैकीं वेदावर प्रतिष्ठित झालेल्या धर्मशास्त्राचें, व्याकरणाचें आणि न्यायाचें अध्ययन मात्र कांहीं ब्राह्मण लोक करितात व कांहीं ब्राह्मण आपआपल्या शाखेंतील वेदाचें अध्ययन करितात. पण वेदाध्ययन म्हणजे घोंकीव विद्या झाली आहे. खरें पाहिलें असतां, वेदाचा सर्व कटाक्ष वेदैकवेद्य जो परमेश्वर व त्यांहून ही अत्यंत पलीकडे असणारें ब्रह्म

यांचें वर्णन करण्याकडे आहे. पण हें आम्हांस काय होय ! आमची स्थिति म्हणजे सुवर्णसंपन्न कोशागारास कुलुपें घालून त्याच्या सभोंवतीं पाहरामात्र करणाऱ्या गोलंदाज शिपायाप्रमाणें आहे ! वेद घोंकले, वेदांचें संरक्षण केलें म्हणजे आम्हांस मुक्ति मिळेल, अशी आम्हीं अवास्तव समजूत करून घेतली आहे ! आमच्या अलौकिक पुण्याईनें आम्हांस रत्नखचित सुवर्णभांडागाराचा ठेवा लाधला आहे. पण आम्ही असें मख्ख कीं 'हुं' का 'चुं' न करीतां गुपचुपपणें आम्हांस प्राप्त झालेल्या अद्वितीय सारस्वताचें जिव्हाशस्त्रानें बाह्यसंरक्षण मात्र करित आहोंत. जिव्हेच्या पलीकडे, अंतःकरणांत, आम्ही वेदज्ञानाचा प्रवेश होऊं देत नाहीं. भीति ही कीं षट्कर्णी मंत्र होऊन त्याचा रहस्योद्भेद होईल ! अशी इसापनीतींतील श्वानराजासारखी आमची स्थिति असावीना ! हर ! हर !! असो; न्यायमीमांसाव्याकरणादि शास्त्रांची हीच दशा ! न्यायाच्या शाब्दिक कोट्या आम्ही लढवूं, निरुत्तर परिष्कार ठोकूं, 'उदिते जुहोति,' 'अनुदिते जुहोति' या विरोधी वाक्यांवर रणें माजवूं, प्रत्येक वाक्य विधिपर आहे, असें व्याकरणाच्या जोरावर सिद्ध करूं; येथें आमची बहादुरी पाहून घ्यावी. पण फलश्रुति काय ? कांहीं नाहीं. विश्वकपाटांतील अनंत विषयांचा न्यायशास्त्रपद्धतीनें उलगडा करून परमेश्वरीलीलेचा व सामर्थ्याचा शोध लावावयाचा, त्यावरील भक्ति दृढ करावयाची व जनतेची कष्टमय यात्रा सुखकरी करून त्यांची संस्कृति मोक्ष मिळेल इतकी उन्नत करावयाची, हा जो न्यायशास्त्राचा मुख्य उपयोग तो नाहींसा होऊन न्यायशास्त्र म्हणजे शाब्दिकवादाचें अवडंबर माजवावयाचें हा विपरिणाम झाला ! महर्षिपाणिनीसारख्या महापुरुषानें व्याकरणशास्त्राची व्यवस्था लावून भाषाशास्त्राचे ( Philology ) नियमांचा नकाशा आंखून ठेविला, कात्यायन, पतंजली, भट्टोजी इत्यादिकांनीं त्या शास्त्राचा विस्तार केला, त्याचा आमच्या आधुनिक वैयाकरणांनीं काय उपयोग केला बरें ? असो; स्वकालीन समाजाची परिस्थिति काळजीपूर्वक पाहून समाजशास्त्राचे नियम मनुआदि माहात्म्यांनीं शोधून काढले व समाजाची व्यवस्था लाविली, तीच व्यवस्था अद्यापि ही, समाज परिस्थिति बदलली असतांही, आम्ही चालूं ठेविली आहे, हें पाहून मनुयाज्ञवल्क्यादि, महर्षींस किंवा त्यांच्या आत्म्यांस आमची बहादुरकी केवढी वाटत असेल व आपण या ऋषींस सर्वज्ञ परमेश्वराच्या पंक्तीस नेऊन बसविलें आहे, हें पाहून त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रूंचे पूर लोटत असतील, नाहींबरें ? असो. कोळसा उगाळावा, तेवढा काळाच निघायचा. आमचें नशीब कीं आमच्या पूर्वजांनीं शोधून काढलेल्या विश्वनियमांचें व कर्मनियमांचें भांडार–पाठ करून कां होईना ? अद्यापि आम्ही जिवंत ठेविलें आहे. भाग्य आमचें कीं ऐतिहासिक लेख व पूर्वकालीन बखरी, यांची वाट जशी आमच्यांतील कांहीं लोक लावितात, त्याप्रमाणें ज्ञानाच्या व कर्तृत्वाच्या उदासीन कालांत सोन्याहूनही मोलवान् असणाऱ्या ग्रंथांची राखरांगोळी आम्ही केली नाहीं किंवा पूर्वींचे ग्रंथ अधीत करणाऱ्यास नीरोबादशहाप्रमाणें सुळावर चढविलें नाहीं. परमेश्वराची कृपा कीं आमचें विश्वमोलवान् ग्रंथांपैकीं बरेच ग्रंथ आमच्या पूर्वपूर्वजांचे बुद्धिवैभव सांगण्यास आजला जिवंत आहेत आणि मला आशा आहे कीं पौरस्त्य व पाश्चात्य लोकांचा समागम झाल्यामुळें आमच्यामध्यें लवकरच चौकसबुद्धि व कर्मशीलता पुनः उत्पन्न होण्याचा पुष्कळच संभव आहे. ती सार्थ झाली तर आमचे अनेक सहस्र वर्षांचे आनुवंशिक ज्ञानसंस्कार जागृत होऊन आमचें ज्ञान व आमचें कर्म वरिष्ठ प्रतीचें होईल आणि हिंदुस्थानचें आर्यस्थान

हें नामकरण पुनः जिवंत होऊन आमच्या राष्ट्राची अभिसंपन्नता सर्वोत्कृष्ट नाहीं, तरी उत्कृष्ट वर्गांत वास्तव्य करित राहील. तसेंच सर्व जगताला मोक्षाचा मार्ग दाखविण्यासाठीं सदैव सिद्ध असणारी ब्रह्मविद्या ही इतर विद्याची आदिजननी, पालनकर्त्री व नियंत्री आहे ह्या उपनिषद्वाक्याची सार्थकता सर्व जगाच्या प्रत्ययाला येईल.

२ दुसऱ्या मंत्रांत संप्रदायपरंपरेचे वर्णन आहे. परंपरा कायम ठेवणें हें सर्वतोपरी इष्टप्रद आहे. विद्येच्या संप्रदायपरंपरेनें विद्येचें रहस्य कळण्याचा मार्ग सुकर होतो. आतां संप्रदायपद्धतींत रहस्यकथन आणि विशेषविधि यांचा अंतर्भाव होतो, हें स्वरूपतः न कळल्यामुळें विधींचें अनुपालन हेंच मुख्य अंग आहे, असें समजून कांहीं लोक इतके पुढें जातात कीं विधिलाच रहस्य समजूं लागतात व बिचारें रहस्य एकीकडे राहतें अथवा निर्माल्यवत् होतें. संप्रदाय पुष्कळ रूढ झाला किंवा विशेष प्रसृत झाला म्हणजे त्यांत सामान्य लोकांचा भरणा जास्त होतो. कवाईत समजण्याइतकाच त्यांचा अधिकार असतो व श्रीगुरु सांगतील त्याला ‘ वेद्वाक्य ’ असें प्रायः समजून हे अतिश्रद्धालु भाविक विधिविधानाच्या जाळ्यांत आपल्यास अडकावून घेतात. व ज्ञानरहस्याचें गुढतत्त्व समजण्याची ऐपत नसल्यामुळें यांचें कल्याण होत नाहीं. हा एक परिणाम होतो हें ठीक. पण रहस्य समजण्याची ऐपत आहे, अशा लोकांनीं काय पातक केलें आहे कीं, त्यांनींही कर्माच्या कवाइतींत मात्र अडकून राहावें? याचा दुसरा परिणाम असा होतो कीं हें विधि–विधानाचें ‘ बंड ’ नवीन चौरस व चौकस लोकांस मान्य होत नाहीं; म्हणून विधींच्या संगतीनें औदासिन्यानें राहणारे विद्यारहस्याची आबाळ होऊन जाते. विधीविषयीं अश्रद्धा उत्पन्न झाली कीं विद्यारहस्य अश्रद्धेय होतें! असा आजचा प्रकार आहे. हा बदलावा, अखंड विद्यारहस्याचें दानप्रतिदान संप्रदायानुसार व्हावें पण विधिविधानें हीं परिस्थित्यनुसार बदलावीं, असें मला वाटतें. संप्रदायांत शिरल्याशिवाय पांक्त अध्ययन होणार नाहीं. यासाठीं संप्रदाय हवा. तथापि पूर्वकालीं शिष्य समिधा घेऊन जात असत, म्हणून आतांच्या शिष्यांनीं समिधाग्रहण करूनच गुरूचें अंतेवासित्व पत्करलें पाहिजे, असा हट्ट धरणें हें माझ्या समजुतीनें बरोबर नाहीं. विद्यादानप्रतिग्रहाच्या संप्रदायाला ‘ खो ’ बसूं नये आणि नळ्याबरोबर गाडीचा नाश होऊं नये, एतदर्थ मला हें लिहावें लागलें आहे.

३ तिसऱ्या मंत्रांतील प्रश्न उत्तमोत्तम आहे, असें ‘ सर्टिफिकेट ’ देण्याचा मला अधिकार नाहीं. तरी पुनः म्हणतों कीं, हा प्रश्न उत्तमोत्तम आहे. तत्त्वज्ञान म्हणजे काय, याचें ज्ञान शौनकाला पूर्ण होतें. ज्या एका सिद्धांताचें किंवा एका वस्तूचें ज्ञानविज्ञान झालें असतां विश्वांतील सर्व सिद्धांतांचा व चराचर वस्तूंचा उलगडा करितां येऊन परस्पर–संबंधही कळतात, ते सिद्धांत किंवा ती वस्तु ज्ञात झाली म्हणजे तत्त्वज्ञान झालें, असें तत्त्वज्ञानाचें लक्षण शौनकाला विदित होतें. तत्त्वज्ञान म्हणजे सर्व विद्यांचें अधिष्ठान असें पहिल्या मंत्रांत म्हटलें आहे, त्याचें तरी तात्पर्य हेंच आहे.

अनुभव हा प्रत्येक विद्येच्या मुळाशीं असतो. विद्या अनेक, नव्हे! अनंत आहेत. एकाच तऱ्हेचा अनुभव पुष्कळ वेळ आला म्हणजे व्याप्तिज्ञानाची भूमिका सिद्ध होते व तिला कार्यकारणशृंखलेनें बद्ध केली, म्हणजे व्याप्तिज्ञान ( Iduction ) सिद्ध होतें. इतर सर्व गोष्टी एकसारख्या असतील तर प्रत्येक कारण ‘ एक विशिष्ट कार्य मात्र उत्पन्न करूं शकतें. ’ हा सृष्टीचा नियम आहे. हाही नियम अनुभवानें सिद्ध होतो.

असो; व्याप्तिज्ञान झाल्यावर मग अनुमान ( Deduction ) सिद्ध होतें आणि विद्येच्या उत्पत्तीला आरंभ होतो. विश्वांतील एका विषयासंबंधानें अनुभवानें सिद्ध झालेलीं कार्यकारणनिगडित व्याप्तिज्ञानें जितकीं जास्त होतील, तितकी तितकी ती विशिष्ट विद्या शास्त्राच्या स्वरूपास येते आणि भूस्तरशास्त्र, भूशास्त्र, जीवनशास्त्र, ( यांतच वनस्पति शास्त्र व प्राणीशास्त्र इत्यादिकांचा अंतर्भाव होतो ) इत्यादि इंद्रियांस गोचर होणाऱ्या अनेक विषयांचीं अनेक शास्त्रें होतात. गणितशास्त्र लवकर सिद्ध होतें; कारण यांत अनुभवाची अपेक्षा फारशी नसते, मन, इंद्रियांचें अंतःस्वरूप, इत्यादि इंद्रियांस अगोचर पण अनुभवास गोचर वस्तूंचीं शास्त्रें अंतर्निरीक्षण ( Introspection ) पद्धतीनें तयार होतात. असा कांहीं शास्त्रांच्या उत्पत्तीचा प्रकार आहे. पण अनुभवाला आधार काय ! इंद्रियांच्या द्वारानें जें विश्व प्रकट होतें, तें खरें कशावरून ? इत्यादि प्रश्नाला उत्तर देण्यासाठीं अध्यात्मादि शास्त्रांची (Metaphysics) उत्पत्ति होते. याच्याही पुढें जाऊन या सर्वांस आधारभूत असणारें व जीवांच्या आहारविहाराला, सदाचाराला, जीवसमूहांच्या शासनाला, सारांश सर्वकलादिकांसही आश्रय असणारी जी विद्या तिला ब्रह्मविद्या अथवा तत्त्वज्ञान असें म्हणावयाचें, हा पहिल्या मंत्राचा अभिप्राय आहे. व हें तत्त्वज्ञानविज्ञान झालें असतां सर्व विद्या व सर्व कर्म यांचें ज्ञान होतें, हें सांगण्याचा तृतीय मंत्रांतर्गत प्रश्नाचें मनोगत आहे. असें आहे म्हणून मी म्हणतों कीं या मंत्रांत जो प्रश्न केला आहे, तो उत्तमोत्तम आहे, अर्थातच याला जें उत्तर येणार तेंही उत्तमोत्तमच असलें पाहिजे.

आणखी एका गोष्टीचा उल्लेख करून हें प्रकरण आटपतें घेतों. कोणत्याही प्रकारचा अनुभव असो, त्यांत अनुभव घेणारा व अनुभव घेण्याची वस्तु, या उभयतांचें **अस्तित्व** आपल्यास गृहीत घ्यावें लागतें. जीवाचे व वस्तूचे गुणधर्म आपल्यास इंद्रियादिकांनीं समजतात व सिद्ध करितां येतात. पण त्यांचा 'आहेपणा' कोणत्याही साधनानें सिद्ध करितां येण्यासारखा नाहीं. सर्व चराचरसृष्टींत जो 'आहेपणा' ओतप्रोत भरला आहे, पाहणारा व पाहण्याची वस्तु, अहंवस्तु आणि इदंवस्तु ( subject and object ) यांमध्यें जो 'आहेपणा' भरला आहे, तो कां ! तो काय आहे ! हें आपल्यास ( आहेपणा असलेल्या वस्तूसच ) सिद्ध तरी कसें करितां येणार ? एखादी वस्तु दिसते म्हणून ती असते असें आपण म्हणतों, पण याला आधार ? मृगजल दिसतें म्हणून तें आपल्यास 'आहे' असें म्हणतां यावयाचें नाहीं, किंवा जीव दिसत नाहीं, म्हणून तो नाहीं, असेंही म्हणतां कामा नये. गुणकर्म दिसेल, पण 'दिसतें तें असतें' हें कशावरून ? सारांश, 'आहेपणा, अस्तित्व, सत्ता 'exitence' ही गोष्ट आपल्यास गृहीत घ्यावी लागते. विशेष वस्तु उत्पन्न होतात व नष्ट होतात पण 'आहेपणा' केव्हांही नष्ट होत नाहीं. असो; याचप्रमाणें 'चित्त्वाची' व 'आनंदत्वाची' हकीकत आहे. आपल्यास ह्या किंवा त्या वस्तूचें विशेष ज्ञान असतें. पण कोणताही विषय पूर्णपणें आपल्या पुढें आला असतां तो ग्रहण करण्याचें सामर्थ्य जें बुद्धीला असतें, त्या विशेषसामर्थ्यामागें सामान्यज्ञानाचा गड्डा किंवा निर्विकल्पज्ञान असतें. हे ज्ञानही आपल्यास गृहीत घ्यावें लागतें व तें ही अस्तित्वाप्रमाणें सर्वत्र ओतप्रोत भरलें आहे. ही चिद्वस्तु, निर्विकल्पज्ञान, चित्त्व knowledge ही आपल्या विशिष्टज्ञानानें साध्य होणारी वस्तु नव्हे. आनंदासंबंधानें ( Bliss ) ही हेंच म्हणतां येईल.

ह्या तीन वस्तु एकरूपी असतात, हें सिद्ध करण्याचें हें स्थल नव्हे. असो; हें सच्चिनंदस्वरूप परमेश्वराचें आहे व सत्=चित्=आनंद हें रूप परब्रह्माचें आहे. हें आपल्याला 'प्रवचनानें किंवा बुद्धीनें किंवा अध्ययनानें सिद्ध करितां येत नाहीं.' परोक्षत: हें आपल्यास कळतें. पण आपण केवलस्वरूप होऊं, निर्विषय होऊं, ब्रह्मरूप होऊं, तेव्हा स्वानुभवानें कळेल' असें श्रुति सांगूं मात्र शकते. हें सामर्थ्य तिला आहे म्हणून ही ती अपौरुषेय आहे, हें निराळें. पण हें गृहीत धरून मात्र आपले सर्व व्यवहार चालतात, हें समजून घेतलें तर मात्र परविद्येचे परोक्षज्ञान होईल, असें मला सुचवावेसें वाटलें म्हणून तें येथें सुचविलें आहे. असो; ह्या पद्धतीला अतिन्यायपद्धति (Transcendental Logic) व या तत्त्वज्ञानाला ब्रह्मविद्या (Transcendental Philosophy) म्हणतात.

४. शौनकप्रश्नाला अंगिरा ऋषीनें उत्तर दिलें. परा आणि अपरा विद्या जाणून घेणेच्या आहेत. अपरविद्येसह परविद्येचें अध्ययन व ज्ञान झालें म्हणजे तत्त्वज्ञानाची सांगोपांगता सिद्ध होते. पूर्वसंप्रदायाप्रमाणें अपरविद्येंत जो ऋग्वेदादि चार वेद व शिक्षाकल्पादि सहा अंगें यांचा संग्रह होतो, त्या संग्रहाकडे आचार्यांनीं केवळ कर्मपर दृष्टीनें मात्र पाहिलें आहे. ऋग्वेदादिवेदांत अनेक शास्त्रांचा अंतर्भाव होतो, हें आचार्यांस विदित असलेंच पाहिजे. तथापि ऋग्वेदादिकांचा विनियोग केवळ यज्ञयागादि कर्में व कर्मांचीं उपांगें यांकडे मात्र होत असल्यामुळें ऋग्वेदादि ज्ञान देणाऱ्या वाङ्मयासही तत्कालीन रूढीच्या आधारावर अपरविद्येंत म्हणजे कर्मशास्त्रांत–धर्मशास्त्रांत त्यांनीं घातलें आहे, हें नीटच आहे. पण प्रश्न असा कीं, ऋग्वेदादि सर्व सारस्वत कर्मव्याख्यानच करणारें आहे कीं काय? ज्यानें ऋग्वेदाचें थोडेंसें वरवर सार्थ अध्ययन केलें आहे, तो सुद्धां सांगेल कीं वेदांत अनेक वेदकालीन आचराचे ओघ प्राप्त झाले आहेत. त्याप्रमाणें अनेक शास्त्रीयसिद्धांतांचाहि उल्लेख त्यांत आला आहे. इतकेंच नव्हें पण ज्याला आपण लवकरच 'परविद्या' असें म्हणूं ते परब्रह्मविषयक अनेक सिद्धांत ही 'अपर' विद्येंत गोंविलेल्या ऋग्वेदसंहितेंत आढळतात. तेव्हां मला वाटतें कीं ऋग्वेदादिवेदांपैकीं कर्मकांडाचा मात्र भाग आचार्यांनीं आपल्या विचारांत घेतला व तो मुमुक्षूनें हेय आहे, असें समजावें, हें सांगितलें. हें ही सर्व ठीक आहे. आतां ऋग्वेदादि अपरविद्येंत कर्मकांडाशिवाय ज्ञानाचाही बराच भाग येतो, भूगोल, इतिहास, चरित्रवर्णन सामाजिक चालीरीति, लढायांचें वर्णन इत्यादि अनेक ठळक व अनेक शास्त्रीय गोष्टींचा अंतर्भाव होतो, त्याचें काय करावयाचें? मला श्रुतीचें व आचार्यांचें मनोगत असें दिसतें कीं या ज्ञानांचा ही अंतर्भाव अपरविद्येंत करावा. पण सामान्यत: स्वार्थी कर्म 'अवर' (कमीप्रतीचें) आहे असें श्रीकृष्ण म्हणतात, म्हणून स्वार्थी वैदिक कर्मसुद्धां त्याज्य आहे, असें झालें. आचार्य ही म्हणतात कीं, कर्मपर (त्यांनीं जेथें जेथें वैदिककर्मांचा उल्लेख केला आहे, तेथें तेथें कर्म म्हणजे स्वार्थी कर्म असाच अर्थ घेतला आहे, अशी माझी समजूत आहे. असो;) अपरविद्या हेय म्हणजे त्याज्य आहे, हें ही म्हणणें अद्वैतसिद्धांताच्या पद्धतीला अनसरूनच आहे. पण याचा असा मात्र अर्थ नव्हे कीं मुमुक्षूनें वैदिक किंवा व्यावहारिक स्वार्थी कर्मांचा जसा त्याग करणें विहित आहे, त्याचप्रमाणें 'लोकहितकारी' कर्मांचा ही त्याग करावा. याच न्यायानें 'व्यवहारस्थितींत असणारें जें विश्व, त्याचें स्वरूप-वर्णन

करणाऱ्या शास्त्रांचा ही सर्वांनीं–बुभुक्षु व मुमुक्षु या उभयतांनीं–त्याग करावा ' असें ही आचार्यांनीं कोठें परमार्थतः व आग्रहानें म्हटलें आहे असें मला ठाऊक नाहीं. पण अलीकडील पांच सहाशें वर्षांच्या आमच्या नादान कालांत अपराविद्येनें सांगितलेल्या शास्त्रीयसिद्धांतांचा व विहित केलेल्या कर्मांचा त्याग झाला व चमत्कार असा झाला कीं विश्वज्ञानविज्ञानाच्या अध्यापनाला व अध्ययनाचा जिवंत झरा अटतां-क्षणीं परमार्थज्ञान किंवा परविद्या ही औदासिन्याच्या उष्णतेनें करपून गेली ! आणि शुद्ध शब्दच्छल करणाऱ्या कोट्यांचें मात्र साम्राज्य झालें. असो; ज्या दिवशीं प्रत्येक ऋषिकुलोत्पन्न स्त्रीपुरुषांस परविद्येची खरी गोडी लागेल, त्यादिवशीं त्या विद्येची घोकंपट्टी व ठरलेल्या कोट्या व ठरलेलेले वाद करण्याची पद्धति नाहींशी होऊन जाईल आणि अपरविद्येंत अंतर्भूत होणाऱ्या शास्त्रांतील सामान्य सिद्धांतांचें ज्ञानविज्ञान झाल्याखेरीज परविद्येचें अध्ययनही यथासांग होणार नाहीं हें समजेल, अशी मला पूर्ण खात्री आहे.

सारांश, अपरविद्येंत विश्वांतील दृश्यादृश्य वस्तूंचा उलगडा करून त्यांची व्यवस्था लावणाऱ्या शास्त्रांचा आणि जीवांचें व्यक्तिशः व समाजशः ऐहिक व स्वर्गीय सुख देऊन कल्याण करणाऱ्या कलांचा अंतर्भाव होतो. या शास्त्रकलांच्या अभ्यासानें जीवयात्रा सुकर होते, त्याप्रमाणें नित्यानित्यविवेकाचें, वैराग्याचें, मनःसंयमनाचें व मोक्षाचें बीज स्थूलमानानें कां होईना, पण पेरलें जातें. याचवेळीं तत्त्वज्ञानाची इच्छा जागृत होते आणि शौनक अंगिरसाकडे गेला, अर्जुन श्रीकृष्णाला शरण गेला, त्या-सारखे सुजाण पुरुषही सद्गुरूला शरण जातात आणि ब्रह्मज्ञानविज्ञानाचा लाभ करून घेतात. याप्रमाणें मुमुक्षूला ब्रह्मविद्येचा अधिकार प्राप्त करून देणारें जें साधनच-तुष्टय, त्याचा लाभ शाहण्या जीवाला कर्मानें प्राप्त होणाऱ्या फलांची अनित्यता पाहून व व्यवहारशास्त्रानें त्या अनित्यतेचीं कार्यकारणें शोधल्यानंतर आपोआप होतो. फलाची अनित्यता पाहून वैराग्य उत्पन्न होतें, त्याचवेळीं शास्त्रज्ञान असेल तर, फल नित्य असलें तरी बाह्यसुखानें किंवा विषयोपभोगानें जीवाला स्वतंत्र सुखप्राप्ति कां होत नाहीं, याची कार्यकारणमालिका समजेल तर, यदृच्छेनें प्राप्त झालेलें वैराग्य कायमचें राहील. श्मशानवैराग्याप्रमाणें दुसरे दिवशीं तें नाहींसें होणार नाहीं. अशीच मनःसंयमनादिकांची गोष्ट आहे. विवेक, वैराग्य, इत्यादि हीं मोक्षभूमिका तयार करणारीं साधनें आहेत; पण त्यांचा अधिगम शास्त्रशुद्धरीतीनें व्हावा, अशी इच्छा असेल, तर विश्वशास्त्रांचे व कर्मशास्त्रांचे सिद्धांत आपल्यास सांगोपांग समजले पाहिजेत. स्वार्थी कर्म सुद्धां व्यक्त करण्याला व स्वभोगात्मक मात्र कर्म द्वेषादि विकार कां व कसें उत्पन्न करितें, प्रेमात्मककर्मानें इतरांचें कल्याण होऊन प्रेमवृत्ति कशी व कां वाढते व आपल्या मनाला श्रेष्ठ आणि आत्मगामी संस्कार कसे व कां होतात, हें पूर्ण समजून निश्चय होण्याला अपरविद्येच्या शास्त्रांची अत्यंत आवश्यकता आहे व यासाठींच ' वेदितव्य ' असें पद सर्वकल्याणकारी, श्रुतीनें उपयोजिलें आहे. याचा सशास्त्र व सानुभव विचार माझे देशबांधव करोत. आतां अपरविद्येचें ज्ञान जीवास उपभोगात्मक कर्मबंधांत घालील, अशी प्रामाणिक भीति कांहीं आचार्यांस व कित्येक साधकांस वाटते व हें वाटणें कांहीं अंशीं सयुक्तिक आहे हें मी जाणतों. पण कधीं काळीं दुरु-पयोग होईल म्हणून अपरविद्येला बहिष्कार घालणें हें योग्य नव्हे. असो.

५ सहाव्या मंत्रांत ' अक्षर ' स्वरूपाचें वर्णन आहे. ' अक्षर ' ( ब्रह्म ) हें दृश्य, बाह्य, कार्यकारणात्मक, अद्वितीय आणि ज्ञेयविश्वाहून निराळें म्हणजे विलक्षण आहे, सेंद्रिय व सावयव जीवसृष्टीहून निराळें आहे, म्हणून ते कालस्थलातीत, अपरिच्छिन्न, सर्वनियामक अविकारी व अविकार्य असून पुनः चराचर विश्वाचें अधिष्ठान आहे, असें ब्रह्माचें वर्णन श्रुति करते. असें वर्णन करणें एक श्रुतीला मात्र शक्य आहे. आपण जीव हे देशकाल, परिस्थिति इत्यादिकांनीं परिच्छिन्न म्हणजे मर्यादित झालों आहों, म्हणून आपल्यास अपरिच्छिन्न व निरुपाधिक ब्रह्मस्वरूपाचें वर्णन करितां यावयाचें नाहीं हें उघड आहे. पहा कीं, मनोबुद्धीस व इंद्रियांस अगोचर असणाऱ्या जीवस्वरूपाचें वर्णन आपल्यास आपल्या ज्ञानसाधनांनीं करितां येतें काय? इंद्रियांच्या द्वारें जीवबाह्य वस्तूंचें सामान्य व विशेष ज्ञान संपादन करितां येईल; परंतु ज्या जीवाच्या आश्रयानें सर्व इंद्रियें कामें करितात किंवा सर्व इंद्रियें ज्याची केवळ हस्तकमात्र आहेत त्या आश्रयदात्या व नियामक जीवस्वरूपाचें ज्ञान इंद्रियांस मिळवितां येणें शक्य नाहीं. जी गोष्ट जीवाची तीच ब्रह्माची आहे. म्हणून ब्रह्मविषयक ज्ञान प्रत्यक्षतः न देणारी श्रुति परोक्षरीतीनें ( कधीं दृष्टांतानें, कधीं व्यंजनेनें, कधीं लक्षणेनें आणि कधींतर निषेधात्मक लक्षणांनीं ) देऊं शकते, तें सुद्धां ब्रह्मप्रसादानें होय. ब्रह्मवस्तुप्रमाणें ब्रह्मज्ञानही अनादि व अनंत आहे. आणि म्हणून तें अपौरुषेय आहे. असें हें ब्रह्म अव्यय ( नित्य, अविकारी आणि आविकार्यस्वरूपानें राहणारें ) असूनही भूतमात्रांच्या उत्पतिस्थितिलयाचें कारण आहे, असें श्रुति म्हणते. येथें ब्रह्म कोणत्या पद्धतीनें कारण आहे. हा वाद उत्पन्न होतो. श्रीमन्मध्वाचार्य म्हणतात कीं, विष्णुनामक ब्रह्म भूतमात्राचें निमित्तकारण मात्र आहे. कोणतेंही कारण निमित्तरूपी असो किंवा उपादानरूपी असो त्यामध्यें अवस्थांतर किंवा रूपांतर झालेंच पाहिजे. श्रीमध्वाचार्य म्हणतात कीं, निमित्तकारण असूनही ब्रह्म स्वरूपीं विकार पावत नाहीं. हा ब्रह्माचा **महिमा** आहे. तसेंच, विश्वाच्या उत्पत्त्यादिकांचे निमित्त आणि उपादान कारण वासुदेवरूपी ब्रह्म आहे, असें **श्रीमद्रामानुजाचार्य** म्हणतात. म्हणून त्यांसही वरील **चमत्काराचा** आश्रय घ्यावा लागतो. **श्रीमद्वल्लभाचार्य** हेही कांहींसे याच मार्गाचें अनुसरण करितात. आतां चमत्काराची, सृष्टि नियमाविरुद्ध किंवा न्यायनियमाविरुद्ध कल्पनेची, साहाय्यता घेतली म्हणजे कारणप्रश्नाचा उलगडा एका प्रकारे होतो, हें नीट आहे. पण तत्त्वज्ञानाच्या साम्राज्यांत **चमत्काराला** अवकाश देणें म्हणजे तत्त्वज्ञानाचा ग्रंथ (पंथ) सोडून देण्यासारखें आहे. आपण या उपनिषदामध्यें अशी एक पताका घेऊन निघालों आहों कीं तिच्यावर 'एक वस्तूचें ज्ञान झालें असतां सर्व वस्तूचें ज्ञान होईल,' असा मंत्र लिहिलेला आहे. येथें ज्ञानमूलक विचार आहे. केवळ चमत्कारमूलक किंवा श्रद्धा किंवा श्रद्धामूलक प्रश्न नाहीं. म्हणून आचार्यांनीं श्रुतिसाहाय्यानें विवर्तवादाचा स्वीकार केला आहे. ते म्हणतात कीं, ब्रह्म हें स्वरूपतः त्रिकालामध्यें अव्यय आहे. तें सृष्टि उत्पन्न करितें, तिचा संभाळ करितें किंवा तिचा लय करितें, हा जो आपल्यांस अनुभव येतोसा दिसतो, तो सत्य नाहीं. हा अनुभव मिथ्या आहे. ब्रह्माच्या अधिष्ठानावर आणि ब्रह्माच्या सत्तेनें विश्वोत्पत्त्यादि कार्यें घडून येतातसें दिसतें, हा ब्रह्मावर शुद्ध आरोप

आहे. हा आरोप कसा होतो व कां होतो ? याचें दिग्दर्शन मीं या उपनिषत्प्रकाशांत अनेक वेळ केलें आहे. त्याला अनुभवाचें, युक्तीचें आणि श्रुतीचें साहाय्य आहे. असो, मला आतां इतकेंच म्हणावयाचें आहे कीं, 'अव्यय' आणि 'भूतयोनि' या दोन पदांचा मंत्रांतील वाक्यांत दिसणारा संबंध विवर्तवादाचा पूर्ण अवतार करितो. या वादाचा पक्ष स्वीकारला म्हणजे '**चमत्कार**' कल्पनेला आणावें लागत नाहीं आणि ज्ञानपरंपरेचें कार्य विवर्तवादाच्या योगानें पर्णपणें सिद्धीस जातें. महाविद्वान् पुरुषांना मात्र श्रवण, मनन ध्यानानें स्वरूपसाक्षात्कार होऊन ब्रह्म हें अव्यय आहे, हें सत्य त्यांच्या निश्चयात्मक बुद्धीच्या कक्षेंत प्रविष्ट होतें आणि व्यवहारकालीं ज्या सृष्टीला आपण परब्रह्माचें कार्य म्हणून समजत होतों तो केवळ परमार्थदृष्टीनें आभास आहे, असें हीं ज्ञान होतें. हेंच " धीरांचे परिदर्शन " होय. ब्रह्माचें स्वरूपलक्षण मागें अनेक वेळ आलें आहे तेव्हां त्याचा विस्तार मीं येथें करीत नाहीं.

सातव्या मंत्रांत तीन दृष्टांत दिले आहेत. पहिला कोळ्याचा, दुसरा पृथ्वीचा आणि तिसरा मनुष्यजीवाचा. हे ते तीन दृष्टांत होत. विवरणांत मी सांगितलेंच आहे कीं, उपादानकारण अथवा निमित्तकारण यांच्या अभावी पदार्थांची उत्पत्ति होऊं शकते. कोळ्याच्या दृष्टांतांत बाह्य उपादान नसूनही कोळी आपल्या स्वतःच्या शरीरामधून एक तंतूचें जाळें निर्माण करितो. तसेंच पृथ्वीमधून अनंत प्रकारचे पदार्थ उत्पन्न होतांना निमित्तकारणाची अपेक्षा असत नाहीं आणि जीवाच्या उदाहरणांत निमित्तकारण किंवा उपादानकारण नसतांही केश नखें इत्यादिकांची उत्पत्ति होते. या दृष्टांतांचा विचार करितानां ही उदाहरणें समजुतीसाठीं मात्र श्रुतीनें घेतलीं आहेत, हें केव्हांही विसरतां उपयोगी नाहीं. कदाचित् वर्तमानकालीं अथवा भविष्यकालीं शोधक शास्त्र सिद्ध करूं शकतील कीं, ह्या तिन्ही दृष्टांतांत दोन्हीं कारणांचें वास्तव्य असतें. मुद्दा तो नाहीं. मुद्दा केवळ श्रोत्यांची व साधकांची समजूत पडावी; एवढाच आहे. कुलाल घट निर्माण करतांना आपल्याहून भिन्न असणाऱ्या मृत्तिकादिकांचा स्वीकार करितो आणि घट उत्पन्न करितो. येथें मृत्तिकादि हें उपादान आणि घटकार (कुलाल) हें निमित्तकारण असतें. असा प्रकार कोळ्याच्या कृतींत दिसत नाहीं. याचप्रमाणें पृथ्वीच्या दृष्टांतांत निमित्त आणि उपादान यांचा पत्ता लागत नाहीं. हा मुद्याचा भाग आहे. आणि तो हें सिद्ध करितो कीं सर्वज्ञ आणि सर्वशक्ति परमेश्वर उपादानाच्या अभावीं व निमित्ताच्या म्हणजे प्रयोजनाच्या अभावीं ही सृष्टि उत्पन्न करितो.

वर पाहिलें असतां या दृष्टांताचें एवढेंच कार्य आहे; असें दिसतें. पण थोडासा जास्त विचार केला असतां तात्त्विक मीमांसेमध्यें जे तीन पंथ निर्माण झाले आहेत त्यांचें बीज या दृष्टांतांत श्रुतीनें गर्भित केलें आहे, असें मला वाटतें. आरंभवाद (Creation Theory), परिणामवाद (Evolution–Thoery) आणि विवर्तवाद (Illusion–Theory) असे तीन वाद प्रख्यात आहेत. परमेश्वरानें प्रकृतीच्या द्वारें केव्हां तरी सृष्टि उत्पन्न केली, असें आरंभवाद्यांचें म्हणणें आहे. येथें प्रकृति हें उपादान, परमेश्वर निमित्त आणि सृष्टि हें कार्य अशी त्रयी सिद्ध होते. परमेश्वर सत्य व नित्य, प्रकृति सत्य व नित्य आणि सृष्टि ही सत्य व नित्य आहे असें या वादाचें म्हणणें आहे. प्रकृति आणि परमेश्वर हीं उभयतां नित्य मानिली तर परमेश्वराच्या सर्वव्यापित्वाचा बाध होतो म्हणून

व आकाशकालादि अमूर्तवस्तूंचा अंतर्भाव प्रकृतींत करावयाचा किंवा परमेश्वरी स्वरूपांत करावयाचा किंवा कालस्थलादि स्वतंत्र सत्य पदार्थ आहेत असें म्हणावयाचें ? या प्रश्नांचा येथें उलगडा होत नाहीं म्हणून, शिवाय अमूर्त प्रकृतीशीं ( मूल प्रकृति अव्याकृत असते हें खरें, पण व्याकृत होण्याची तिची योग्यता आहे म्हणून तिला मूर्त असें मीं म्हटलें आहे. ) कसा संयोग होऊं शकतो, हेंही समजत नाहीं म्हणूनच, आरंभ-वादाचा त्याग करून तत्त्वज्ञान्यांनीं कांहीं श्रुतींच्या आधारें परिणामवादाचा स्वीकार केला. या वादांत परमेश्वराचें शरीर हें जड आणि जीव यांच्या एकत्र स्थितीनें घडलें, जीव आणि जड हे परमेश्वराच्या शरीराचे दोन प्रकार आहेत, बीजरूपानें सर्व जीवसृष्टि आणि जडसृष्टि परमेश्वराच्या शरीरांत असते आणि सर्वनियामक परमे-श्वराच्या संकल्पानें त्याच्या शरीरांत असलेलीं अव्याकृत बीजें जीवसृष्टिरूपानें आणि जडसृष्टिरूपानें परिणत होतात असें म्हटलें आहे. अर्थातच उत्पत्तीचा प्रश्न येथें नष्ट होतो व संयोगाची अडचण ही नाहींशी होते. तथापि श्रुतीनें ब्रह्म हें अक्षर आहे, एकरस आहे, एकच एक आहे असें कंठरवानें म्हटलें आहे. या म्हणण्याची सार्थकता परिणाम वादानें सिद्ध होत नाहीं. म्हणून हें जें सर्व दृश्य विश्व आहे, तें भ्रमात्मक आहे; भ्रमानें उत्पन्न झालेल्या अज्ञानाचा हा विलास आहे; परमार्थतः जग सत्य नाहीं, सर्व दृश्य, असत् म्हणजे मिथ्या आहे, एक ब्रह्म मात्र सत्य आहे, असें विवर्तवाद सिद्ध करितो. या वादानें सर्व प्रश्नांचा उलगडा होतो, असें मला वाटते. पण या सर्व गोष्टींचा विचार मीं श्रीमद्भगवद्गीतेच्या उपसंहारांत माझ्या मतानें केला आहे. येथें या तिन्ही वादांचे अवतरण करण्याला श्रुतीनें सातव्या मंत्रांत दिलेले दृष्टांत कारण घडतात, इतकेंच कायतें. कोळ्याचा दृष्टांत आरंभवादाचा उद्बोध करितो. शरीर हें उपादान, कोळी हा निमित्तकारण व उत्पन्न केलेलें जाळें, हें त्याचें कार्य होय. पृथ्वीचा दृष्टांत परि-णामवाद स्पष्ट करितो. पृथ्वीचे शरिरांत चराचर सृष्टीचीं बीजें आहेत. तेथें खानिज पदार्थ आहेत. वनस्पतिसृष्टीचीं व जीवसृष्टीचीं बीजें तेथें आहेत. आणि पृथ्वी हें ज्याचें शरीर तो विश्वात्मा ह्या बीजांस परिणत करितो. असें हा दृष्टांत सुचावितो. शेवटीं, मनुष्यजीवाचा दृष्टांत विवर्तवादाचें अवतरण करितो. कार्यकारणांचें स्वरूप एक असतें, व्यक्ताव्यक्ताचा मात्र तेथें विशेष असतो, असें सर्व शास्त्रांचें सांगणें आहे. पण जीव हा अनेक जीवांस जन्म देतो, त्याच प्रमाणें नख, केश, लोम इत्यादि वस्तुतः निर्जीव–परंतु शरीराशीं संयुक्त आहेत तो पर्यंत सजीव–असणाऱ्या विसदृश पदार्थांसही उत्पन्न करितो म्हणजे एकरूपी कारणापासून भिन्नरूपी कार्य उत्पन्न होतें. शास्त्र-मतानें असें होणें शक्य नाहीं. म्हणून हा सर्व भ्रम आहे, असें हा दृष्टांत सुचवितो असें मला वाटतें. याचा विचार सुज्ञ जन करोत, अशी प्रार्थना करून हे दृष्टांतप्रकरण येथें संपवितों.

७ पुढें सृष्टीचा उत्पत्तिक्रम आठव्या व नवव्या मंत्रांत सांगितला आहे. ज्ञानरूप ब्रह्माला ज्ञानीपणाचें स्फुरण होतें तेव्हां त्याला शबलब्रह्म हें नांव प्राप्त होतें. मी ज्ञानी आहे, असें भान व्यवहारकाळीं मात्र व्हावयाचें. पूर्ण अव्यक्त अक्षर ब्रह्म व्यक्त झालेसें वाटूं लागलें, त्याच्यावर ज्ञानीपणाचा आरोप झाला, कीं ज्ञेयाची ( ज्ञान विषयाची, इदंप्रत्ययाची ) आवश्यकता उत्पन्न होते. मला ज्ञान आहे असें म्हटल्या-बरोबर कशाचें ज्ञान ? असा प्रश्न उत्पन्न होतो आणि त्याचें उत्तर म्हणून ज्ञेय वस्तु

आविर्भूत होते. ही ज्ञेय वस्तु आठव्या मंत्रांत 'अन्न' या नांवानें संबोधिली आहे. प्रथमतः अन्न अव्यक्तस्थितींत असतें. त्याला मूलप्रकृति असेंही म्हणावें. शबल-ब्रह्म स्थूलरूपांत आलें म्हणजें त्याला हिरण्यगर्भ म्हणतात. हिरण्यगर्भ हा सर्व कार्यकारणांचा, ज्ञानक्रियाशक्तींचा, प्राण आहे. हिरण्यगर्भ आणि अव्यक्तसृष्टि हीं अन्नाचीं बालकें आहेत. हिरण्यगर्भ सर्वज्ञ आणि सर्वशक्ति आहे. अव्यक्तसृष्टि हिरण्यगर्भाच्या ज्ञानाचा विषय आहे आणि त्याच्या कर्माचें क्षेत्र आहे. याप्रमाणें अव्यक्तप्रकृति, हिरण्यगर्भ आणि ब्रह्मशबल अशी त्रयी होते. आणि हीच सृष्टीच्या विस्ताराला कारण होते. या सृष्टीचा अध्यक्ष 'विराट् ब्रह्म' होय. अंतः-करणसृष्टीचा विस्तार आणि पंचमहाभूतात्मकसृष्टीचा विस्तार असे विस्ता-राचे दोन प्रवाह उत्तरोत्तर स्थूल होत जातात. आतां, अंतर्बाह्य विश्वाचा मूर्त विकास मानवी शास्त्रांच्या साहाय्यानें आणि महापुरुषांच्या कल्पना-प्रतिभेनें उलगडता येण्यासारखा आहे. याला अपौरुषेय श्रुतीची अपेक्षा असण्याचें कारण नाहीं. हें येथें नमूद करण्याचें कारण आहे तें असें. अनेक उपनिषदांतील सृष्टिप्रकरणें घेतलीं तर त्यांत सामान्यतः एकवाक्यता आहे असें दिसत नाहीं. याचा अर्थ मला असा दिसतो कीं, वेळोवेळीं उपनिषद्युगामध्यें जे जे महर्षि होऊन गेले, त्यांनीं आपल्या कल्पनाप्रतिभेच्या व गंभीर अनुभवाच्या जोरावर जे कांहीं सिद्धांत प्रचलित केले, त्यांचा निर्देश अपौरुषेयश्रुतीनें त्यांचें निराकरण करण्यासाठीं केला आहे. तात्पर्य हें सृष्टिवर्णन परमार्थतः तत्त्वस्वरूपाचें नव्हे. तत्त्वज्ञान सांगणारी श्रुति शास्त्रगम्यज्ञानाच्या साम्राज्यांत केव्हांही शिरावयाची नाहीं. कित्येक उपनिषदांत तत्त्वज्ञानानें हा प्रवेश केला आहे असें दिसतें. तेव्हां श्रुतीनें हे मानवी सिद्धांत अभ्युपेत करून त्यांचें अयथार्थत्व सिद्ध केलें आहे, इतकेंच समजावयाचें! असो. सृष्टिवादाशी आपल्यांस कांहींएक करावयाचें नाहीं. म्हणून यांस येथेंच रजा देतों.

८ पहिल्या मुंडकाच्या दुसऱ्या खंडांत कर्मानें उत्पन्न झालेल्या सृष्टींतील भोगांचें अनि-त्यत्व आणि नित्यस्वरूपी इच्छेचें अमर्यादत्व पहिल्या अकरा मंत्रांत सांगितलें आहे. या वर्णनांत संसाराचें निःसारत्व, वेदविहित कर्म फलाशेनें केलें असतां त्यापासून प्राप्त होणाऱ्या स्वर्गसुखाचें क्षणभंगुरत्व, केवळ ब्रह्मज्ञानशून्य निष्कामकर्माचें कालभंगुरत्व यांचाही निर्देश झाला आहे. या वर्णनावरून सर्व प्रकारचे विषयभोग आणि त्यांत मिळणारीं सुखें, दुःखकारक आहेत असें समजतें आणि त्याला अनुभवाचा दुजोरा मिळतो, जीवत्रस्त होतो, त्याला निःसार संसाराचा वीट येतो आणि तो नित्य वस्तूचें प्रतिपादन करणाऱ्या श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ गुरूला तन, मन, धनपूर्वक शरण जातो. कारण त्याला नित्य वस्तु हवी असते. जीव नित्य आहे. म्हणून त्याला नित्य स्वरूपाची तीव्र आकांक्षा आहे. या आकांक्षेच्या तृप्तीसाठीं तो गुरूला शरण जातो. बारा आणि तेरा मंत्रांत ब्रह्मज्ञान मिळविणाऱ्या पुरुषाची योग्यता कशी असावी हें सांगून अधिकारी गुरूनें शिष्यावर दया कां व कशी करावी हें हीं सांगितलें आहे. मला येथें जास्त कांहीं सांगावयाचें नाहीं. इतकेंच म्हणावयाचें आहे कीं, कोणत्याही विद्येचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याला विवेक, वैराग्य, इंद्रियनिग्रह आणि इष्ट विषय ज्ञात करून घेण्याची तीव्र उत्कंठा, या गोष्टी अवश्य पाहिजेत. सत्यासत्य ओळखण्याचें सामर्थ्य, सत्यग्रहणाची तीव्र उत्कंठा, सत्येतर विषयांचा तीव्र तिरस्कार

आणि सत्यनिष्ठा हे गुण अंगीं असतील तरच त्या त्या विद्येचा अभ्यास करितां येईल. श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ गुरूची वृत्ति दयेनें आर्द्र होणारी असल्यामुळें दयाघनत्वानें ते ही मोक्षातुर शिष्याला सत्यवस्तूचा यथार्थ बोध करितात आणि त्याला मुक्तीचा मार्ग दाखवून देतात.

९ दुसऱ्या मुंडकाच्या पहिल्या खंडांत मायोपाधिक ब्रह्माचे सापेक्ष सत्यत्वाला आरंभ आहे. यावरून श्रुतीचा अभिप्राय जीवास परब्रह्माकडे न्यावयाचा आहे, असें दिसेल. अग्नीचा दृष्टांत विषयाची समजूत स्वच्छरीतीनें पाडितो, यांत शंका नाहीं. अक्षरब्रह्मापासून अनेक स्वरूपाचे चैतन्यात्मक जीव कसे निर्माण होतात, अपरिच्छिन्न सच्चिदानंदापासून परिच्छिन्न जीव कसा निर्माण होतो, निरवयवापासून सावयवाची उत्पत्ति कशी ? मायेशाचा मायादास कसा होतो, इत्यादि उत्क्रांतिकथन हें अग्नि आणि स्फुलिंग या समर्पक दृष्टांतानें फार उत्तमरीतीनें समजतें. परब्रह्म स्वयंप्रकाश निरवयव, एकरस, अनाद्यनंत, प्राणशून्य, मनःशून्य, उपाधिशून्य, सर्वविलक्षण आणि सर्वाधार आहे. हें स्वरूपलक्षण निषेधात्मक आहे. असें लक्षण करणें मात्र श्रुतीला शक्य आहे. सर्व दृश्याचा निरास करून सर्व दर्शनसाधनांचाही निरास करावयाचा आणि मग स्वरूपाचा अनुभव घ्यावयाचा, हा उपदेश करणें, इतक्यापर्यंत मात्र श्रुतीची मजल जाणार; या पलीकडे त्या विचारीला जातां येत नाहीं. अशी जर अपौरुषेय असणाऱ्या परविद्येची कथा, तर अज्ञान, संशय आणि विपरीतभावना इत्यादि मनोवृत्तींनीं बद्ध झालेल्या जीवाला ब्रह्म समजत नाहीं, यांत काय आश्चर्य आहे ? असो; या उपाधी गुरूच्या उपदेशानें नाहींशा होतील; पण गुरूला सुद्धां 'ब्रह्म हें' असें निदर्शित करितां यावयाचें नाहीं. गुरूपदेशानें झालेलें श्रवण अज्ञान नाहींसें करील. दृश्य विश्वाच्या पलीकडे दृश्यविलक्षण ब्रह्मवस्तु असून ती सर्वांचा आधार आहे आणि तीच सर्वांचें नियमन करितें, तीच वस्तु ज्ञानाचें स्वरूप आणि आनंदाचें निधान आहे, हें ज्ञान गुरूमुखानें झालें, म्हणजे अज्ञान नाहींसें होतें. याच उपदेशाच्या मननानें अंतःकरणांतील सर्व संशय वितळून जातात. परब्रह्माचे ठिकाणीं पूज्यभावासहित भक्तीचा अत्युद्रेक होतो, आणि शेवटीं ध्यानाच्या साहाय्यानें मीच ब्रह्म आहें असें ज्ञानविज्ञान होऊन विपरीतज्ञानाचा निरास होतो. याप्रमाणें अज्ञान आणि तज्जन्य संशयादि सर्वांचा ध्वंस गुरूपदिष्टवस्तूच्या मननध्यानानें होतो. ही वस्तु हा परविद्येचा विषय आहे. आणि ही वस्तु कळली म्हणजे सर्व सृष्टीविसृष्टीचें सामान्य आणि विशेष ज्ञान होतें.

हा ज्ञानमार्ग होय. तत्त्वज्ञान तें हें. हें सर्व शास्त्रांच्या पलीकडचें आहे. या ज्ञानानें जीवाला मोक्ष मिळतो; पण हें सर्व अनुभवानें समजून घ्यावयाचें आहे. श्रुतिनिष्ठ ज्ञानाला स्वानुभवानें विज्ञानस्वरूप देऊन दृश्यविलक्षण ब्रह्मस्वरूप प्राप्त करून देण्याची योग्यता आपल्या शुद्धचैतन्याला आणून देणें, हें आपल्या शुद्धबुद्धीनें होतें. एवंच बुद्धीला मलीन करणारें अज्ञान नष्ट झालें म्हणजे ब्रह्मरूप आविर्भूत होतें.

१० परविद्येच्या सत्तेची ही मर्यादा आहे. त्याच्या अलीकडे शबलब्रह्माचें साम्राज्य आहे. हें शबलब्रह्म म्हणजे श्रीमद्रामानुजांचें ब्रह्म होय. याच्या अध्यक्षत्वाखालीं या सर्व दृश्य सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, लयादि कार्यें होतात. प्रथम हिरण्यगर्भ; नंतर विराट्स्वरूप

त्यापुढें प्रजोत्पत्ति करणारे अग्निपर्जन्यादि अग्निपंचक, ऋग्वेदादि वेद, यज्ञसामग्री, कर्मांगभूत सर्व देव आणि सर्व हविर्द्रव्यें, यज्ञ करणारे जीव, त्यांस अवश्य असणारी मनोयोग्यता, अवश्य असणारें विषय–विज्ञान–सामर्थ्य, इंद्रियें, विषय आणि विषय–विज्ञान व जड-सृष्टि हीं क्रमानें आविर्भूत होतात. सारांश, प्रथमतः जगत्सृष्टि निर्माण करण्याचा संकल्प पूर्वकल्पाच्या अनुसारानें करणारा परमेश्वर, त्याचें स्थूल,–पण जीवाच्या दृष्टीनें अत्यंत सूक्ष्म–विराट् स्वरूप उत्पादक, अग्नि, वेद, यज्ञ, यज्ञकर्ता जीव, त्याचें बाह्यज्ञान आणि जड सृष्टि ह्या क्रमानें शबलब्रह्म आपणच स्वतः हें विश्व नटून राहतें आणि कांहीं कालानंतर सर्व विश्वाचा उपसंहार करितें. सूर्यविकासिनी कमल सूर्योत्पत्तीनंतर विक-सित होऊन सूर्यास्तापर्यंत सूर्याच्या गत्यनुसार आपण स्वतः वर्तुलाकार फिरतें आणि सायंकाळीं निमीलित होतें अथवा मिटून राहतें. पण पुन्हां सूर्योदय झाला म्हणजे पूर्व दिवशींचा क्रम अव्याहत चालवितें, त्याप्रमाणें पूर्वकल्पांतील कार्यकारणांनीं नियमित झालेल्या कालीं शबलब्रह्म आविर्भूत झालें म्हणजे सृष्टीच्या विकसनाला प्रारंभ होतो, तिचा कांहीं कालपर्यंत विस्तार होतो, नंतर संकोचनाला प्रारंभ होऊन प्रलयकालीं हें सृष्टिकमल अव्यक्त स्वरूपांत लीन होतें आणि पुनः यथाकालीं विकसित होतें. हा संकोचविकासाचा क्रम अनाद्यनंत आहे आणि हा शबलब्रह्माच्या सत्तेनें अनंत-कालपर्यंत असाच चालावयाचा आहे. हा आचार्य म्हणतात किंवा प्रो० बर्गसन म्हणतात, त्याप्रमाणें गंगानदीच्या प्रचंड ओघासारखा नित्य आहे, केव्हां! व्यवहार-सृष्टीचा अपरबुद्धीनें आपण अनुभव घेत असतो, तेव्हां आपल्यास या प्रवाहाचें अखंडत्व स्पष्ट दिसतें. पण परविद्येचा अधिगम झाला म्हणजे या ओघाशीं ज्ञानीजी-वाचा संबंध तुटतो आणि जीव स्वरूपाला जाऊन मिळतो. पण जोपर्यंत परविद्येचा उदय झाला नाहीं तोपर्यंत हा सृष्टीचा क्रम अनाद्यनंतच रहावयाचा असतो.

असो, याप्रमाणें अपरविद्येनें सृष्टीमध्यें व्यवहारकालीं मात्र सत्य असणाऱ्या शास्त्रांचा अधिगम होऊन तीं तीं शास्त्रें जीवाची संसारयात्रा व्यवहारकालीन सौख्य देणारीं होतात. पण तें सौख्य अनित्य आहे, सौख्यविषयही कालभंगूर आहेत, असें ज्ञान निष्कामकर्मांच्या साहाय्यानें उत्पन्न होणाऱ्या बुद्धीला संस्कृत करिते आणि जीवाला मुक्तिमार्गाकडे जाण्याची प्रेरणा करितें. एवंच हीं शास्त्रें परविद्येच्या अंगभूत असतात, त्याप्रमाणें त्यांतील विषयही ब्रह्माच्या अंगभूत असतात. म्हणजे ब्रह्मज्ञानामध्यें अथवा परविद्येमध्यें सर्व शास्त्रांचा अंतर्भाव होतो आणि एक व अद्वितीय ब्रह्म सर्वत्र एकरसानें नांदत आहे; असें ज्ञानविज्ञान होऊन परविद्येनें जीवाचें अज्ञान नष्ट होतें.

११ पराविद्येचा विषय जो परमात्मा त्याचें ज्ञान सद्गुरूनें उपदिष्ट केलेल्या श्रुतीच्या अर्थश्रवणानें होतें. तसेंच मननानें ब्रह्म हेंच दृश्य विश्व आणि त्यांतील सामर्थ्यें आहेत असें ज्ञान होतें. आणि शेवटीं ध्यानानें आत्मसाक्षात्कार होतो. या सर्व साध-नीभूत विषयांचें दिग्दर्शन मागें केलें आहे. येथें इतकेंच सांगावयाचे कीं, इंद्रियांस अगोचर असणाऱ्या सूक्ष्म ब्रह्माचें ज्ञान व ध्यान ओंकारस्वरूपानें करणें जास्त सुकर आहे. प्राणोपासना, दहरोपासना इत्यादि ज्या उपासना श्रुतीनें विहित केल्या आहेत त्यांत ओंकारोपासना सर्वश्रेष्ठ आहे. मुमुक्षुजीवानें इतर सर्व विषयांचा त्याग करून ओंकारोपासनेचा दृढ अवलंब करावा, म्हणजे त्याला साक्षात्कार

होईल. जो सर्वज्ञ आणि सर्ववेत्ता परमात्मा आहे, ज्याचा महिमा भूलोकापासून सत्य-लोकापर्यंत प्रतिष्ठित झाला आहे, तोच आपल्या अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय कोशांचा नायक असून आपल्या हृदयामध्यें वास्तव्य करीत आहे, आपला आत्मा आणि परमात्मा एक रूप आहेत असें ओंकारस्वरूपी ध्यानानें दृढ ज्ञानविज्ञान करून घेतलें म्हणजे सच्चिदानंद स्वरूपाचा साक्षात्कार होतो, मायेचा समूल विलय होतो, आपण ब्रह्मरूप होतों, सर्वप्रकाशित होतों, आणि 'एकमेवाद्वितीयं' या श्रुतीचा अर्थ–साक्षात्कार होतो.

या प्रमाणें श्रवण, मनन, आणि ध्यान या साधनांस ओंकारोपासनेचा आश्रय मिळाला म्हणजे शुद्ध ब्रह्मस्वरूपाचा आविर्भाव होतो. मलीन झालेल्या व त्यामुळें प्रतिबिंबाचें स्पष्ट ग्रहण न करणाऱ्या किंबहुना विपरीत प्रतिबिंब ग्रहण करणाऱ्या आदर्शाला (आरशाला) घासून पुसून स्वच्छ केला म्हणजे आपल्या मुखबिंबाचें स्वच्छ प्रतिबिंब पडतें आणि आपलें स्वरूप आपल्यास समजतें. त्याप्रमाणें उपाधींनीं कलुषित झालेल्या चित्तांत उत्पन्न झालेले दोष आतांच सांगितलेल्या एकाग्र ओंकारोपासनेनें नाहींसे केले म्हणजे तें चित्त परमात्मबिंबाचें उत्कृष्ट प्रदर्शन करितें, इतकच नव्हे, तर आपण स्वतः बिंबरूप होऊन स्वरूपसाक्षात्कार देतें, असें श्रुतीचें सांगण आहे. युक्तीही तेंच सिद्ध करिते आणि अनुभव तसेंच म्हणतो. हें उघड आहे कीं, आपली चित्तवृत्ति पूर्वजन्मांतील संस्कारांनीं दुष्ट झाली असल्यामुळें आपला अहंकार, आपलें चित्त, आपली बुद्धि, आपलें मन आणि आपलीं इंद्रियें ही सर्व ज्ञान–साधनें बहिर्मुख आणि परिच्छिन्न झालेलीं असतात. त्याप्रमाणेंच विषयसुखाची आशा, विषयांचें ध्यान, विषय प्राप्त करून घेण्याविषयींचा प्रयत्न, विषयांचें ग्रहण इत्यादि जीवाच्या क्रियाशक्तिही बाह्यविषयाचा अंगिकार करण्यामध्यें तत्पर होऊन परिच्छिन्न झालेल्या असतात. सारांश, स्वरूपतः सर्वज्ञ आणि सर्व शक्तिमान् जीवाचें सर्वव्यापित्व नष्ट झालेंसें होऊन व्यवहारांत तो अल्पज्ञ, अल्पशक्तिक आणि परिच्छन्न झाला आहे, असें त्यास वाटतें. हा सर्व मायेचा खेळ आहे. माया विषयभोगानें उत्पन्न व पुष्ट होते; पण आत्मज्ञानानें नाहींशी होते. भोगदृष्टि मायाजनक आहे. आत्मदृष्टी मायाविनाशी आहे. भोगाचें ध्यान दुःखोत्पादक आहे; चित्त–विकारी आहे. आत्मज्ञान सुखोत्पादक आणि शांतिदायक आहे. भोगमार्गानें जन्ममरण येतें; ज्ञानमार्गानें तें संपतें. असा उभयतांमध्यें विवेक आहे.

१२ जीवापुढें असे हे दोन मार्ग स्पष्टरीतीनें मांडलेले आहेत. अंतर्मुख होऊन आत्मज्ञानाचा विचार करावयाचा किंवा बहिर्मुख राहून विषयांचें आणि विषयसुखाचें चिंतन करावयाचें, हें ठरविणें प्रत्येक जीवाच्या प्रत्येक वेळीं व प्रत्येक स्थळीं स्वाधीन आहे. मार्गाची निवड करून तो ग्रहण करणें हें स्वातंत्र्य प्रत्येक जीवाला असतें, असें कठआदि उपनिषदांत सांगितलें आहे, तें सर्वथा खरें आहे. भोगाचा मार्ग स्वीकारलेला पुरुष भोगाधीन होऊन जडस्थितीचें संपादन करितो आणि ज्ञानैकवश असणारा पुरुष आत्मज्ञान करून घेऊन आत्मस्वरूपांत जातो, असें एक कंठानें सांगणाऱ्या श्रुती जीवाचें कल्याण करण्याकरितां अवतीर्ण झाल्या आहेत. त्यांचा उपदेश घेणें न घेणें हें प्रत्येक जीवाच्या इच्छेचें काम आहे. भोगमार्गानें गेलें असतां तात्कालिक सुख होऊन क्षणभर देह कल्याण होतें. आणि ज्ञानमार्गानें गेलें असतां नित्य सुख

प्राप्त होऊन आत्मकल्याण होतें. असा उभयतांमध्यें विवेक आहे. आयास म्हणजे श्रम दोन्हीकडे सारखेच असतात. खरें कल्याण कोणतें, हें समजत नाहीं म्हणून देह-भोगांस लागणारे ज्ञानशून्य आयास हे आत्मज्ञान मिळवूं इच्छिणाऱ्या विवेकी पुरुषास कराव्या लागणाऱ्या श्रमाहून कमी खडतर नाहींत. असें असूनही जीव भोगैकरत होतो, याचें कारण जीवाचें शुद्ध अज्ञान हें होय.

१३ बुभुक्षा श्रेष्ठ किंवा मुमुक्षा श्रेष्ठ हा वाद जगाच्या आरंभापासून आतांपर्यंत चालत आला आहे, व तो जगाच्या अंतांपर्यंत तसाच चालत राहील, यांत शंका नाहीं. आपलें मूळस्वरूप काय? आपल्यास जें जीवित प्राप्त झालें आहे, याचा हेतु काय? आणि आपलें अंतिम ध्येय कोणतें असावें, या प्रश्नांसंबंधानें एकमत होईल तर हा वाद मिटल्याशिवाय राहणार नाहीं; पण 'एकमत होईल तर' हेंच अत्यंत अवघड आहे. जीवाच्या मूल स्वरूपाविषयीं निरनिराळ्या धर्मपुस्तकांत आणि धार्मिकतत्व-ज्ञान्यांत फारसें मतवैचित्र्य आढळत नाहीं. सामान्यतः सर्व धार्मिकलोकांची अशी समजूत आहे कीं, शुद्ध, चिद्घन परमेश्वरानें आपल्या स्वरूपानुसार जीवाची उत्पत्ति केली आहे. जीव उत्पन्न झाला, किंवा परिणत झाला, किंवा तो स्वरूपतः ब्रह्मच असून आपण अज्ञानी आहों, अशी त्याला भ्रांति झाली आहे या संबंधानें वाद असतो, असेल, असो; पण एकवाक्यता ही आहे कीं तो ईश्वरानें ईश्वरी ज्ञानस्वरूप देऊन निर्माण केला आहे. अधार्मिक शास्त्रवेत्ते म्हणतात कीं जीवस्वरूप हें जड सृष्टीचा एक गुण आहे आणि जड सृष्टि संपल्या बरोबर तोही नाहींसा होईल. म्हणजे तात्पर्य हें कीं जडापासून जीव झाला. तरी तो ज्ञानरूप आहे, असें याही लोकांस कबूल करावें लागतें. सारांश, जीवाच्या ज्ञानस्वरूपासंबंधानें मतवैचित्र्य नाहीं. धार्मिक लोकांत ज्ञानस्वरूपापासून ज्ञानी जीव झाला अशी समजूत आहे, आणि अधार्मिक लोकांत अज्ञानी जडापासून ज्ञानी जीव झाला असें म्हणण्याची पद्धति आहे. अज्ञान-स्वरूपांतून तद्विलक्षण ज्ञान, आत्मज्ञान, तारतम्यज्ञान, पुरुषार्थ साध्य करण्याची तीव्र इच्छा, इत्यादि ज्ञानरूपें कशीं उत्पन्न झालीं किंवा परिणत झालीं हें जोंपर्यंत भौतिक शास्त्रज्ञांस न्यायशुद्धपद्धतीनें सांगतां येत नाहीं, तोंपर्यंत ज्ञानशून्य स्थितींतून ज्ञान उत्पन्न झालें असेल; असत्पासून सत् झालें असेल, अशी श्रद्धा किंवा असा निश्चय होणें, मानवी बुद्धीच्या कक्षेबाहेरचें काम आहे. तेव्हां हा असत्पक्ष सोडून देऊन ज्ञानस्वरूपी परमेश्वरापासून ज्ञानाज्ञानमिश्रित जीव आणि अज्ञानपूर्ण जड हीं उत्पन्न झालीं, असें म्हणणारीं द्वैतमतें घेतलीं तरीं मनाचें समाधान होत नाहीं. येथेंही आतांच सांगितलेली अडचण दत्त उभी राहते. पहा कीं, अज्ञानापासून ज्ञानाची उत्पत्ति होणें जसें असंभवनीय, नव्हें! अशक्य आहे, तसेंच अज्ञानशून्य ज्ञानापासून अज्ञान उत्पन्न होणें हेंही अशक्य आहे. द्वैतवादी म्हणतात कीं, प्रकृति (जड आणि जडसामर्थ्यें) ही परमेश्वराची शक्ति आहे. हें म्हणणें कबूल केलें तर परमेश्वर ज्ञानाज्ञानमिश्रित आहे, असें म्हणण्याचा प्रसंग येतो आणि सर्व धर्मग्रंथांतील तत्त्वांस हरताळ लागतो. म्हणून श्रुतीच्या अभिप्रायाप्रमाणें श्रीमच्छंकराचार्य म्हणतात कीं जीव उत्पन्न झाला नाहीं, असेंच नाहीं, तर तो परमेश्वराप्रमाणें शुद्धज्ञानस्वरूप आहे. मग अज्ञानाची व्यवस्था काय? या प्रश्नाला हे आचार्य असें प्रतिविधान करितात कीं, जडमिश्रण ही सर्व भ्रांति आहे आणि ही भ्रांति अनादि आहे. जोपर्यंत व्यवहार

चालेल, दृश्य सृष्टि जोपर्यंत जिवत राहील, तोपर्यंत ही भ्रांति कायम राहील. ब्रह्मस्वरूपांत ही भ्रांति नाहीं. ब्रह्मज्ञ पुरुषाला ही भ्रांति नसते, व्यवहारांत निमग्न झालेल्या परिच्छिन्न जीवाला ही भ्रांति किंवा ही माया व्यवहारकालीं मात्र असते, तरी त्याला ती समजत नाहीं. तात्पर्य संसारी, जीवाला मायेची ओळख नसते. पण शुद्ध सुखाची शुद्ध आवड जीवस्वरूपाला नित्य आहे. त्याला शुद्ध सुख हवें असतें व तें तर शुद्ध स्वरूपानें संसारांत मिळत नाहीं, म्हणून संसारांतील सुख अनित्य, दुःखमूलक, दुःखस्वरूपी आणि दुःखपर्यवसायी आहे, असें बाह्य–सुख–विषयानें नित्य सुख न पावणाऱ्या जीवाला कळूं लागतें. म्हणजे त्यास असें समजतें कीं, संसारांत सुख मिळेल व मिळतें, असें जे वाटत असतें, तें आपल्या ज्ञानाच्या परिच्छिन्नत्वामुळें वाटत असतें. त्याला समजतें कीं, शुद्ध सुखाचें अज्ञान उत्पन्न करणारी आणि अशुद्ध, अनित्य, बाह्य, परिच्छिन्न सुखाला शुद्ध सुख असें म्हणावयास लावणारी ही माया आहे. सारांश, या पुरुषाला मायेचें भान होतें. एवंच शुद्ध ब्रह्मांत माया नाहीं, निर्मळ अज्ञानांत माया नाहीं, तर पूर्ण आनंदाचा कंद असणाऱ्या जीवाला आपल्या दुःखशून्य सुखाची, स्वस्वरूपाची, आपल्या ज्ञानरूपाची ओळख होऊं लागली म्हणजे माया उत्पन्न होते. आणि शुद्ध स्वरूपाचा पूर्ण निश्चय झाला म्हणजे ही माया संपते. शिवाय पूर्ण वेदांती म्हणतात कीं व्यवहारांत सुद्धां माया आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण ती नष्ट होते. व्यवहारही नष्ट होतो. असो; ही अशी हकीकत आहे. ही जर खरी असेल तर मायेला अनिर्वचनीय ( स्पष्ट करून सांगतां न येणारी ) आहे, असें जें विशेषण देतात तें खरें आहे, असें म्हणतां येईल. मूळ सिद्धांत हा आहे कीं, परमार्थतः जीव आणि ब्रह्म एक आहेत; कारण उभयताही सच्चिदानंदस्वरूप आहेत. ज्याप्रमाणें जडाचा अंत केव्हांही व्हावयाचा नाहीं, जडाला अवस्थांतर प्राप्त होईल, पण जडाचें अस्तित्व केव्हांही नाहींसें व्हावयाचें नाहीं, हें तत्त्व आधुनिक शास्त्र्यांस मान्य झालें आहे, त्याचप्रमाणें जीवाचें ( ज्ञानाचें ) अस्तित्व केव्हांही नाहींसें व्हावयाचें नाहीं, हा सिद्धांतही आधुनिक शास्त्र्यांस मान्य झाला आहे, मान्य होईल आणि मान्य झाला पाहिजे. जीवाच्या अवस्था बदलतील, पण जीव कधीं नाहींसा होईल, असें होणें संभवनीय नाहीं. गीताकार म्हणतात त्यास अनुसरून ‘ पुरुषं प्रकृतिं चैव विद्ध्यनादि उभावपि ’ हा व्यवहारावर स्थापित झालेल्या शास्त्रांचा ( Sciences of phenomena ) सिद्धांत आहे. पण व्यवहारासही अस्तित्व देणाऱ्या अतिभौतिक व अत्यात्मिक शास्त्राचा, तत्त्वज्ञानाचा विचार करूं लागलों म्हणजे ( १ ) जीव आणि जड हीं एकाच कारणापासून उत्पन्न झालीं असलीं पाहिजेत. ( २ ) एकाच वस्तूंचीं हीं निरनिराळीं पारमार्थिक स्वरूपें असलीं पाहिजेत, ( ३ ) किंवा एकच वस्तु द्रष्टयाच्या भ्रांतीनें विविध स्वरूपांची दिसतें असें म्हटलें पाहिजे, या तीन पक्षांपैकीं पहिला पक्ष **आरंभवादाचा** आश्रय करितो, दुसरा पक्ष **परिणामवादावर** स्थापित होतो आणि तिसरा **भ्रांतिरूपी** गोष्ट गृहीत करून परमार्थनिश्चय झाला म्हणजे भ्रांतीचा त्याग करितो, म्हणजे विवर्तवादाचा स्वीकार करितो. मला हा तिसरा पक्ष संमत आहे, असें मीं अनेक वेळ सांगितलें आहे. श्रुतीचा अभिप्राय हाच आहे. पाश्चात्य व पौरस्त्य तत्त्ववेत्ते मुक्तीच्या आणि धार्मिक तत्त्वज्ञानाच्या जोरावर हेंच सिद्ध करितात. आपण सुखरूप आहों, ज्ञानरूप आहों, आणि अस्तित्व आहों असा आपला निश्चय

विचारानें होतो आणि अमरत्वज्ञानाची आणि आनंदाची आपल्यांस तीव्र इच्छा असते, या अनुभवावरून आपला निश्चय द्विगुणित होतो. एवंच प्रत्यक्षादि प्रमाणें, श्रुति आणि अनुभव एककंठानें परमार्थतः एकरसात्मक शुद्धतत्त्व एकच आहे असें सांगतात. आणि हें तत्त्व समजलें म्हणजे विश्वाचें सामान्य आणि विशेष स्वरूप समजतें असें म्हणतात. यावरून दुःखात्मक बुभुक्षेपेक्षां सुखस्वरूप बुभुक्षा श्रेष्ठ आहे असें अद्वैतवादानें सिद्ध होतें, हें समजेल. मोक्षासाठीं आणि मोक्षास उपयोगी पडणारे भोगांचा स्वीकार करावयाचा, भोगासाठीं भोग्यविषयांचा स्वीकार करावयाचा नाहीं, असें शास्त्राचें सांगणें आहे. या सांगण्याप्रमाणें वागणें हेंच खरे वैराग्य होय. समाजामध्यें राहून परोपकारद्वारां निष्कामत्वानें इंद्रियांचें दमन केलें म्हणजे विवेकानें प्राप्त झालेलें वैराग्य शुद्धतर होतें आणि तें इंद्रियांचें दमन करण्याला अधिक समर्थ होतें. तात्पर्य, मोक्ष श्रेष्ठ आहे असें ठरलें म्हणजे व्यवहारांत अंशतः असणाऱ्या विवेकाला स्थैर्य येतें. विवेकाबरोबर वैराग्याचें आगमन होतें व हीं दोन्ही इंद्रियदमनानें पुष्ट होऊन इंद्रियजयाला ( मनोजयाला ) पुष्टतर करितात आणि शेवटीं गुरूपदिष्टश्रवणानें मनननिदिध्याससाध्य होऊन आपला पुरुषार्थ येथल्या येथें सिद्ध होतो.

१७. मागें सांगितल्याप्रमाणें ओंकारप्रणवाचा अखंड जप करून जीवानें आपलें लक्ष–सर्वस्व ब्रह्माकडे लावलें, प्रायः ओंकार हेंच ब्रह्मस्वरूप आहे, असें समजून त्याचें अखंड ध्यान केलें म्हणजे ह्या ध्यानरूपी पूजेनें चित्त ओंकारस्वरूपी होईल. ही प्रणवोपासना आहे. या ओंकाराला हृदयामध्यें नेऊन त्याच्याच स्वरूपानें ब्रह्माचें एकाग्रध्यान केलें, म्हणजे दहरोपासना होते आणि या पूजनध्यानानें ब्रह्ममय स्थिति झाली, चित्ताचा चित्तपणा मावळून जाऊन त्याची आणि चैतन्याची गांठ पडली, तादात्म्यवृत्ति झाली, म्हणजे प्रथम सविकल्पसमाधि साध्य होते आणि सर्व ब्रह्म आहे जिकडे पाहावें तिकडे, जें ऐकावें, जे चिंतावें, जें ध्यावें, जें गावें, तें सर्व ब्रह्म आहे अशी मनःस्थिति होते. इला सविकल्पसमाधि म्हणतात याच्याही पुढें निर्विकल्प समाधिची पायरी आहे. येथें ' मी ब्रह्म आहें ' हेंही भान नाहींसें होतें, ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुटी मावळून जाते, आणि शुद्ध निर्विकार, निरंजन, निर्गुण असें ब्रह्म राहतें. हें राहतें, असें सुद्धां म्हणतां येत नाहीं. कारण राहण्याबरोबर अस्तित्वाची तरी उपाधी येणार म्हणून येथें सहजवृत्तीनें मौनस्थितीचा अवलंब झाला पाहिजे. असें सांगतात कीं, एकदां महा–परमहंस श्रीदाक्षिणामूर्ति सहजवृत्तीनें संचार करीत असतां त्यांची स्वारी एका गांवीं येऊन सहज उतरली. त्यांचें तेज, त्यांची शांतवृत्ति, आणि सहज उत्पन्न होणारा पूज्यभाव इत्यादिकांचें अवलोकन करून गांवांतील बरीच शिष्ट मंडळी त्यांच्या दर्शनाला जाऊं लागली. पुढें कळतां कळतां लोकांस असें कळलें कीं, हे महाराज मोठे साक्षात्कारी ब्रह्मज्ञ आहेत. हें ऐकल्यावर तर लोकांची एकच दाटी होऊं लागली. एके दिवशीं एका चवकस वावदूकानें ब्रह्म म्हणजे काय ? असा प्रश्न विचारला. त्याबरोबर अखंड ब्रह्मानंदामध्यें रममाण होणाऱ्या महाराजांची ब्रह्मसमाधि लागली आणि त्या आनंदांत ते स्वस्थ बसले. ते बसले असें म्हणण्याच्या ऐवजीं त्यांचें शरीर, त्यांचीं इंद्रियें, जिव्हादि अवयव, मन, बुद्धि, अहंकार हीं सर्व आपापले व्यापार सोडून देऊन स्तब्ध झालीं, असें म्हणावें. तथापि महाराजांस झोंप लागली नव्हती, हें त्यांच्या

मुखचर्येवरून स्पष्ट दिसत होतें. असो; वावदूकानें दोन तीन वेळ प्रश्न केला; तथापि कांहीं उत्तर येईना. हें पाहून त्यानें खुणगांठ बांधून ठेविली कीं, या स्वामीला कांहीं एक येत नाहीं. कांहीं ज्ञान नाहीं, म्हणून ब्रह्मलक्षण न सांगतां शुद्ध मौनाचा यानें स्वीकार केला! बाहेर आल्यावर त्याचें तें बडबडणें ऐकून एक जाणता पुरुष म्हणाला; वेड्या! जें वाणीला सांगतां येत नाहीं, इंद्रियांस दिसत भासत नाहीं, तथापि जें सर्वांचें नियमन करितें, तें वाणीला कसें गोचर होणार! जें वाणीला स्वव्यापाराविषयीं प्रेरणा करितें त्या ब्रह्माचें लक्षण वाणीनें सांगणें म्हणजे सर्वव्यापी ब्रह्माबाहेर परिच्छिन्न जीवानें उभें राहून त्याचें वर्णन करणें होय. ब्रह्म सर्वव्यापी आहे, म्हणून त्यांच्या बाहेर जातां यावयाचें नाहीं, तें वाग्मनांस अगोचर आहे, म्हणून त्याचें लक्षण करितां यावयाचें नाहीं आणि वाणीस सांगतां यावयाचें नाहीं. 'मौन स्थितीचाही विसर हें ब्रह्माचें यथार्थ लक्षण आहे.' असो. तात्पर्य हें आहे कीं, निर्विकल्प समाधिस्थितींत 'आठव नाठव गेलों विसरून' अशी स्थिति व्हावयाची. या स्थितीचें वर्णन द्वितीयमुण्डकाच्या दुसऱ्या खंडांतील अकराव्या मंत्रांत केलें आहे.

१८. वरील समाधींतून व्युत्थान झालें, म्हणजे जीवन्मुक्त पुरुष व्यवहारांत आला असतां त्याला शरीररूपी वृक्षावर एकाच स्वरूपाचे दोन पक्षी म्हणजे शिव आणि जीव बसले आहेत असें दिसतें. हे नित्य सहचर आहेत. यांची गट्टी केव्हांही तुटत नाहीं. यांतील एकजण म्हणजे जीव शरीरवृक्षावरील हृदयकोटरांत वास्तव्य करून कृतकर्मांचा, फलाचा, उपभोग घेत असतो आणि दुसरा पक्षी साक्षीरूपानें स्वस्थ बसलेला असतो. पण विवेकी जीव नित्य किंवा नित्येतर कर्मैं जीं काय त्याला करावीं लागतात किंवा त्याच्या हातून होतात, तीं कर्मफलासह सर्वच्या सर्व परमेश्वरास समर्पण करीत असल्या-मुळें पूर्ण संचितानें प्राप्त होणारें सुखदुःखाची तो ओळख विसरतो आणि त्याला कर्मफलांचा उपभोग घ्यावा लागतो. तरी पण त्यापासून होणाऱ्या सुखदुःखाचा उपसर्ग त्याला मुळींच होत नाहीं. दुसरा पक्षी म्हणजे ईश्वर हा तर सर्व-साक्षी आहे. गीतेंत सांगितल्याप्रमाणें या क्षेत्रज्ञाचें सर्व कर्म जीवोपकारक असल्यामुळें त्याला ज्ञानरूप मात्र शरीर असतें आणि तें ज्ञान सुद्धां कर्म करण्याचें असतें, शरीरद्वारां कर्मफल भोगण्याचें नसतें. तात्पर्य त्याला जड शरीर नसतें, म्हणून शारीरिक किंवा मानसिक उपाधी त्याला नसतात आणि म्हणून तो साक्षीरूपानें वास्तव्य करितो. हें ईश्वराचें सर्वसाक्षित्व, सर्वदयावनत्व, इत्यादि मंगलगुण मिळून द्वैत्यांचें परब्रह्म होतें. असो; हें आणि जीवन्मुक्ताचे शीतोष्णराहित्य सुख-दुःखशून्यता इत्यादि सर्व प्रकार जीवन्मुक्ताला मात्र दिसतात आणि समजतात. पण संसारी पुरुषाची स्थिति तशी नसते. त्याचें अभिमानी व वासनामय चित्त संसाराच्या आंत गढून गेलेलें असल्यामुळें त्याला केवळ परतंत्र होऊन, कर्मतंत्र होऊन, केलेल्या कर्मांचीं सुखदुःखात्मक फलें भोगावीं लागतात आणि आपण सुखदुःखाचा अनुभव घेत आहों हें भान त्याला असतें. अर्थातच आपलें हें अखिल पारतंत्र्य पाहून तो वेडावून जातो आणि एकसारखा शोक करीत राहतो. सुख प्राप्त झालें असतांही तें दुःखमूलक आणि दुःखकारक आहे, विषयाची व विषयसुखाची आशा संपत नाहीं, केव्हांही पूर्ण सुखाची प्राप्ति होत नाहीं, झालेलें सुख अनित्य असतें, हा सर्व प्रकार शहाण्या संसारी पुरुषाला दुःख देणारा होतो. न मिळालेल्या सुखा-

बद्दल नित्य टोंचित राहणारीं आशा आणि मिळालेलें सुख केव्हां नष्ट होईल याची दुःखदायक भीति या उभयतांमुळेंही त्याचें चित्त गांगरून जातें आणि तो शहाणा असतो म्हणून दुःखमग्न होतो. ही संसाराची स्वरूपस्थिति आहे. पण जेव्हां त्याच पुरुषाला आत्मस्वरूपाची ओळख होते, आत्मा हा कर्तृत्वभोक्तृत्वशून्य आहे, सुख-दुःखादि त्याच्या ठिकाणीं कांहीं नाहीं, तो संसार-विलक्षण असून सर्व-स्वामी आहे, स्वतंत्र आहे. अशी त्या ' जुष्ट ' आत्मस्वरूपाची ओळख पटते, तेव्हां आत्म्याचें स्वरूप तेंच जीवाचें स्वरूप आहे, जीव चैतन्य आहे; चित्त नाहीं, कर्तृत्वादि धर्म चित्ताचे आहेत, ज्ञानरूपी जीवाचे नाहींत, चित्त परतंत्र आहे, माया-तंत्र आहे, जीव स्वरूपतः स्वतंत्र असून मायास्वामी आहे, असें जेव्हां त्याला निश्चयानें कळतें, तेव्हां तो शोक-सागर तरून जाऊन समाधान पावतो. तो ' वीतशोक ' किंवा आनंदरूप होतो.

१९ वरील स्थूल वर्ण वाचलें असतां वेदांततत्त्वज्ञानासंबंधानें जो एक गैर समज झाला आहे तो अंशतः नाहींसा होईल असें मला वाटतें. सर्व वेदांतानभिज्ञ विचारी पुरुषांचा, पौरस्त्य आणि पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा असा एक ठाम समज झालेला दिसतो कीं, वैदिक तत्त्वज्ञान हें, संसारदुःखमूलक आहे, असें सांगत असतें, कांहीं कांहीं लोक-तर पुढें जातात आणि असें म्हणण्याचें धाडस करितात कीं, दुःख हेंच जर संसाराचें बीज आहे आणि फल असेल, तर वेदांत्यानें आत्महत्या करावी ! आणि या दुःख-मूलक संसारापासून आपली सोडवणूक करून घ्यावी ! या शेवटच्या लोकांस आत्मा म्हणजे काय, याचें जें वैदिक वेदान्ती उत्तर देतात याचें यथार्थ ज्ञान नसतें. आत्मा कधीं मरत नाहीं किंवा मारीत नाहीं. हा वैदिक वेदांताचा पहिला सिद्धांत आहे. हा क्षणभर एकीकडे ठेऊन आत्मा म्हणजे सुख-दुःख भोगणारा जीव असें जरी लक्षण घेतलें, तरी याही जीवस्वरूपाचा नाश करणें महानास्तिकालाही शक्य नाहीं. कारण तो अमर आहे. शिवाय, तो अमर नाहीं, असें क्षणभर धरिलें, तरी कर्माचें योग्य फल कर्त्याला मिळालें पाहिजे. पण स्वतः मारून घेऊन तें फल मिळणार नाहीं ! असो; या लोकांस एकीकडे ठेऊन असें बघूं या कीं, संसार दुःखमय आहे; असें म्हणणारे वेदांती या वाक्याचा अर्थ तरी काय करितात ? दुःख म्हणजे प्रतिकूलवेदना उत्पन्न करणारी वस्तु. आपल्यास जें नको असतें तें प्राप्त होणें किंवा प्राप्त होण्याचा संभव असणें व हवें असतें तें नसणें, या वस्तूचें नांव दुःख आहे; हें सर्वपक्षांस अभिमत होईल असें मला वाटतें. आतां संसार किंवा व्यवहार कसा आहे तो पाहूं. प्रत्येक जीवाचा संसार त्यानें व त्याच्या पूर्वजांनीं केलेल्या कर्माचें फल असतो. हें फल कर्माच्या विपाक-नियमानें ठरलेलें असतें. अमुक कृत्य केलें असतां कर्त्याची जी मानसिक स्थिति असेल, जी शारीरिक स्थिति असेल, कर्म करीत असतां जेथें व ज्यावेळीं तें कर्म होत असतें, तेथील परिस्थिति जशी असेल, त्या मानानें कोणत्याही केलेल्या कर्माचें फल उत्पन्न होत असतें. आतां कदाचित् आपली मानसिक स्थिति किंवा शारीरिक स्थिति आपल्यांस हवी तशी करितां येईल. येथें आपल्यांस कांहींसे स्वातंत्र्य असेल. पण आपल्या सभोवारची परिस्थिति पूर्वकर्मानें ठरलेली असते म्हणजे तिच्या संबंधानें तो सर्वथा परतंत्र असतो. तेव्हां आपल्या संकल्पाप्रमाणें सर्व गोष्टी घडून येतात असें सामान्यतः होत नाहीं. पुष्कळवेळा आपल्यास नको असतात त्या गोष्टी होतात. आणि हव्या असतील त्या गोष्टी होत नाहींत. निदान आपल्या मनाप्रमाणें होत नाहींत. हा

अनुभव प्रत्येक जीवास प्रत्येक क्षणीं येत असतो. आपल्यास नको असेल तें होणें व हवें असेल तें न होणें याचें नांव दुःख आहे. आणि प्रतिकूलस्थिति प्राप्त होते आणि अनुकूलस्थिति येत नाहीं हा आपला अनुभव आहे म्हणून, सारांश आपण पुष्कळसे परतंत्र असतों म्हणून हा संसार दुःखमय आहे असें वैदिक वेदांती म्हणतात. पुनः; आपल्यास हवी असते ती स्थिति जरी प्राप्त झाली तरी ती स्थिति नित्य सुख देईल किंवा ती सुख देणारी असली तरी आपल्या मनाची पूर्वस्थिति कायम राहील असा तरी भरंवसा कोठें आहे ? परीक्षा पास झाली असतां आपल्याला पुष्कळ सुख होईल, असें वाटणाऱ्या विद्यार्थ्याला तो पास झाल्यानंतर जें क्षणिकसुख होतें, त्याची पुष्कलता कालानें पुष्कळच कमी होते, हा नित्याचा अनुभव आहे. सारांश, कर्माचें होणारें फल अनिश्चित, त्यापासून प्राप्त होणारें सुख अनिश्चित आणि सुख झालें तरी तें अनित्य, असा येथील कारभार आहे. शिवाय, जीवाची इच्छा किंवा आशा अमर्याद आहे. वाटेल तितकी व वाटेल तसली संपत्ति असूं द्या, जीवाचें समाधान म्हणून व्हावयाचें नाहीं. आशा कायम राहाणार, असमाधान असणार. हें दुःखच होय. पण जीवाला, नित्य सुख हवें आहे. हें नित्यसुख आहे कीं नाहीं याच्या बद्दल वाद राहील; पण त्याला नित्य सुख हवें आहे हें खास. हा नित्य सुखाच्या आवडीचा अनुभव नित्य येणारा आहे, म्हणून वैदिक वेदान्ती म्हणतात, उपनिषदें आणि गीतादिग्रंथ सांगतात, कीं जीवानें आपलें स्वकर्तव्य निष्कामबुद्धीनें व निरभिमानवृत्तीनें केलें पाहिजे. नित्य विहित केलेल्या कर्मापासून उत्पन्न होणाऱ्या अनुकूल किंवा प्रतिकूल स्थितीविषयीं अत्यंत उदासीन असलें पाहिजे. आणि आपलें जें निर्विकार ज्ञानरूप त्याच्या ठिकाणीं मात्र आपलें चित्तसर्वस्व व वित्तसर्वस्व अर्पण केलें पाहिजे, म्हणजे नित्य सुख प्राप्त होईल आणि विषयाचें आणि विषयफलांचें मात्र एकाग्र चिंतन करणाऱ्या पुरुषास दुःखमय दिसणारा संसार, निष्काम आणि निरभिमानवृत्तीनें निजकर्तव्य करणाऱ्या आत्मक्रीड व आत्मरत ज्ञानी पुरुषास नित्य सुखमय होईल. संसार स्वरूपतः सुखमय नाहीं किंवा दुःखमय नाहीं. जीव ज्या दृष्टीनें संसाराकडे पाहतात, त्या दृष्ट्यनुसार संसार सुखमय किंवा दुःखमय होतो. साखर गोड आहे असें आपण नित्य म्हणतों; पण कांहीं रोगराई होऊन ज्याचें रसनेंद्रिय बिघडलें आहे, त्याला ती कडू लागते किंवा अति गोड श्रीखंडाचें यथेच्छ भोजन झालें असतां मागाहून वाढली जाणारी खीर सपक लागते ! तात्पर्य, रसनेंद्रिय अनुकूल असेल तर; साखर गोड लागते, नसेल तर तीच साखर सपक किंवा कडू लागते. जीवाची वृत्ति जशी असेल त्या प्रमाणें संसार अनुकूल किंवा प्रतिकूल होईल. आपलें शरीर आणि आपली मनोवृत्ति आपल्या स्वाधीन ठेवण्यासाठीं आत्मस्वरूपाचें ध्यान करा आणि परिस्थितीविषयीं उदासीन राहा, तुमचा संसार आनंदमय होईल. पण नित्य चंचल असणाऱ्या मनोवृत्तींच्या पाठीमागें लागाल आणि नित्य प्राप्त होणाऱ्या अनुकूलप्रतिकूलस्थितीविषयीं आशा व भीति बाळगीत बसाल, कासाविशी कराल, तर संसार दुःखमय होईल; हा वेदांताचा उपदेश आपल्यांस येणाऱ्या नित्य अनुभवाला पटण्यासारखा आहे. असें आहे म्हणून मला वाटतें कीं, वेदांत्यांनीं संसार दुःखमय आहे, असें म्हटलें आहे तें कामुकसंसाऱ्यांचें नित्यचंचल चित्त व नित्यचंचल असणारी विश्वपरिस्थिति

मनांत आणून म्हटलें आहे. पण ज्यानें निष्कामवृत्तीचा अंगीकार करून निज कर्तव्य करण्याचा संकल्प निरभिमानबुद्धीनें केला, येणाऱ्या किंवा जाणाऱ्या परिस्थितीसंबंधानें जो तटस्थ राहिला, इतकेंच नव्हे तर परिस्थितीला ज्यानें आपलेंसें केलें, त्या निजस्वरूपीं दृढलग्न झालेल्या शुद्ध व धन्य पुरुषाला हा संसार सुखमय वाटेल यांत शंका नाहीं. असो; तात्पर्य हें आहे कीं, आत्मचिंतनास उपयोगीं पडेल इतक्या मात्र बेतानें सात्त्विक विषय प्राप्त होतील, असें निष्कामवृत्तीनें कर्म करणें आणि गीतेंत सांगितल्याप्रमाणें परमेश्वराचे दयाघनत्वादि गुण व्यवहारांत आणण्याची प्रेरणा करणाऱ्या चित्ताला ज्ञानाचीं व लोकसेवेचीं कर्में करावयास लावणें हा निवृत्तीचा मार्ग आहे. कर्म टाकून देणें ही निवृत्ति नव्हे, तर देहादि उपाधींस मात्र पुष्ट करून आत्मस्वरूपाचें ध्यान संकुचित करणाऱ्या कर्मांपासून निवृत्त होणें ही खरी कर्मनिवृत्ति आहे. हा खरा कर्मसंन्यास होय. दुःखमय संसार आहे म्हणून कर्म टाकावयाचें नाहीं, तर सकाम कर्म संसाराला दुःखमयत्व देतें म्हणून तसलें कर्म टाकावयाचें आहे. याप्रमाणें वस्तुतः संसार दुःखमय नाहीं. आणि सकामवृत्तीचा त्याग करणें म्हणजे कर्मसंन्यास नव्हे, असें जर यथार्थ समजेल तर हा व्यवहारही आनंदमय होऊन त्याला परमार्थाचें स्वरूप येईल. 'ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् । ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥' या गीताश्लोकांत तरी हाच भावार्थ आहे. आधुनिक वेदान्ती कर्मसंन्यासाचा जो अर्थ करितात तो श्रुतीला मान्य नाहीं, असें मला वाटतें. या कर्मभीरू वेदांत्यांनीं केलेलीं व्याख्यानें आणि दिलेलीं वचनें ऐकून आमच्या अलीकडील विद्वान् पुरुषांचें मन संशयग्रस्त झालें ही दुर्दैवाची गोष्ट होय. म्हणून या चौकस व सात्त्विक कर्मशील विद्वान्लोकांनीं जमल्यास गीताग्रंथाचें पारायण स्वसंशयनिरसनार्थ करावें, विशेषतः श्रीमच्छांकरभाष्य वाचावें. त्याच प्रमाणें ज्ञानमार्ग सांगणाऱ्या उपनिषदांचा व त्यावरील भाष्यांचा परिचय करून घ्यावा, अशी त्यांस या नवीन उत्साहीवृत्तीच्या लोकांस, सविनय सूचना करितों व हा वस्तुतः अप्रस्तुत परंतु व्यवहारस्थितीला प्रस्तुत विषय येथेंच थांबवितों.

तिसऱ्या मुंडकाच्या पहिल्या खंडांतील तिसऱ्या व चौथ्या मंत्रांत जीवन्मुक्तस्थितीचें वर्णन केलें आहे. त्यावरूनही मी म्हणतों असेंच श्रुतीचें मनोगत आहे. असें मला वाटतें. सर्व कर्ता करविता परमेश्वर आहे, तो सर्वव्यापी आहे, स्वयंप्रकाश आहे, विश्वपरिस्थितीचा स्वामी आहे, असें समजून जो साधक परमात्मस्वरूपाचे अखंड ध्यानांत निमग्न राहील, व्यवहारांत पुरुषोत्तमाच्या कृतीचें नित्य अनुकरण करील आणि व्यवहारांतही परमेश्वरी स्वरूपाकडे आपल्या गुण कर्मांनीं आपल्या सोपाधिक जीवाची उन्नति होत जावी, असें निजकर्तव्य करीत जाईल, तो पापपुण्यातीत होऊन निर्मळ होईल, परमेश्वररूप होईल, त्याचे सर्व संशय नष्ट होतील, आणि निजस्वरूपाच्या नित्यानंदामध्यें तो नित्य रममाण होत राहील. त्याचें वर्तन सत्यरूप, त्याची तपश्चर्या ज्ञानरूप आणि त्याची नीति आनंदरूप असेल. आतां मला येथें हें सांगणें इष्ट वाटतें कीं, कोणीही आस्तिक किंवा नास्तिक विचारी पुरुषानें तिसऱ्या मुण्डकांतील पहिल्या खंडांत असणारे पांच व सहा हे मंत्र काळजीपूर्वक वाचावे; म्हणजे सत्य, तप आणि ब्रह्मचर्य या शुद्ध नीतिपर साधनांचें अगत्य श्रुतीस किती दिसत आहे, याचा अदमास करितां येईल. 'सत्या-

परता नाहीं धर्म ' असें श्रीसमर्थ साधुमहाराज म्हणतात, त्याचा प्रत्यय सहाव्या मंत्रांत येणार आहे. शुद्धनीति आणि सम्यग्ज्ञान हीं परमार्थसाधनास अत्यंत अवश्य आहेत; असा वेदवेदांताचा अभंग सिद्धांत आहे. असो; पुढील तीन मंत्र आत्म्याचें स्वरूप-वर्णन करितात आणि आत्मा व ब्रह्म एकच आहे असें सांगतात. पण या विषयाचें विवेचन मागें अनेक वेळ आलें आहे म्हणून त्यासंबंधानें येथें पुनः पिष्टपेषण करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. शेवटच्या मंत्रांत शुद्धसत्त्वाचा जीवन्मुक्त महात्मा जे जे संकल्प करितो ते ते सर्व सत्य संकल्प सिद्धिला जातात अशी जीवन्मुक्तस्थितीची फलश्रुति सांगितली आहे. खरेंच आहे. ज्याचें अंतःकरण उपाधिशून्य झालें, ज्याचें विश्वज्ञान आणि आत्मज्ञान निर्मर्याद झालें, सारांश जो सर्वज्ञ, सर्ववेत्ता आणि सर्वशुद्ध झाला, त्याचे संकल्प सत्त्वरूप असतात आणि म्हणून ते सिद्धीलाही जातात. पूर्वीचे महर्षि निग्रहानुग्रह करण्याला समर्थ असत, याचें रहस्यही हेंच आहे. प्रस्तुत परिस्थिति पाहून पुढें कोणते प्रसंग प्राप्त होणार, हें समजण्याचें सामर्थ्य विश्वज्ञानानें प्राप्त झालें आणि तें ज्ञान आपल्या वैषयिक इच्छांनीं आणि आशानीं व अभिमानांनीं कलुषित झालेलें नसलें म्हणजे पुढें काय होणार ! हें सांगतां येणें अशक्य नाहीं. आपण स्थिरमनानें व शुद्धचित्तवृत्तीनें गणिताचे प्रश्न सोडवितों व गणितज्ञान ठीक असेल तर उत्तरेंही बरा-बर येतात, हें सर्व नीट होतें. पण प्रश्न लिहीत असतां पास नापास होण्याच्या भीतीनें चित्त गोंधळून गेलें, तर आपल्या बुद्धीला पक्षघाताचा झटका येतो, मन लुलें पडतें, इंद्रियांवरील आपलें स्वामित्व नष्ट होतें आणि आपलीं उत्तरें चुकतात, हें अनुभवसिद्ध आहे. हें एकच उदाहरण महर्षींच्या निग्रहानुग्रहसामर्थ्याची व आपणासारख्यांच्या दुर्बल परतंत्रतेची सिद्धि करितें. तात्पर्य, पूर्ण ज्ञानी व शुद्ध चित्तात्मक पुरुषाचे सर्व संकल्प सत्यस्वरूप असतात आणि सिद्धीलाही जातात. म्हणून असल्या पुरुषाची आराधना करावी आणि या भक्तिपूर्वक आराधनेनें त्याचे गुण आपल्याला लाभतील असें करावें, हा श्रुतीचा उपदेश आहे. ह्या गोड उपदेशाचा कोण स्वीकार करणार नाहीं बरें !

२१ तिसऱ्या मुंडकाच्या दुसऱ्या खंडांत म्हणजे या उपनिषदाच्या शेवटच्या खंडांत साहजिकतः उत्पन्न होणाऱ्या एक दोन गोष्टी सांगून हें उपसंहाराचें प्रकरण आटपतें घेतों. ब्रह्मदृष्टि झालेला पुरुष सर्व संसार ब्रह्ममय म्हणजे आनंदरूप आहे असें पाहतों, हें एकच वाक्य ' वेदांत हा दुःखवाही आहे ' या असत् सिद्धांताचा प्रतिषेध करण्यास पुरेसें आहे. स्वतः आनंदमय झालेला पुरुष सर्वत्र आनंदी आनंद पाहतो, हाही अनुभव प्रत्येकास आहे. आपण ज्या आनंदी अथवा दुःखी मनोवृत्तीनें विश्वाकडे पाहतों, त्याप्रमाणें तें दिसूं लागतें, हें म्हणणें युक्तीलाही जुळत असतें. आतां चित्त शुद्ध होऊन ज्यानें ब्रह्म-ज्ञानाचा स्वीकार केला आणि मननध्यानानें ' अहं ब्रह्मास्मि ' असा ज्याचा निश्चय झाला, त्याला या जगांतील अथवा संसारांतील सुखदुःखें यत्किंचितही बाधा करूं शकत नाहींत. प्रत्यक्ष उदाहरणानेंही ही गोष्ट सिद्ध करितां येते. इंग्लंडांत ब्लडी मेरीच्या कारकीर्दींत अत्यंत तीव्र धर्मच्छल झाला, ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. त्यावेळीं एक दृढ निश्चयी आणि प्रॉटेस्टंट पंथाचा कट्टा भक्त राणीच्या धर्मच्छलास न जुमानतां आपलीं मतें प्रवर्तूं लागला; म्हणून त्याला राजसेवकांनीं पकडून आणिलें आणि

तत्कालान न्यायाधिशांनीं त्याला अग्निकाष्ठ–भक्षणाची शिक्षा सांगितली. तेव्हां एका हातांत आपलें धर्मपुस्तक धारण करून व दुसरा हात रसरसीत निखाऱ्यांत घालून तो म्हणालाः राणीसाहेब ! जावत्काल पर्यंत माझ्या अंगावर हें धर्मकवच आहे, तावत्कालपर्यंत माझ्या सभोंवार पेटलेला हा अग्नि मला नदीजलाप्रमाणें शीतल व तोषकरच वाटेल ! असें म्हणत असतां त्यानें प्राण सोडला, तथापि त्याला मृत्युसमयीच्या वेदना झाल्याचें यत्किंचितूही दिसून आलें नाहीं. हिरण्यकशिपूचा पुत्र प्रन्हाद याची ही गोष्ट अशीच आहे. महाराष्ट्रांतील प्रसिद्ध शिवाजीचे सेवक राजनिष्ठेप्रीत्यर्थ आपल्या प्राणाची आहुति देण्यास मागें पुढें पहात नसत, हें तानाजी मालुसरे, बाजी देशपांडे, हिरोजी फरजंद, इत्यादिकांच्या उदाहरणांवरून स्पष्ट होतें. फार लांब कशाला ? राजपुरुषाचा जीव संरक्षण्याच्या कामीं एका एतद्देशीय अमलदारानें आपला देह अर्पित करण्यासाठीं पुढें केला, ही पंधरा वर्षांपूर्वीं झालेली गोष्ट पुण्यांतील लोकांच्या लक्षांत अखंड राहून त्यांची राजभक्ति दृढकरील यांत शंका नाहीं. सारांश एका गोष्टीच्या दृढचिंतनानें बाकीच्या गोष्टींकडे लक्ष जात नाहीं, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. हाच सिद्धांत ब्रह्मज्ञानी पुरुषासही ठाकसे ठीक लागतो. एकाग्र ब्रह्मचिंतनानें ज्याचें अंतःकरण ब्रह्ममय झालें, जो ब्रह्म झाला, तो या जगांत सर्वत्र आनंद आहे, असें पाहूं लागतो आणि जेथें कोठें भिन्नभाव, न्यूनता किंवा कमीपणा असेल तेथें तो आपल्या ज्ञानविज्ञानाचा मसाला घालून व आपल्या ज्ञानसामर्थ्यानें विश्वाला आणि विश्वसामर्थ्याला आपल्या तंत्रानें वागावयास लावून त्याच विश्वाला आनंदमय करून सोडतो. तेव्हां संसाराच्या भीतीनें वेदांती लोक संसारनिवृत्त होतात, हें म्हणणें खऱ्या ब्रह्मज्ञ पुरुषासंबंधानें यथार्थ नाहीं. आपल्या स्वतःच्या पूर्वकर्मानें प्राप्त झालेल्या सुखदुःखाशीं हे लोक झोंबाझोंबी करीत नाहींत हें खरें; पण यांचे क्रियमाण अथवा ज्ञानोत्तर होणारीं निजकर्तव्यें अशा सामर्थ्याचीं असतात कीं, त्यांच्या योगें त्यांचा संसार आनंदमय होतो. हे लोक सुखदुःखाला भितात हें खरें नव्हे. तर उत्पन्न होऊन लयाला जाणारीं सुखदुःखें यांच्या हिशेबांत नसतात, यांनीं सकाम कर्मांचा त्याग केलेला असतो; हा खरा प्रकार आहे. नित्य वाढत जाणाऱ्या निष्काम कर्तव्याचा हे लोक त्याग करीत नाहीं, निदान त्यांनीं त्याग करूं नये, असा श्रुतीचा उपदेशही या मंत्रांत सहजरीतीनें प्राप्त झाला आहे. तात्पर्य, विषयभोगाची मात्र प्रार्थना करणाऱ्या बुभुक्षूंचा सर्व संसार दुःखमय होतो; असें याच खंडाच्या दुसऱ्या मंत्रांत सांगितलें आहे, त्यावरून श्रुतीची दृष्टि भोगनिषेधाकडे आहे, कर्तव्यनिषेधात्मक नाहीं, हें उघड आहे. तेव्हां तत्त्वज्ञान सांगून निजकर्तव्यास प्रोत्साहित करणाऱ्या वेदांता-विरुद्ध अनर्थक हाकाटी न करितां वेदांताचें म्हणणें नीट समजून घ्यावें आणि नंतर त्याच्या विरुद्ध काय आक्षेप आणावयाचे असतील ते आणावे, अशी माझी सर्व विचारी पुरुषांस सविनय विनवणी आहे.

२२ दुसरी गोष्ट ब्रह्मप्राप्तीच्या संबंधानें आहे. वेदांत ग्रंथाचें पुष्कळ श्रवण केलें, अध्ययन केलें, कुशाग्र बुद्धीनें अनेक चमत्कारिक अर्थ शोधून काढिले किंवा अनेक वर्षेंपर्यंत वेदांताची चर्चा चालविली किंवा प्रवचन केलें, म्हणून मात्र ब्रह्मप्राप्ति व्हाव-याची नाहीं. जोंपर्यंत अंतरंग रंगलें नाहीं, जोंपर्यंत ज्ञानात्मक बुद्धीला श्रद्धात्मक-बुद्धीची जोड मिळाली नाहीं, ब्रह्मपदावर निःसीम भक्ति जडून सर्व व्यवहार ब्रह्ममय

झाला नाहीं, अविच्छिन्न ब्रह्माचें तैलधारेप्रमाणें अखंडध्यान साध्य झालें नाहीं, तोंपर्यंत नुसत्या श्रवणादिकांनीं किंवा अध्ययनादिकांनीं ब्रह्मप्राप्ति व्हावयाची नाहीं. ब्रह्मप्राप्ति होण्याला आपलें तन-मन-धन ब्रह्मार्पण केलें पाहिजे. सर्व शास्त्रांनीं सांगितलेलीं ज्ञानें संग्रहित करून जो एक ठाम निश्चय सिद्ध होईल, त्या निश्चयालाही आधार देणारें सर्वेंद्रियागोचर ब्रह्म निश्चित होईल व ब्रह्माचे ठिकाणीं अस्तित्वाची व पूर्ण पूज्यत्वाची पूर्ण निष्ठा (श्रद्धा) बसेल, तेव्हां अखंड समाधीमध्यें आत्मस्वरूप आपोआप प्रकट होईल, इतकेंच नव्हे तर तें साधकालाही त्याचें ब्रह्मरूप परत देईल, हा सिद्धांत आमच्या येथें विद्यमान असणाऱ्या वेदांत्यांनीं लक्षांत ठेविला पाहिजे. आजमितीला खरे ब्रह्मज्ञ विरळा दृष्टीस पडतात, यांचें कारण मूळ रहस्यावर दृष्टि न ठेवतां नुसत्या चिन्हांचा दृढ अभिमान असणें हे होय. हल्लींच्या वेदांत्यांत प्रवचन करणारे कुशाग्रबुद्धीचे व नित्य ब्रह्मविद्येचें अध्यापन करणारे पुष्कळ लोक आढळण्यांत येतात व त्यांस ब्रह्मवेत्ते असें ही टोपणनांव देण्यांत येतें. पण हें सर्व तकलोबी सोनें होय. ब्रह्माशीं झोंबून त्याला बिलगणारा पुरुष लाखो ब्रह्मज्ञांत एखादाच सांपडेल. अर्थातच चिन्हावर मात्र दृढ भक्ति ठेवणाऱ्या वेदांत्यांचें सामर्थ्य अत्यंत अल्प असतें. तथापि ब्रह्मज्ञांस साहजिकपणें मिळणारे सर्व हक्क हे लोक लाटून घेतात आणि आपल्या अशिष्ट वर्तनानें वेदांतमताचा सत्यनाश, आपली हानि आणि समाजांत गोंधळ उठवून देतात. खरा ब्रह्मज्ञ नीतीचें उल्लंघन करीत नाहीं. तो पुढें जातो व नीति सिद्धातांस आश्रय देतो. हा महापुरुष आपली व समाजाची नीति, समाजाचें सामर्थ्य आणि समाजाचें ज्ञान वृद्धिंगत करितो. हें सर्व घडवून आणण्यांत त्याचें ज्ञानबल अभंग असतें, त्याचें चित्त निर्भ्रांत असतें आणि त्याचें तपश्चर्येचें ध्येय अद्वितीय ब्रह्म मात्र असतें. असे लोक मात्र कृतार्थ, कृतकृत्य, शांत, ज्ञानतृप्त आणि आनंदरूप असतात. ते देहामध्यें असतांही सर्वगामी, द्विनेत्री असतांही सर्वसाक्षी, जिवंत असूनही मरणास मारणारे असतात. या ब्रह्माच्या प्रत्यक्ष मूर्ती होत. हेच श्रुतीचा निश्चित अर्थ करण्यास व ब्रह्मानुभव घेण्यास समर्थ होतात; कारण, उपभोगास मात्र उपयोगी पडणाऱ्या सर्व विषयांचा या लोकांनीं त्याग केला असल्यामुळें त्यांचें चित्त गंगाजलाप्रमाणें निर्मळ असतें. असो; असे जीवन्मुक्त पुरुष ज्यावेळीं देहत्याग करतात त्यावेळीं त्यांचा देह घडवून आणण्यास कारणीभूत झालेल्या सर्व कला आपल्या कारणांत जाऊन लीन होतात, त्यांचीं सर्व कर्में शून्यवत् होतात. आणि त्यांचा ज्ञानपूर्ण आत्मा ब्रह्म होऊन जातो. तात्पर्य ज्यांना ब्रह्मज्ञानविज्ञान होतें ते ब्रह्म होतात, अर्थात् शोक, मोह, क्षुधा, पिपासा, इत्यादि उपाधींपासून मुक्त होऊन ते अमृतपूर्ण होतात, ते लोक सर्वज्ञ आणि सर्ववेत्ते होतात, हें आतां सांगण्याचें कारणच राहिलें नाहीं. तात्पर्य ज्या प्रश्नाला उत्तर देण्यासाठीं या विद्येचा उदय झाला तो प्रश्न पूर्णरीतीनें सोडविला गेला, असें मला वाटतें. अपरविद्यांस ( व्यावहारिक ज्ञानांस आणि व्यावहारिक कर्मांस ) आधार देणाऱ्या, त्या विद्यांचें अस्तित्व उत्पन्न करून तिचें व्यावहारिक सत्यत्व स्थापन करणारी परविद्या हस्तगत झाली, पराविद्येचा विषय जें ब्रह्म त्याचें ज्ञानविज्ञान झालें म्हणजे विश्वांतील सर्व ज्ञानविज्ञान प्राप्त झालेसें होतें, जीव तेथून मर्त्य आहे, असा सिद्धांत कळला म्हणजे प्रत्येक जीव मर्त्य आहे कीं नाहीं हें जसें पाहण्याचें कारण उरत नाहीं, त्याप्रमाणें

ब्रह्मविद्येचें अध्ययन केलें असतां सर्व विद्यांचें आणि कलाशास्त्रांचें सार आपल्या हातीं आलें असें होतें; पण ही गोष्ट सिद्ध होण्याला प्रथमतः प्रत्येकानें वेदांमध्यें ज्या शास्त्रांचा उल्लेख प्रत्यक्ष झाला आहे, किंवा परोक्षरीतीनें ज्या शास्त्रांचा उल्लेख होतो, अथवा अनुपलब्ध वेदांत ज्या शास्त्रांचा व कलांचा उल्लेख असला पाहिजे, त्यांतील आपल्या जीवनास उपयोगी पडणाऱ्या व आपलें ज्ञान वाढविणाऱ्या शास्त्रांचा अभ्यास केला नसेल तर त्याची खुण गांठ असी असावी कीं, त्या त्या विशेष शास्त्रांतील मुख्य प्रमेयें पूर्वसंस्कारानें उद्बुद्ध झालेलीं असावीं; निदान त्यांचें ज्ञान तरी अति सौकर्यानें करितां यावें. म्हणजे तो पुरुष वेदांतज्ञानाला योग्य अधिकारी होतो व त्याचें ब्रह्मज्ञानाला विज्ञानाचें स्वरूप येतें. यानंतर सामान्यतः नित्य सिद्धांत कोणते आणि अनित्य कोणते यांचा विवेक आपल्यास करितां येतो. तसेंच या व्यावहारिक शास्त्रांच्या अध्यापनानें व संसारांत येणाऱ्या अनुभवानें जीवितांस व ज्ञानास उपयोगी न पडणाऱ्या व दुरुपयोगाची संधी आणून देणाऱ्या विषयांचा आणि शास्त्रांचा त्याग करण्याची वृत्ति खंबीर असली पाहिजे. शास्त्राध्ययन करण्याला व वैराग्य सिद्ध करण्याला मनोविजयाची आवश्यकता नित्य आहे. आपण नित्य असावें, सर्वज्ञ व्हावें आणि आपल्यास निर्विकारत्व व्हावें, ही तर प्रत्येक जीवाची इच्छा आहे. तसेंच आपण उपाधितंत्र असूं नये, उपाधीनें दुःखें उत्पन्न होतात; तेव्हां तिचा उपसर्ग नसावा, सारांश आपल्या दुःखाचें आत्यंतिक विमोचन व्हावें ही गोष्टही प्रत्येक जीवाला इष्ट आहे. म्हणजे मोक्षाची इच्छा प्रत्येकास आहे. ही असावी असें सांगण्यांत कांहीं प्रयोजन नाहीं, कारण तिचें अस्तित्व नित्य आहे. म्हणून मोक्षाची नित्य इच्छा, विवेकोचित वैराग्यसह असणारा मनोविजय, ही जोडी शास्त्राभ्यासानें व विहितकर्मानें साध्य झाली, म्हणजे ब्रह्मविद्या संपादन करण्याचा अधिकार प्राप्त होतो.

याप्रमाणें या उपनिषदाची हकीकत व त्यावर सुचलेले विचारांची मालिका आहे. 'एक विज्ञान झालें असतां सर्व विज्ञान व्हावें,' अशी वस्तु कोणती ! तर ही ब्रह्मवस्तु किंवा आत्मवस्तु होय. आतां आत्मवस्तु ज्ञात झाली म्हणजे सर्व ज्ञानाचा उलगडा होतो, तो कसा हें विस्तारानें पाहणें इष्ट आहे. पण हें मनोरंजक अपूर्व कार्य मांडुक्याचे वेळीं किंवा आणखी एखादे उपनिषत्प्रसंगीं करीन, असें अभिवचन देऊन हा लांबलेला उपसंहार संपवितों.



# शब्दांचें सूचीपत्र.